


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.
   वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.









अनुक्रमणिका

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

वर्ष ३६ : अंक १४६-१४७ जुलै ते डिसेंबर १९६३

संपादक
शा. रा. ढवळे

## या अंकात

प्रा. गो. म. कुलकर्णी, श्री. श्री. शं. नवरे, प्रा. व. दि. कुलकर्णी, प्रा. द. भि. कुलकर्णी, प्रा. भ. श्री. पंडित, डॉ. व. वि. पारखे, श्री. य. ल. गुण्ये, डॉ. हरिभाऊ तोडमल, श्री. रा. चिं. ढेरे, प्रा. सूर्यकान्त खांडेकर यांचे लेख,

श्री. रा. चिं. ढेरे, प्रा. हेमंत इनामदार, डॉ. न. का. घारपुरे, श्री. न. वि. गाडगीळ, डॉ. सुहासिनी लद्दू, श्री. खंडेराव सुळे श्री. वा. कृ. गलगली, डॉ. कुमुदिनी घारपुरे, डॉ. मीना जोशी, श्री. मो. रा. वाळंबे व श्री. प्र. ल. गावडे, यांची परीक्षणे

शिवाय साभार-स्वीकार, परिषद्वार्ता, म. सा. परिषदेची घटना वगैरे

अनुक्रमणिका






मडगाव-गोवे येथे भरणारे ४५ वे

# मराठी साहित्य संमेलन

## अध्यक्षीय निवडीची सूचना

महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या मराठी साहित्य संमेलनाचे ४५ वे अधिवेशन 'गोमंतक साहित्य सेवक मंडळ' या संस्थेतर्फे मडगाव येथे **मे १९६४ च्या पहिल्या आठवड्यात** भरण्याचे निश्चित झाले आहे. या संमेलनाच्या अध्यक्षपदासाठी ज्यांना नावे सुचवायची असतील त्यांनी ती शनिवार **दि. २२ फेब्रुवारी १९६४, सायंकाळी ५ वाजेपर्यंत परिषदेच्या चिटणिसांकडे (टिळकरस्ता, पुणे २) कळवावीत अशी विनंती आहे.** याबाबतीत घटनेनुसार पुढील तरतुदी आवश्यक आहेत:—

(१) ज्याचे नाव सुचवावयाचे तो परिषदेचा एक वर्ष सभासद असला पाहिजे; व सूचनापत्रासोबत त्याची लेखी संमती पाहिजे.

(२) सूचक व अनुमोदक हे दोघेही परिषदेचे रीतसर सभासद असले पाहिजेत.

*टिळकरस्ता*
*पुणे २*
*दि. ३०-१-१९६४*

*वि. त्र्यं. शेटे*
*अ. गं. मंगरूळकर*
*म. ना. अद्वन्त*
*चिटणीस*

अनुक्रमणिका

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

वर्ष ३६ : अंक १४६–१४७ जुलै ते डिसेंबर १९६३
संपादक : वा. रा. ढवळे

## संपादकीय

### मृत्यूने उघडलेला भीषण जबडा !

'पत्रिके'चा गेला अंक प्रसिद्ध झाल्यापासून प्रस्तुतचा हा अंक प्रसिद्ध होईपर्यंतच्या या कालखंडात अनेक नामवंत साहित्यिक, इतिहास-संशोधक, व राजकारणी व्यक्ती मृत्यूच्या भीषण जबड्यात सापडून कालवश झाल्यामुळे, महाराष्ट्राच्या साहित्यिक व सांस्कृतिक जीवनाचे अपरिमित नुकसान झाले आहे. शाहिरी वाङ्मयाचे संशोधक व इतिहासकार श्री. म. ना. सहस्रबुद्धे, (ता. ६–१०–६३) म. सा. संमेलनाचे एक भूतपूर्व अध्यक्ष इंदूरचे सरदार माधवराव वि. किबे, (१२–१०–६३) सुप्रसिद्ध लघुकथालेखक, प्रसाद मासिकाचे संपादक व धडाडीचे प्रकाशक श्री. य. गो. जोशी, (७–११–६३) कर्वे शिक्षण संस्थेशी संबंधित असलेले एक शिक्षणतज्ज्ञ व 'विरंगुळा' या आत्मचरित्राचे लेखक प्राध्यापक ना. म. पटवर्धन, (१५–११–६३) केसरीचे एक भूतपूर्व संपादक व इतिहासकार श्री. वा. कृ. भावे, (१९–११–६३) कोल्हटकरांच्या नंतर विनोदी वाङ्मयाला एक वास्तववादी असे निराळे सोज्ज्वळ वळण देणारे विनोदी लेखक व पाली वाङ्मयाचे अधिकारी प्राध्यापक चिं. वि. जोशी, (२१–११–६३) ज्ञानेश्वरी व इतर संतवाङ्मयाचे साक्षेपी अभ्यासक व टीकाकार श्री. द. वें. केतकर, (२१–११–६३), नागपूर येथील एक नाटककार श्री. वि. रा. हंबर्डे, (१८–११–६३), महाराष्ट्रराज्याचे मुख्यमंत्री व 'जिजामाता' व 'मुलांचे गांधी' या पुस्तकांचे लेखक व पत्रकार श्री. मा. सां. कन्नमवार, (२४–११–६३) सुप्रसिद्ध इतिहास-संशोधक, भूतपूर्व 'प्रगति' या साप्ताहिकाचे संपादक व मराठीतील एक शैलीदार लेखक व टीकाकार प्रा. त्र्यं. शं. शेजवलकर (२८–११–६३) अशा महाराष्ट्राला भूषणभूत ठरलेल्या अनेक व्यक्तींना काळाने एकामागून एक आमच्यामधून हिरावून नेल्याबद्दल 'पत्रिके' ला अतीव दुःख होत असून, त्यांच्या निधनामुळे वाटणारी हळहळ अनेक दिवस जाणवत राहील. या सर्व थोर व्यक्तींच्या कुटुंबियांच्या दुःखात आम्ही सहभागी आहोत.

या सर्व व्यक्तींचे जीवनकार्य एवढे प्रचंड आहे की त्याचे मूल्यमापन करण्यासाठी अनेक स्वतंत्र ग्रंथच लिहिण्याची आवश्यकता आहे. ते मूल्यमापन एका लहानशा स्फुटात करण्याचा प्रयत्न करणे हास्यास्पद ठरेल म्हणून तसा प्रयत्न न करता या सर्व दिवंगतांना आदरपूर्वक ही सामुदायिक श्रद्धांजली मी वहात आहे. महाराष्ट्राच्या वाङ्मयीन, सांस्कृतिक व सामाजिक जीवनातील या व्यक्ती एवढ्या मोठ्या आहेत की त्यांचे नाव उच्चारताच त्यांची

अनुक्रमणिका



भरीव कामगिरी अगर त्यांची साहित्यसंपदा साकार होऊन डोळ्यापुढे यावी. या सर्वांच्या निधनाने महाराष्ट्राचे अपरिमित नुकसान झाले आहे. विशेषतः कै. त्र्यं. शं. शेजवलकर यांच्या हातून लिहिले जाणारे शिवचरित्र अपुरेच राहिले आहे याचे दुःख विशेषच जाणवते. ते चरित्र पुरे करण्याइतके तरी किमान आयुष्य शेजवलकरांना लाभायला हवे होते हा विचार मनात सारखा डोकावत राहतो. माझ्याच नव्हे तर अनेकांच्या.

## महाराष्ट्राच्या नव्या मंत्रिमंडळाचे स्वागत

कै. कन्नमवार यांच्या अनपेक्षित नि आकस्मिक मृत्यूमुळे, महाराष्ट्र राज्याच्या मंत्रिमंडळात बदल झाला असून कन्नमवार मंत्रिमंडळात महसूलमंत्री असलेले श्री. वसंतराव नाईक यांच्या नेतृत्वाने नवे मंत्रिमंडळ आता अस्तित्वात आले आहे. श्री. वसंतराव नाईक हे एक तडफेचे, वास्तववादी दृष्टिकोन असलेले व शेतकरी–कामकरी वर्गाच्या हिताबद्दल सदैव दक्ष असलेले पुढारी असल्यामुळे, त्यांच्या नेतृत्वाने बनलेले नवे मंत्रिमंडळ मराठी भाषेच्या व महाराष्ट्राच्या सर्वांगीण अभ्युदयासाठी विशेष परिश्रमाने झटेल अशी आशा करावयास जागा आहे. मुख्यमंत्री श्री. वसंतराव नाईक यांनी निवडलेल्या मंत्रिमंडळात विशेषतः श्री. बाळासाहेब देसाई, बॅ. वानखेडे, श्री. स. गो. बर्वे, श्री. बाळासाहेब सावंत, श्री. मधुकरराव चौधरी यांच्यासारखी शासनकुशल व मराठी भाषा, मराठी वाङ्मय व मराठी संस्कृती यांच्या अभ्युदयाची सतत काळजी वाहणारी मंत्रिमंडळी असल्यामुळे हे नवे नेतृत्व महाराष्ट्राला हितावह होईल अशी आशा आहे. मुख्यमंत्री व त्यांचे मंत्रिमंडळातील सर्व सहकारी यांना या कामी मी सुयश चिंतितो व त्यांनी आखलेल्या महाराष्ट्राच्या सर्वांगीण विकासाच्या कार्यक्रमात समाजातील सर्व स्तरांचे त्यांना सोत्साह सहकार्य मिळेल अशी आशा करतो. विशेषतः मुख्यमंत्र्यांच्या नेतृत्वाने, महाराष्ट्राची होऊ घातलेली ललितसाहित्य-संगीत अकादमी साकार होवो अशी अपेक्षा केल्यास ती अप्रस्तुत होऊ नये.

## महाराष्ट्राचे नवीन प्रकाशनसंचालक

श्री. विनोद राव यांना सीलोन सरकारच्या मागणीवरून तेथील प्रकाशन खात्याची घडी बसवण्यासाठी पाठविण्यात आल्यामुळे, त्यांच्या जागी महाराष्ट्र शासनाच्या उप-प्रकाशनसंचालकाच्या जागी असलेले श्री. दामोदरपंत सामंत यांची बढती होऊन प्रमुख प्रसिद्धि–संचालक म्हणून नेमणूक झाल्याबद्दल, मी त्यांचे हार्दिक अभिनंदन करतो. श्री. सामंत यांच्या नेमणुकीचे सर्व वृत्तपत्रांनी व नियतकालिकांनी उत्स्फूर्ततेने स्वागत केलेले आहे, हे श्री. सामंत यांच्या लोकप्रियतेचे व योग्यतेचे निःसंशय गमकच समजले पाहिजे. श्री. सामंत हे महाराष्ट्रशासनाचे पहिलेच महाराष्ट्रीय प्रकाशन–संचालक आहेत म्हणूनच केवळ त्यांचे स्वागत होत आहे असे नसून, एक लायक अधिकारी योग्य जागेवर येत आहे याबद्दल वाटणारे समाधानच त्या स्वागताच्या मुळाशी आहे, नॅशनल कॉल व नॅशनल हेराल्ड या दोन इंग्रजी वृत्तपत्रांत उपसंपादकाच्या कामाचा दीर्घ अनुभव घेतल्यावरच ते महाराष्ट्र शासनाच्या प्रकाशनखात्यात वृत्तसंपादक या नात्याने शिरले व आता त्याच खात्याचे मुख्य अधिकारी झाले आहेत. त्यांचे व्यक्तित्व प्रसन्न असून, वृत्ती लोकांना उपयोगी पडण्याची आहे. अधिकारपदाचा वृथा अहंकार त्यांच्या ठिकाणी नसून, शासन व वृत्तपत्रे यांचे परस्पर संबंध सलोख्याचे ठेवण्याचे चातुर्य त्यांच्या ठिकाणी आहे. श्री. सामंत यांना या कामी मी सुयश चिंतितो.

## न्या. गजेंद्रगडकर सरन्यायाधीश झाले!

दिल्ली येथील भारताच्या सर्वोच्च न्यायालयातील न्यायमूर्ती श्री. प्र. बा. गजेंद्रगडकर यांची भारताचे सरन्यायाधीश म्हणून नेमणूक झाल्याचे वाचून मराठी भाषिकांना आनंदाबरोबर अभिमानही वाटल्याशिवाय राहिला नाही. श्री. गजेंद्रगडकर हे एक महाराष्ट्रीय म्हणूनच केवळ नव्हे तर एका बुद्धिवान समाज–धुरीणाला हा सर्वोच्च मान मिळाला म्हणून महाराष्ट्रीयांची मनें अभिमानाने फुलून यावीत हे साहजिकच होय. मुंबई हायकोर्टातील एक हुषार वकील म्हणून अल्पावधीतच कीर्ती संपादन केल्यावर तेथील न्यायालयात त्यांची न्यायाधीश म्हणून नेमणूक झाली; त्यांचे न्यायदान मुंबई हायकोर्टाच्या उच्च परंपरेला शोभेल असेच केवळ नसून त्या उच्च परंपरेला अधिक उच्च करण्यात त्यांचा मोठाच वाटा आहे. किंबहुना त्यामुळेच दिल्ली येथील सर्वोच्च न्यायालयात त्यांची नेमणूक झाली. व आता तर त्यांची बढती सरन्यायाधीश म्हणून झालेली आहे. एका बुद्धिवान व समाजहितैषी विधिविशारदाचा झालेला हा सन्मान म्हणजे योग्य माणसाची योग्य ठिकाणी झालेली ही

निवडच होय. याचेच समाधान सर्वांना वाटते. न्यायमूर्ती गजेंद्रगडकर यांना हा सर्वोच्च मान मिळाल्याबद्दल, मी त्यांचे हार्दिक अभिनंदन करतो व असेच उत्तरोत्तर यश भारताच्या सार्वजनिक व सामाजिक जीवनात त्यांना मिळावे व भारताची प्रतिष्ठा व कीर्ती सर्वदूर पसरावी अशी सदिच्छा व्यक्त करतो.

## गोव्याला भरणारे येते म. सा. संमेलन

येत्या मे महिन्याच्या पहिल्या आठवड्यात मराठी साहित्य संमेलनाचे येते अधिवेशन मडगाव गोवा येथे भरण्याचे निश्चित झाले असून, त्याची आवश्यक ती पूर्वतयारी सुरू झाली आहे. गोवा भारताचा आता अविभाज्य भाग झालेला असल्यामुळे पोर्तुगीजांच्या चारशे वर्षांच्या जुल्मी राजवटीतून तो आता मुक्त झाला आहे. इतकेच नव्हे तर गोव्यात श्री. दयानंद बांदोडकर यांच्या प्रभावी नेतृत्वाने पहिले लोकनियुक्त सरकार स्थापन झालेले आहे. अशा या उत्साही वातावरणात मराठी साहित्यसंमेलनाचे ४५ वे अधिवेशन भरणार असल्यामुळे, या संमेलनाबद्दल मराठी भाषिकांत बरीच उत्सुकता निर्माण व्हावी हे साहजिकच होय. इ.स. १९३० साली मडगाव येथे कै. वा. म. जोशी यांच्या अध्यक्षतेने मराठी साहित्यसंमेलन स्वातंत्र्यपूर्वकालात प्रथमच भरले होते. आता तेतीस वर्षांनंतर ते पुन्हा त्याच ठिकाणी पण स्वातंत्र्योत्तरकालात भरणार आहे, हे विशेष होय. गोवा हे महाराष्ट्रातच विलीन व्हायला पाहिजे; कारण गोव्याची स्वतंत्र संस्कृती अगर निराळी अशी भाषा आहे असे नसून महाराष्ट्राची जी संस्कृती व महाराष्ट्राची जी मराठी भाषा तीच गोव्याचीही आहे हेच धोरण मराठी साहित्यसंमेलनाने अगदी सुरवातीपासून स्वीकृत केलेले आहे. गोव्याचे मुख्यमंत्री श्री. दयानंद बांदोडकर यांचेही तेच धोरण असून त्याच दिशेने त्यांचे सरकार पाउले टाकीत आहे याबद्दल त्यांचे अभिनंदनच केले पाहिजे. इतकेच नव्हे तर या धोरणाच्या अंमलबजावणीच्या बाबतीत महाराष्ट्रातील जनता व महाराष्ट्र शासनही त्यांच्या पाठीमागे उभी आहेत. महाराष्ट्रवादी गोमंतक पक्षाची स्थापना करून व गोवा महाराष्ट्रात विलीन झाला पाहिजे हे उद्दिष्ट डोळ्यांपुढे ठेवून श्री. दयानंद बांदोडकर यांनी निवडणुका लढविल्या व सरकार बनविण्याइतके बल त्यांनी आपल्या पक्षाला संपादन करून दिले हे त्यांच्या प्रभावी व संघटनाकुशल व्यक्तित्वाचे गमकच म्हटले पाहिजे. त्यांचे हे बल टिकेल व आपल्या उद्दिष्टांप्रमाणे निवडणुकीत संपादन केलेला जय ते सार्थकी लावतील अशी आशा करावयास जागा आहे.

संयुक्त महाराष्ट्र व्हायला पाहिजे हे मराठी साहित्य संमेलनाचे धोरण साकार झाले आहे. त्याचप्रमाणे बेळगाव, कारवार, गोवा हे प्रदेशही संयुक्त महाराष्ट्रात समाविष्ट झाले पाहिजेत हीही संमेलनाची अनेक वर्षांची मागणी आहे. ही मागणी संमेलनाच्या खुल्या अधिवेशनात प्रभावीपणाने मांडण्यासाठी साहित्यसंमेलनांनी आजवर केलेल्या प्रयत्नांना तोड नाही. गोवा येथे भरणाऱ्या येत्या साहित्यसंमेलनातही ती तितक्याच प्रभावीपणाने मांडली जाईल याबद्दल शंका नको. त्या दृष्टीने व इतरही अनेक दृष्टींनी गोव्याचे संमेलन गाजणार असा रंग दिसू लागला आहे.

## मध्यप्रदेश म. सा. संमेलन

मध्यप्रदेशाची पुनर्रचना इ. स. १९५६ साली झाली. त्यानंतर त्या प्रदेशातील मराठी साहित्यिक एकत्र येऊन 'मध्यप्रदेश मराठी साहित्य परिषद' या नावाची एक प्रातिनिधिक अशी मध्यवर्ती मराठी साहित्यसंस्था स्थापन करण्यात आलेली आहे. या संस्थेला मराठी साहित्य महामंडळावर एक जागा देऊन प्रतिनिधित्वही देण्यात आले आहे. या संस्थेच्या विद्यमाने मध्यप्रदेशातील मराठी साहित्य संमेलनाचे पहिले अधिवेशन ता. १३ डिसेंबर १९६३ रोजी भोपाळ येथे इंदूरचे सुप्रसिद्ध ग्रंथकार व तत्त्वज्ञानाचे प्राध्यापक प्राचार्य ग. वा. कवीश्वर यांच्या अध्यक्षतेने नुकतेच भरविण्यात आले होते. मध्यप्रदेशातील मराठी भाषी समाजात इंदूरचे 'साहित्य-समालोचन'कार वि. सी. सरवटे अगर ग्वाल्हेरचे डॉ. ह. रा. दिवेकर, धारचे शिल्पकार र. कृ. फडके वगैरे ज्येष्ठ साहित्यिक मंडळी जरी आज विद्यमान असली तरी प्रस्तुत प्रथम अधिवेशनाचे अध्यक्षपद प्राचार्य ग. वा. कवीश्वर यांना देण्यात आले हे जितके औचित्यपूर्ण तितकेच ते त्यांच्याकडे ओघानेच यावे हे साहजिकच होय. मध्यप्रदेशातील मराठी लेखकांचा आपल्या भाषणात परिचय करून देताना अध्यक्षांनी जरी विनयाने आपले नाव गाळले असले तरी त्या प्रदेशातील लेखकांत गुणांनी त्यांचेच नाव अग्रभागी घेतले जावे एवढी त्यांची साहित्यसेवा थोर नि भरीव आहे. प्रा. सी. ई. एम. जोड यांच्यासारख्या विद्वानांनी मुक्तकंठाने प्रशंसिलेला प्रा. कवीश्वरांचा The Metaphysics of Berkeley हा तत्त्वज्ञानावरील इंग्रजी ग्रंथ जरी सोडला तरी 'नीती आणि

कलोपासना' हा तत्त्वचर्चात्मक ग्रंथ, 'वर्तमानकाळ' ही कादंबरी, 'पावित्र्यविडंबन वाद' हा चर्चात्मक ग्रंथ व 'फुलांची भेट' हा विविध ललित लेखांचा संग्रह वगैरे त्यांची भरीव साहित्यसेवा लक्षात घेतली तरी त्यांचे मध्य-प्रदेश साहित्य सृष्टीतील अग्रेसरत्व सहज सिद्ध होण्यासारखे आहे. इतकेच नव्हे तर इ. स. १९६१ साली प्रसिद्ध झालेला 'गीतातत्त्वदर्शन' हा श्रीमद्भगवद्गीतेचे नीतिशास्त्रदृष्ट्या सांगोपांग व तौलनिक समीक्षण करणारा ग्रंथ त्यांच्या साहित्यसेवेचा मुकुटमणी ठरावा एवढा महत्त्वाचा आहे. या ग्रंथाचे इंग्रजी भाषान्तर खुद्द लेखकानेच केलेले असून ते आपले राष्ट्रपती सर्वपल्ली राधाकृष्णन् यांच्या प्रशंसेस पात्र ठरलेले आहे. अशा तोलाचे व मोलाचे साहित्यलेखन करणाऱ्या ग्रंथकाराला मध्यप्रदेशातील साहित्यिकांनी प्रथम अधिवेशनाचे अध्यक्ष निवडले नसते तरच आश्चर्य वाटले असते. या निवडीबद्दल मध्यप्रदेशातील साहित्यिकांचे व खुद्द प्राचार्य कवीश्वरांचे मी हार्दिक अभिनंदन करतो.

या प्रथम साहित्य–संमेलनाचे अध्यक्ष या नात्याने प्राचार्य कवीश्वरांनी केलेल्या अध्यक्षीय भाषणाचे स्थूलमानाने तीन विभाग पाडता येतील. पहिल्या विभागात कवीश्वरांनी साहित्यनिर्मितीसंबंधीची तात्त्विक चर्चा केलेली आहे. दुसऱ्या विभागात मध्यप्रदेशातील मराठी साहित्याचा व मराठी साहित्यिकांचा धावता परिचय करून दिला आहे व तिसऱ्या विभागात पुण्या-मुंबईकडे होणाऱ्या मराठी वाङ्मयाच्या समालोचनात, परामर्षात, आढाव्यात व शाळा-कॉलेजांतील क्रमिक पुस्तकांत मध्य-प्रदेशातील साहित्यसेवा व साहित्यिक यांची सतत उपेक्षा होत असलेली पाहून, वाटणारी खंत प्रकट केली असून मुंबई-पुण्याबाहेरील मराठी भाषेच्या व साहित्याच्या जोपासनेला खरोखरच सक्रीव सहानुभूती दाखविण्याची महाराष्ट्राची इच्छा असेल तर तिच्या परिपूर्तीसाठी काही विधायक सूचनाही कवीश्वरांनी केल्या आहेत.

प्रस्तुत अध्यक्षीय भाषणातील साहित्याची निर्मिती व ललित साहित्याचे स्वरूप यासंबंधी केलेली तत्त्वचर्चा जरी विवाद्य असली अगर मध्यप्रदेशातील साहित्याची व साहित्यिकांची मुंबई-पुण्याकडे पद्धतशीर उपेक्षा होत असते हा आरोप अवास्तव अगर बहुतांशी गैरसमजावर अगर चुकीच्या माहितीवर व मूल्यमापनावर आधारलेला असला तरी मध्यप्रदेशातील किंबहुना महाराष्ट्राबाहेरील प्रदेशातील साहित्याची बूज राखली जावी यासंबंधी प्रा. कवीश्वरांना वाटणारी कळकळ अगर तळमळ ही अत्यंत प्रामाणिक आहे, त्या तळमळीच्या पाठी उदंड सद्भावना आहे याबद्दल शंका घेण्याचे कारण नाही. निदान प्राचार्य कवीश्वरांशी ज्यांचा प्रत्यक्ष परिचय झालेला असेल त्यांना त्यांची कळकळ किती सोज्वळ नि आन्तरिक असते हे सांगण्याचे सुतराम कारण नाही.

मात्र त्यांच्या भाषणातील पहिल्या दोन विभागांतील विचारसरणी विवाद्य आहे. ललित साहित्याची निर्मिती ही स्वान्त सुखाय नसून ती इतरांसाठी असते इतकेच नव्हे तर ती हेतुपुरःस्सर केली जाते हा कवीश्वरांचा दावा आहे. ही चर्चा नवीन नाही. प्रा. फडके यांनी वाङ्मयाचे रिझविणारे वाङ्मय व शिकविणारे वाङ्मय असे दोन प्रमुख भाग केले आहेत. त्याचप्रमाणे कलेसाठी कला व जीवनासाठी कला असे मानणारे दोन पक्षही वाङ्मयात पूर्वापार आहेत. इंग्रजी वाङ्मयात साहित्य–निर्मितीच्या Expression व Communication अशा दोन प्रणाली आहेत. या व लेखक आत्मसमाधानासाठी लिहितो, उद्बोधन करण्याच्या हेतूने लिहीत नसतो वगैरे अनेक प्रश्नांचा मराठी वाङ्मयात आजवर एवढा काथ्याकूट झालेला आहे की या प्रश्नांची आता चर्चा करणे म्हणजे शिळ्या कढीला ऊत आणण्यासारखे झाले आहे. या प्रश्नांच्या विचारांच्या बाबतीत मराठीतील साहित्य-समीक्षा आता एवढ्या प्रगल्भ अवस्थेला पोचलेली आहे की तिच्या पार्श्वभूमीवरून पाहिले असता प्रा. कवीश्वरांची चर्चा अगदी प्राथमिक स्वरूपाची (Elementary) वाटल्याशिवाय राहत नाही. त्या चर्चेत काही नावीन्य अगर नवीन मुद्दे आले असते तरीही ती जुनाट चर्चाही स्वागतार्ह वाटली असती. अर्थात मध्य-प्रदेशातील साहित्यिकांच्या प्रथम संमेलनात कवीश्वरांनी ती केलेली असल्यामुळे त्याबद्दल साहित्य-समीक्षेच्या बाबतीत प्रगल्भतेला पोचलेल्या पुण्या-मुंबईच्या टीकाकारांनी त्यावर आक्षेप न घेणेच इष्ट ठरेल. शिवाय त्यांच्या मताचे खंडन करायचे म्हणजे निराळे भाषणच लिहिले पाहिजे. आणि ते लिहिले तरी प्रश्न विवाद्यच राहाणार !

अध्यक्षीय भाषणाचा दुसरा भाग मध्यप्रदेशातील मराठी वाङ्मयाच्या परिचयाला वाहिलेला आहे. या भागात तांब्यांच्या एका दुर्मिळ काव्याचा कवीश्वरांनी उल्लेख केला असून त्या काव्यातील काही ओळीही उद्धृत केल्या आहेत.

अठरा वर्षांच्या विद्यार्थी तांब्यांनी लिहिलेल्या या कवितेचे कौतुक कवीश्वरांनी इतक्या उत्कटतेने केलेले पाहून काव्य-मर्मज्ञांना आश्चर्य वाटेलच पण महाराष्ट्रात प्रचलित असलेल्या समग्र तांबे कविता–संग्रहात या काव्याचा समावेश न केल्याबद्दल कवीश्वरांना खंत वाटावी याचेही आश्चर्यच वाटेल! किंबहुना वाङ्मयाच्या मूल्यमापनाची हीच पट्टी त्यांनी मध्यप्रदेशातील अलीकडील मराठी साहित्याला लावल्यामुळे त्यांना त्या वाङ्मयाची थोरवी प्रतीत व्हावी व या वाङ्मयाची उपेक्षा मुंबई–पुण्याकडील साहित्यिकांनी व नियतकालिकांनी केल्याबद्दल त्यांना त्यांनी दोष द्यावा हे साहजिकच म्हटले पाहिजे. वास्तविक पाहता कोण कोणाची उपेक्षा करीत नसतो. आपल्याला मान्यता अगर लोकप्रियता मिळाली नाही म्हणून आपली उपेक्षा झाली असे म्हणणारे लेखक मध्यप्रदेशातच आहेत आणि ते मुंबई–पुण्याकडे नाहीत असे मानण्याचे मुळीच कारण नाही. लेखक केवळ आपल्या वाङ्मयीन गुणांनी पुढे येतो. तो स्तुतिपूजकांच्या कारवायांनी प्रसिद्धीस येतो या म्हणण्यात फारसा अर्थ नाही. आणि अल्पकाळ तो प्रकाशात आला तरी त्याच्या वाङ्मयात जर मुळात प्रभावी सामर्थ्यच नसेल तर तो फार वेळ टिकाव धरू शकत नाही. तेव्हा मध्यप्रदेशातील मराठी लेखकांची मुंबई–पुण्याच्या लेखकांनी अगर नियत-कालिकांनी उपेक्षा केली या आरोपाला फारसा आधार नाही. तांबे व रा. अ. काळेले यांच्या कवितांच्या बरोबरच मध्यप्रदेशातील श्री. गोविंद झोकरकर व कै. भालचंद्र लोवलेकर या दोन कवींच्या कवितांना "मराठी कविता १९२०–१९५०" या मुंबई मराठी साहित्य संघाने प्रकाशित केलेल्या प्रातिनिधिक कवितांच्या संग्रहात स्थान मिळालेले आहे. त्यांच्याबद्दल जर उपेक्षेची भावना संपादकांच्या मनात असती तर त्यांच्या कवितांना ते स्थान मिळाले असते काय याचा कवीश्वरांनी अवश्य विचार करावा. मात्र गंमत ही की मध्यप्रदेशातील अलीकडील मराठी साहित्याचा आढावा घेताना कवीश्वरांना ही नेमकी नावे आठवली नाहीत! त्यांनी ती विशिष्ट हेतूने वगळली आहेत असे म्हणण्याचा माझा आशय नाही. पण असा आढावा घेताना अशा चुका सहजगत्या होत असतात हे कवीश्वरांनी मान्य केले तरी पुरे आहे. दुसरी गोष्ट अशी की मध्यप्रदेशातील ज्या वाङ्मयाची उपेक्षा होत आहे असे कवश्विर म्हणतात त्याच्यापेक्षा वाङ्मयीन गुणांनी कितीतरी पटींनी श्रेष्ठ असलेल्या इकडील लेखकांच्या साहित्याला अपेक्षित मान्यता अद्यापि मिळावयाची आहे, ही वस्तुस्थितीही कवीश्वरांनी लक्षात घ्यावी. आपला तो बाळ्या ही आत्मीयता ठीक आहे पण तो बाळ्या इतर बाळ्यांच्यापेक्षा किती कनिष्ठ आहे याचाही विचार केला पाहिजे. भा. रा. तांबे यांच्या कविता धुंडाळून त्या पुस्तकरूपाने महाराष्ट्रातीलच कवींनी प्रसिद्ध केलेल्या आहेत. उच्च वाङ्मयीन गुणांचे चीज करण्याच्या बाबतीत प्रादेशिकता नडलेली अगर आडवी आलेली नाही, हे कवीश्वर सोयीस्कररीतीने विसरलेले दिसतात. जे वाङ्मय उत्कृष्ट आहे, उत्तम दर्जाचे आहे ते मध्यप्रदेशातील असो, गोमंतकातील असो, मराठ-वाड्यातील असो अगर पंजाबातील असो त्याचे चीज पूर्वी झाले आहे, आज होत आहे व पुढेही होत राहील याबद्दल कवीश्वरांनी निःशंक असावे. प्रश्न निर्माण होतो तो फक्त दुसऱ्या अगर तिसऱ्या दर्जाच्या वाङ्मयाचा. त्या वाङ्मयाचे कौतुक स्वजनांनी करायला प्रत्यवाय नाही. फक्त ते इतरांनीही केले पाहिजे असा आग्रह न धरलेलाच बरा.

महाराष्ट्राच्या बाहेरील मराठी भाषेच्या व साहित्याच्या जोपासनेला सहानुभूती दाखविण्याच्या दृष्टीने कवीश्वरांनी तिसऱ्या भागात ज्या सूचना केल्या आहेत त्या विधायक स्वरूपाच्या अतएव कळकळीच्या असल्यामुळे स्वागतार्ह आहेत. त्यांच्या भाषणातील तो भाग येथे उद्धृत करणेच इष्ट वाटते. कवीश्वर लिहितात—

"प्रतिवर्षी महाराष्ट्रातील एखाद्या प्रमुख स्थानी मराठीतून वादविवाद, चर्चा, परिसंवाद करवून त्यात बाहेरील निवडक विद्यार्थी मुद्दाम बोलवावे ; व त्यांच्या-साठी विशेष पुरस्कार ठेवावे. याच दृष्टीने खास लेख प्रतियोगिताही आयोजित व्हाव्या. विद्यार्थ्यांसाठी क्रमिक पुस्तकातील उतारे निवडताना, आणि अभ्यास-क्रमात पुस्तके नेमताना बाहेरील चांगल्या साहित्याचा त्यात अवश्य कर्तव्यबुद्धीने समावेश केला जावा. यायोगे महाराष्ट्रातील नवीन पिढीत बाहेरील मराठी लेखकांच्या विचारांची माहिती होत राहील आणि बाहेरील मराठी साहित्यास उचित प्रोत्साहनही मिळेल. महाराष्ट्रात प्रसिद्ध होणाऱ्या मराठी वाङ्मय समालोचनात बाहेरील साहित्याची उपेक्षा होऊ नये."

मध्यप्रदेशात नवीनच स्थापन झालेल्या मध्यप्रदेश साहित्य परिषदेला मराठी साहित्य महामंडळावर आता

प्रतिनिधित्व देण्यात आलेले असल्यामुळे,त्या प्रतिनिधीच्या-मार्फत साहित्य महामंडळापुढे आपल्या प्रदेशातील साहित्यिकांच्या अडचणी मांडण्याची सोय निर्माण झाली आहे. त्या सोयीचा फायदा घेण्याचे आवाहन अध्यक्ष या नात्याने प्रा.कवीश्वरांनी त्या प्रतिनिधीस जरुर करावे.किंबहुना मध्यप्रदेशातील मराठी साहित्यिकांची दुःखें एवढ्या प्रभावीपणाने अध्यक्षीय भाषणातून मांडणाऱ्या प्राचार्य कवीश्वरांनाच महामंडळावर प्रतिनिधी म्हणून तेथील साहित्य परिषद निवडून देणार नाही कशावरून ! तसे झाले तर मध्यप्रदेशातील लेखकांची दुःखें अगर त्यांची व्यथा महामंडळाच्या वेशीवर टांगण्याची कवीश्वरांना चांगलीच संधी मिळेल.

## प्रा. वाडेकर, जोग, सहस्रबुद्धे–षष्ट्यब्दपूर्ती

पुण्याच्या फर्ग्युसन महाविद्यालयातील तत्त्वज्ञान विषयाचे प्राध्यापक देवीदास द. वाडेकर, त्याच महाविद्यालयातील मराठीचे प्राध्यापक व सुप्रसिद्ध ग्रंथकार व टीकाकार रा. श्री. जोग व सर परशुरामभाऊ महाविद्यालयातील मराठीचे प्राध्यापक व मराठीतील एक विचारवन्त लेखक व टीकाकार डॉ. पु. ग. सहस्रबुद्धे यांना चालू वर्षी ६० वर्षे पुरी होत असून त्यांच्या षष्ट्यब्दपूर्तीनिमित्त त्यांचा प्रकट सत्कार करण्यासाठी सत्कार समित्याही स्थापन झालेल्या आहेत. हे तिघेही प्राध्यापक आपापल्या विद्यार्थ्यांत एवढे लोकप्रिय आहेत की वयोमानाने त्यांची होणारी सेवानिवृत्ती संस्मरणीय ठरावी म्हणून त्यांच्या वाङ्मयाचे व कामगिरीचे समालोचन करणारे स्मारक-ग्रंथही छापले जात आहेत हे स्तुत्यच होय.

हे तीनही प्राध्यापक आपल्या विद्यार्थिवर्गातच प्रिय आहेत असे नसून,महाराष्ट्राच्या व महाराष्ट्राबाहेरच्या मराठी भाषिकांतही आपल्या व्याख्यांनानी नि साहित्यसेवेने ख्यात-नाम झालेले आहेत. प्रा. वाडेकर व प्रा. रा. श्री. जोग यांचा म. सा. परिषदेशी असलेला साक्षात् संबंध तर फारच जुना आहे. चिटणीस, कार्याध्यक्ष, पत्रिकेचे संपादक या विविध नात्याने त्यांनी परिषदेच्याकार्यात विशेष रस घेतलेला आहे.ठाणे येथे भरलेल्या मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्ष-पद देऊन मराठी साहित्यिकांनी प्रा. जोगांचा योग्य असा गौरव पूर्वी केलाच आहे. डॉ. पु. ग. सहस्रबुद्धे यांनी अनेक विचारप्रवर्तक स्फुट लेख लिहून मराठी वाचकांच्या विचारांना चालना दिलेली आहे. त्यामुळे त्यांची साहित्यसेवा मराठी भाषिकांना अपरिचित नाही. प्रा. रा. श्री. जोग व डॉ. पु. ग. सहस्रबुद्धे यांची नुसती नावे उच्चारली तरी त्यांचे सारे वाङ्मय डोळ्यांपुढे यावे इतके ते वैशिष्ट्यपूर्ण आहे. हे तीनही प्राध्यापक सेवानिवृत्त होत असले तरी आपल्या आवडीच्या व व्यासंगाच्या विषयावरील लेखन करीत राहण्याइतकी उमेद व मनाची उभारी त्यांच्या ठिकाणी आहे. म्हणूनच त्यांच्या वयाला साठ वर्षे पूर्ण होऊन त्यांनी ६१ व्या वर्षात पदार्पण केल्याबद्दल मी त्यांचे हार्दिक अभिनंदन करतो व आपले आवडते लेखन सतत चालू ठेवण्यासाठी त्यांना परमेश्वराने निरामय जीवन व दीर्घायू द्यावे अशी प्रार्थना करतो.

## संगीत–नाटक अकादमीचे फेलो–वरेरकर

सुप्रसिद्ध नाटककार श्री. भा. वि. ऊर्फ मामा वरेरकर यांची भारताच्या संगीत–नाटक अकादमीचे फेलो म्हणून नियुक्ती झाली आहे. भारताच्या सांस्कृतिक जीवनातील अत्यंत मोठा मान श्री. वरेरकर यांना मिळाल्याबद्दल मी त्यांचे मनापासून अभिनंदन करतो. श्री. वरेरकरांचे सुरुवातीचे जीवन अत्यंत हालाचे, उपेक्षेचे व मान-हानीचे गेलेले असल्यामुळे त्यांच्या अखेरच्या दिवसांत त्याची चक्रवाढव्याजाने सुतराम भरपाई झाल्याचे भाग्य पाहण्याचे त्यांच्या वाट्याला यावे याबद्दल कोणालाही आनंदच होईल. लोकसभेवर त्यांची नेमणूक करून व पद्मभूषण ही पदवी देऊन भारत सरकारने त्यांचा बहुमान या पूर्वीच केला आहे. आता संगीत–नाटक अकादमीचे फेलो म्हणून झालेल्या त्यांच्या नियुक्तीने त्यांच्या नाट्यसेवेचा गौरवच अकादमीने केला आहे, हे योग्य असेच झाले. या मानापुढे विद्यापीठाची डॉक्टरेट ही पदवी फारच कमी प्रतीची समजली पाहिजे. वरेरकरांच्या वाङ्मयाचा अभ्यास करून त्या अभ्यासाचा परिपाक प्रबंध रूपाने लिहिणाऱ्या कोणाही विद्यार्थ्याला ती मिळाली आहे, मिळतच आहे. हे सर्व उच्च मान मिळ-विण्यासाठी मामांना आयुष्यभर झगडावे लागले, प्रतिकूल परिस्थितीशी टक्कर द्यावी लागली व प्रसंगी समाजात प्रतिष्ठित समजल्या जाणाऱ्या व्यक्तींच्याकडून अवहेलना अगर उपेक्षाही सहन करावी लागली. ते दिवस आठवले की मामांना आजही अंगावर शहारे आल्यासारखे वाटत असेल ! पण ते दिवस आता संपले आहेत व सोन्याचे, वाढत्या वैभवाचे दिवस पाहण्यासाठी मामा ८० व्या वर्षापर्यंत जगले आहेत. एक वर्ष पुढेही सरकले आहेत व यापुढेही अनेक वर्षे या सुखाचा आस्वाद घेण्यासाठी जगणार आहेत, जगावेत असे आम्हा सर्वांना वाटत आहे. मामांना मी दीर्घायू चिंतितो.

वा. रा. ढवळे

अनुक्रमणिका

प्रो. गो. म. कुलकर्णी

# हरिभाऊ : एक संस्मरण

**एकोणवीसशे चौसष्ट साली हरी नारायण ापटेंच्या जन्माला एक शतक पूर्ण होते. ांच्या मृत्यूलाही आता जवळजवळ अर्धशतक ्त आले. स्वकालिनांची सुखदुःखे आशा-ाशांक्षा प्रगट करणारा त्यांच्यासारखा ललित-खक विरळा; या प्रातिनिधिकत्वामुळेच 'पुढल्या ाडीपासून चुलीपर्यंत व दिवाणखान्यातील ालापासून फणीकरंडीच्या पेटीपर्यंत ' त्यांच्या ाहित्याचा शिरकाव झाला. 'हरिभाऊ' हे ढ झालेले त्यांचे घरगुती नाव वाचकांच्या ांच्यावरील प्रेमाचेच निदर्शक आहे.**

एकेकाळचे हरिभाऊंबद्दलचे हे वाचकांचे प्रेम आजच्या द्लेलेल्या कालपरिस्थितीत कमी होणे स्वाभाविक आहे. ाम्मवंत पण कालौघात जुन्या ठरणाऱ्या कलावंताच्या ाट्याची हीच नियती असते. स्वकालात लोकप्रियतेच्या ाखरावर आरूढ झालेल्या या व्यक्ती, कालांतराने विस्मृ-ीच्या धुक्यात लोपल्यासारख्या होऊन त्यांच्या कर्तृत्वाचा ्त एक विरल ठसा तेवढा उत्तरकालिनांच्या मनावर माटलेला राहतो. आणि त्यामुळेच तर या इतिहासजमा ाणाऱ्या कलावंतांची स्मृती वारंवार विचक्षणपणे ागविण्याची गरज निर्माण होते. त्यातून उत्तरकालिनांची वळ कृतज्ञता बुद्धीच प्रकट होते असे नाही तर अशा स्मरणाने आपला 'परंपराप्राप्त' ठेवा काय आहे ते ाष्ट लक्षात येते; वर्तमानाचे भूतकालाशी असलेले नाते लगडले जाऊन जुन्याचे काही धागे नव्याने गवसण्याची क्यता निर्माण होते. कर्तृत्वावर अधिक प्रकाश इन त्याने पुढिलांच्या वाटचालीची दिशा उजळली जाते. सा होण्यास अर्थातच ज्या व्यक्तित्वाचे वा कर्तृत्वाचे रण करावयाचे ते व्यक्तित्व वा कर्तृत्व स्वकालाच्या ध्यवर्ती असलेले, त्या कालाचे प्रतिनिधित्व करणारे, ाही अंशी त्या कालाला नवी कलाटणी देणारे असे सावयास हवे. हरिभाऊंचे कर्तृत्व या तोलामोलाचे होते त वाद नाही.

हरिभाऊंचा कालखंड (१८६४–१९१९) म्हणजे ाराष्ट्राच्या जीवनात निर्माण झालेल्या प्रचंड जागृतीचा, उत्साहाचा, नवपरंपरा निर्मितीचा कालखंड. चिपळूणकर, रानडे, गोखले, टिळक, आगरकर यांच्या कर्तृत्वाच्या ऐन उमेदीचा कालखंड हाच. हरिभाऊंच्या बालपणीच इंग्रजी अनुकरणाचे ढोबळ पर्व संपून विष्णुशास्त्र्यांच्या तेजस्वी पर्वाला प्रारंभ झाला होता. इंग्रजी विद्यारूपी वाघिणीचे दूध पचवून स्वतंत्रपणे, स्वावलंबी बाण्याने स्वार्थत्याग-पूर्वक लोकजागृती घडवून आणणे; हे त्या काळच्या सुजाण सुशिक्षितांचे नियत कार्य होते; ते करीत असता मतमतांतरे माजून जे वादंग उसळले तेही याच कालात.

या साऱ्या गलबल्याच्या केंद्रस्थानी-पुण्यात-हरिभाऊंचा जन्म झाला. त्यांचे सारे शिक्षणही येथेच झाले. आयुष्याच्या पूर्वार्धात वा उत्तरार्धात चिपळूणकर, आगरकर, टिळक, रानडे, गोखले या साऱ्या लोकाग्रणींशी त्यांचा निकट संबंध आला. या साऱ्यांचे त्यांच्या प्रकृतीवर समाजप्रवण ध्येयवादी वृत्तीचे प्रबळ संस्करण होण्यास साह्य झाले असावे. त्यांच्या मतांवर व व्यक्तित्वावर या साऱ्यांचा तीव्र ठसा स्पष्ट दिसतो. वाचन, मनन चिंतनाने या साऱ्या संस्कारांचे एक विशिष्ट रसायन त्यांच्या मनःकोशात तयार झाले होते. राष्ट्रवादाचे त्याला वावडे नसले तरी त्यात जहाल राष्ट्रवादापेक्षा नेमस्त सुधारणांचा अंश अधिक होता. सुधारणावादातील चंडखोरीपेक्षा त्यातील उदार, सहिष्णु, विकासवादी विधायक अंगांवर हरिभाऊंचा अधिक भर होता. पदवी संपादून सुधारणावादातील हा विधायक आशय स्वजीवनात उतरविण्याचे स्वप्नही त्यांनी उराशी बाळगले होते. परिस्थितीने हे जमले नाही; तथापि विविध प्रकारच्या सामाजिक कार्यांत विविध प्रकारे भाग घेऊन (पुणे म्युनिसिपालिटीचे अध्यक्ष, प्लेगमधील स्वयं-सेवक, प्रांतिक परिषदेचे स्वागताध्यक्ष, डेक्कन सभेचे चिटणीस इ.) त्यांनी आपले समाजविषयक कर्तव्य पार पाडले. साहित्यनिर्मिती व सार्वजनिक कार्य यांची युती तत्कालीन जीवनात आढळत असली तरी हरिभाऊंच्या वाङ्मयनिर्मितीचा तीन तपांचा प्रचंड व्याप लक्षात घेता त्यांचे हे सामाजिक क्षेत्रातील कर्तृत्व स्वतंत्रपणे नजरेत भरते.

तीसपस्तीस वर्षे स्वतःचा लेखनप्रपंच संभाळून हरिभाऊंनी इतर दृष्टीने केलेले वाङ्मयीन कार्यही कमी महत्त्वाचे नाही. 'करमणूक' पत्राचे संपादक म्हणून त्यांनी केलेली कामगिरी या दृष्टीने विशेष लक्षात घेण्यासारखी. नियतकालिकांशी संपादक म्हणून वयाच्या बाविसाव्या वर्षापासूनच त्यांचा संबंध आला. १८८६ मध्ये त्यांनी कानिटकर मंडळींच्या साह्याने 'मनोरंजन' नावाचे मासिक काढले. विष्णुशास्त्र्यांच्या स्मरणार्थ निघालेल्या 'निबंध-चंद्रिके'चा जीर्णोद्धार करण्याचाही त्यांनी काही काल प्रयत्न केला. प्रचाराभिमुखतेच्या त्या कालात एखादे नियतकालिक हाताशी असणे ही तत्कालिनांची निकडीची गरज होती. परंतु हरिभाऊंना नियतकालिक हवे होते ते प्रचाराच्या धुमश्चक्रीसाठी नव्हे. हरिभाऊंचा मुळापासूनच भर होता तो तार्किक युक्तिवादापेक्षा किंवा खंडनमंडनापेक्षा भावनात्मक आवाहन करून वाचकांचे हृदयपरिवर्तन घडवून आणण्यावर. यासाठी 'लहानापासून थोरांपर्यंत सर्व स्त्री-पुरुषांचे मनोरंजन करून ज्ञानदान करणारे' 'करमणूक' साप्ताहिक त्यांनी १८९० मध्ये काढले; आणि आर्थिक, शारीरिक, मानसिक झीज सोसून ते सतत सत्तावीस वर्षे चालविले.

'करमणूक' पत्राने पुरविलेल्या साहित्यात काव्य, कथा, नाटक, कादंबरी यांखेरीज चरित्रे, निबंध, प्रवासवर्णने, पत्रे, शास्त्रीय लेख, विनोदी चुटके, एवढेच नव्हे तर आज ज्याला खास 'बालसाहित्य' वा 'स्त्रीसाहित्य' म्हटले जाते अशाही साहित्याचा अंतर्भाव होतो.'करमणूक'-पत्रांतील या विविध प्रकारच्या 'काव्यशास्त्रविनोद' प्रचुर साहित्याने वाचकांच्या अभिरुचीला प्रौढ, उन्नत वळण लागले. हरिभाऊपूर्व कालांतील सामान्य अभिरुचीच्या पार्श्वभूमीवर हरिभाऊंची ही कामगिरी विशेषच उठून दिसते.

हे वळण लावण्यासाठी स्वतः हरिभाऊंनी या पत्रातून कितीतरी प्रकारचे लेखन केले. विविध प्रकारच्या लेखनाची त्यांची हौस, व त्या लेखनाचे विपुलत्व लक्षात घेता केळकरांच्या कितीतरी आधी 'साहित्यसम्राट' ही पदवी हरिभाऊंना मिळावयास पाहिजे होती. केळकरांप्रमाणेच नवनव्या वाङ्मयप्रकारांना व प्रवृत्तींना हरिभाऊंनी उचलून धरले. केशवसुतांच्या कवितांचे त्यांनी केलेले संपादन, देवलांच्या नाटकांना त्यांनी लिहिलेल्या प्रस्तावना किंवा टागोरांच्या 'गीतांजली'चा हरिभाऊकृत अनुवाद या संदर्भात लक्षात घेतला तरी पुरे. हरिभाऊंच्या चतुरस्र वाङ्मय व्यासंगात इंग्रजी, संस्कृत वा मराठी साहित्याचाच अंतर्भाव होत होता असे नाही. वाङ्मयप्रेमाने बंगाली व फ्रेंच या भाषांचेही त्यांनी अध्ययन केले होते. रसिक वाङ्मयप्रेम हा हरिभाऊंचा स्थायीभाव होता.

या रसिकतेमुळे व जीवनाच्या व्यापक स्वरूपाच्या कलात्मक जाणिवेमुळे कोणत्याही गोष्टीचा ते सहानुभूतीने, अनाग्रही प्रांजळ वृत्तीने विचार करू शकले. पक्षाभिनिवेशी एकांड्या शिलेदारीच्या त्या काळातही त्यांची समतोल वृत्ती ढळली नाही. पुरोगामी वृत्तीचे हरिभाऊ 'आनंदाश्रमा'सारख्या सनातनत्वाकडे झुकणाऱ्या संस्थेची धुरा जन्मभर वाहू शकतात; बुद्धिनिष्ठ सुधारणावाद व भावनानिष्ठ राष्ट्रवाद यांची सांगड घालू शकतात; किंवा भावानंद आणि यशवंतराव, यमू आणि मेहेरजान, सावळ्या व शेलारमामा, शिवाजी आणि रणदुल्लाखान, शंकर मामंजी आणि डॅण्डी अशा प्रकारच्या विविध कक्षेत वावरणाऱ्या शे दोनशे पात्रांचे सहृदयतेने चित्रण करू शकतात; याचे रहस्य हेच. सामाजिक आणि राजकीय, वास्तव आणि अद्भुत, ध्येयवाद आणि उपयुक्ततावाद यांसारखी द्वंद्वे हरिभाऊ जे पेलू शकले, याचे मूळ त्यांच्या वर निर्देशिलेल्या रसिक, कलावृत्तीतच सापडेल.

तसे पाहिले तर हरिभाऊंची वाङ्मयविषयक भूमिका शंभर टक्के बोधवादी आहे. तिचा त्यांनी आवर्जून पुरस्कारही केला आहे. अकोला साहित्य संमेलनाच्या (१९१२) अध्यक्षीय पदावरून भाषण करताना त्यांनी प्रारंभीच 'वाङ्मय हे राष्ट्राच्या उन्नतीचे कारणही आहे व कार्यही आहे, असे प्रतिपादिले असून याच भाषणात (१) शिक्षण देणे (२) मनोविकार किंवा विचार जागृत करणे आणि (३) मनोरंजन करणे, असे वाङ्मयाचे त्रिविध हेतू असल्याचे सांगितले आहे. या १९१२ सालच्या किती तरी आधी स्वतःच्या कादंबरीलेखनाच्या प्रारंभकाळीच (१८८५) कादंबरीलेखनाचे उद्दिष्ट स्पष्ट करताना ते म्हणतात :– "कादंबरीचा उद्देश मनोरंजन हा आहेच. पण त्याबरोबरच समाजाला सद्बोध करून त्यास सन्मार्गास लावण्याचे सत्कार्य कादंबऱ्यांच्या हातून होणे जरूर आहे." ('हरिभाऊ' – डॉ. भिंगारे पृ. ९९). विवेचनाचा हाच सूर १९१८

साली म्हणजे आयुष्याच्या शेवटी शेवटीही कायम आहे.[१] प्रसंगोपात इतरत्रही[२] त्यांनी याच मुद्याचा पाठपुरावा केलेला असून त्यांच्या 'विदग्ध वाङ्मया' वरील व्याख्यानातही याच मुद्द्याला प्राधान्य आहे.

कलावादाच्या दृष्टिकोणातून हरिभाऊंच्या या वाङ्मय-विषयक भूमिकेवर अनेक आक्षेप घेणे शक्य असले तरी व्यर्थ आहे. कलेमागे 'हेतुसंशोधनाचा गुप्त पोलीस' न लावण्याचा काल अद्यापि अवतीर्ण व्हावयाचा होता. हरिभाऊंच्या काळात वाङ्मयाच्या बोधवादी भूमिकेबद्दल कोणाच्या मनात काही किंतु येण्याचे कारण नव्हते. ही भूमिका पूर्वापार चालत आलेली असून चांगली वहिवाट-लेली होती. अव्वल इंग्रजीतील साहित्य-निर्मितीने या वहिवाटीला बळकटीच आणली होती. हरिभाऊंची महती हा बोधवाद पत्करण्यात नसून त्यांच्यातील अंग-भूत कलासामर्थ्याने त्यावर मिळविलेल्या विजयात आहे. एखाद्या निर्मितीची महत्ता कलावंताने पत्करलेल्या बौद्धिक तत्त्वज्ञानावर फारशी अवलंबून नसून त्याच्या आंतरिक प्रामाणिकतेवर, तन्मयतेवर व निर्मितीच्या मूलभूत सामर्थ्यावर कशी अवलंबून असते, याचे हरिभाऊ हे एक ठळक उदाहरण.[३]

ललितसाहित्याने सहेतुकपणे विशिष्ट मूल्यांचा प्रचार करावा की करू नये, याचे तात्त्विक उत्तर काहीही असले तरी तीव्र सामाजिक जाणीव व त्याची थोडीफार कला-त्मक प्रतीती हरिभाऊ वगळल्यास मराठी साहित्यात तरी दुर्मिळ आहे. याची साक्ष गांधीवादी वा मार्क्सवादी मूल्यांचा अंगीकार करून लिहिले गेलेले हरिभाऊंनतरचे ललितसाहित्यच देते.

वस्तुतः हरिभाऊंनी आपल्या ललितसाहित्यातून काही विचारमूल्ये सरळपणे पत्करलेली आहेत. मानवाच्या सर्व प्रकारच्या (राजकीय, आर्थिक, सामाजिक, धार्मिक इ.) विमोचनाचे जे एक नवे तत्त्वज्ञान त्या काली रूढ होऊ पहात होते, त्याचा अंगीकार हरिभाऊंनी केलेला आहे. या तत्त्वज्ञानाचे सूत्र न्या. रानडेंनी विशद केले आहे ते असे :—

"You cannot have a good social system when you find yourself lone in the scale of political rights, nor can you be fit to exercise political rights and privileges unless your social system is based on reason and justice. You cannot have a good economical system when your social arrangements are imperfect. If your religious ideals are low and grovelling, you cannot succeed in social, economical and political spheres."

—Miscellaneous writings
Page 231–232

---

१ "लोकांना काही तरी शिकविण्याच्या हेतूनेच अगर एखादे ध्येय त्यांच्यापुढे ठेवण्याच्या हेतूनेच कादंबरी लिहिणे शक्य आहे." —'आठवणी आणि कादंबऱ्या'— वाग्भट देशपांडे पृ. ३२

२ "केवळ मनोरंजन हाच काही नाटक, काव्य, कथा इत्यादींचा हेतू नव्हे तर वस्तुस्थितीचे हुबेहुब चित्र दाखविणे व लोकमत शिक्षित करणे हा एक हेतू होय." — 'शारदा' प्रस्तावना.

३ काशीबाई कानिटकरांना लिहिलेल्या एका पत्रात (पत्र क्रमांक २८ 'हरिभाऊंची पत्रे') हरिभाऊंनी स्वतः-च्या दोन कथांची केलेली तुलना या दृष्टीने लक्षणीय आहे. या पत्रात ते लिहितात:—"खरी का खोटी" तुम्ही वाचून तुम्हांला आवडली हे वाचून मला आनंदापेक्षा आश्चर्य फार वाटले. मला ती गोष्ट आपल्या हातून बरी वठली असे वाटत नाही. याचे कारण सांगतो. 'पाड-ब्याला भेट' ज्या वेळी लिहिली त्या वेळी राधाबाई, कृष्ण-राव वगैरे मंडळी मला अगदी खरी अशी मानून त्यांच्या आनंदाबरोबर आनंद, शोकाबरोबर शोक याप्रमाणे माझ्या मनाचे तादात्म्य झाले. तिसरे प्रकरण लिहीत असताना मी कितीतरी वेळा लिहीत असलेला कागद पलीकडे सारून डोळ्यांवाटे गालांवर घळघळणारे अश्रू पुसण्याकरिता उपरणे घेतले असेल. ही गोष्ट पुरी झाली तेव्हा मी आपल्या स्वतःशी असा उद्गार काढला की. 'जरी सर्व दुनियेने या गोष्टीस नीरस म्हटले तरी मी कालत्रयीही म्हणणार नाही.' 'खरी का खोटी' ही गोष्ट मी पाच दिवसांत लिहिली. पण मला त्यातली पात्रे कळ-सूत्री बाहुल्याप्रमाणे आहे, असे वाटले. खरी वाटेनात. मला रड्ड तर कोठेही आलेले नाही. असो. एकंदर लोकांस व वर्तमानपत्रांस जर बरी वाटली तर चांगलेच झाले म्हणावयाचे!"

विमोचनाच्या या विचारश्रेणीत शेवटी महत्त्व होते ते व्यक्तीला व तिच्या स्वातंत्र्याला. व्यक्तिविमोचनाचा कुटुंबविमोचनाशी असलेला संबंध लक्षात घेतला म्हणजे तत्कालीन सुधारकांनी स्त्रीविषयक सुधारणांना ( स्त्रीशिक्षण, प्रौढविवाह, पुनर्विवाह इ. ) अग्रस्थान का दिले होते ते स्पष्ट होते.[1] 'आजकालच्या गोष्टी'त कुटुंबचित्रणाला प्राधान्य का प्राप्त होते; व्यक्तिदर्शनात हरिभाऊ व्यक्तित्वापेक्षा ( Individual ) प्रवृत्तिचित्रणावर ( Types ) भर का देतात याचाही यावरून उलगडा होतो. हरिभाऊंचा ध्येयवाद आणि वास्तववादही ( आशय दृष्ट्या ) कोणत्या जातीचा होता तेही यावरून कळते.

कुटुंबविषयक सुधारणांची महाराष्ट्रात प्रथम जाग आली ती मध्यमवर्गीय सुशिक्षित पांढरपेशात. या सुधारणांना तात्त्विक विरोध झाला तोही याच समाजातून. या समाजाचेच चित्रण या संदर्भात महत्त्वाचे ठरल्याने त्यांच्या वास्तववादाला 'सदाशिवपेठी' घाट आपोआपच प्राप्त झाला. याबाबतीत त्यांना क्वचित जो बोल लावण्याचा प्रयत्न होतो, तो त्यांच्यावर अन्याय करणारा आहे. तत्कालिनांचीच नव्हे तर त्यानंतरच्याही बऱ्याचशा लेखकांची बैठक अशी पांढरपेशीच आहे.[2] यामुळे या वास्तववादाच्या ज्या काय मर्यादा असतील त्या, त्या कालाच्याच वैचारिक मर्यादा मानल्या पाहिजेत. हरिभाऊंच्याही आधी ललितसाहित्यात वास्तववाद यावयास पाहिजे, असे मत मांडणारे श्री. का. का. मराठे, कादंबरीतून फार 'उच्च' वा फार 'नीच' लोकांचे चित्रण नसावे असेच म्हणतात. असे म्हणण्यामागची त्यांची भूमिका काहीशी वेगळी असली तरी परिणामतः तीत फरक पडत नाही.

मराठे किंवा कुंटे यांनी हरिभाऊंच्याही आधी या वास्तववादाचा स्थूलपणे पुरस्कार केलेला असला तरी त्याचा पहिला पद्धतशीर आविष्कार झाला तो हरिभाऊंच्याच लेखनात. त्याला तात्त्विक अधिष्ठान प्राप्त झाले, तेही हरिभाऊंच्या कालातच. त्या काळी नव्याने आलेल्या स्वाभाविकता, नैसर्गिकता, ऐहिकता, भौतिकता, उपयुक्तता इत्यादि विचारमूल्यांनी या वाङ्मयीन वास्तववादाची तांत्रिक जडणघडण केली होती. कार्यकारणभावाच्या विज्ञाननिष्ठ कल्पनेने वा उत्क्रांतिवादातील व्यक्ति-परिस्थितीविषयक मीमांसेने त्याला तात्त्विक अधिष्ठान मिळवून दिले होते. कला म्हणजे जीवनाचे अनुकरण ( An imitation of life ) या पाश्चात्त्य कल्पनेचाही पगडा हरिभाऊसारख्यांवर बसलेला असणे शक्य आहे. डिकन्ससारख्या हरिभाऊंच्या आवडत्या कादंबरीकाराने ज्या प्रकारे सामाजिक वास्तवाचे चित्रण केले त्यानेही हरिभाऊंच्या मनांत विशिष्ट वास्तववादी कल्पना रुजल्या असाव्यात. 'माझ्या कादंबरीत असे एकही पात्र नाही की जे मी पाहिलेले नाही' ( वेणूबाईलिखित चरित्र पृ. २०४ ) या हरिभाऊंच्या अभिमानोद्गारावरून किंवा ललितलेखकाला, 'पात्रांच्या स्थितिरीतीचे यथातथ्य वर्णन करण्याची शक्ती असण्याची जी आवश्यकता त्यांनी आविष्कारदृष्ट्या प्रतिपादन केली आहे. ( 'आजकालच्या गोष्टी'चे प्रास्ताविक ) तीवरून त्यांना वाङ्मयदृष्ट्या कोणत्या प्रकारचा वास्तववाद अभिप्रेत होता ते स्पष्ट होते.[3]

---

१ केशवसुतकृत 'पण लक्षात कोण घेतो'च्या कर्त्यांची प्रशंसा या भूपृष्ठस्थिता आद्य दैवतांच्या चित्रणासाठीच 'स्त्रियांची परवशता' दूर करण्याची प्रतिज्ञा करणारा हरिभाऊंचा नायक गणपतराव व त्याचे विचार या दृष्टीने पहावेत.

२. विष्णुशास्त्री चिपळूणकरांच्या वाङ्मयाचे स्वरूप पाहिले किंवा खुद्द आगरकरांनी ज्या 'तरुण सुशिक्षितांस विज्ञापना' केली आहे, ते सुशिक्षित कोण होते हे लक्षात घेतले अथवा नंतरच्या कालातील श्रीपाद कृष्ण कोल्हटकर यांच्या विनोदाचे खाडिलकर-गडकरी यांच्या नाटकांचे, शिवरामपंत परांजपे, अच्युतराव यांच्या वक्तृत्वाचे आवाहन कोणाला होते हे पाहिल्यास वरील मुद्द्याचा खुलासा होईल.

३. हरिभाऊंचा भाषेच्या साधेपणाचा आग्रह किंवा त्यांच्या पाल्हाळपूर्ण तपशीलवार चित्रणामागच्या भूमिकेचाही याने अन्वयार्थ लागतो.

अनुक्रमणिका

'दोषाविष्करण करताना कादंबरीकार Realism ची मदत घेऊन उपाययोजना सुचविताना Idealism चे साह्य घेतात' ('आठवणी व कादंबऱ्या' – वाग्भट देशपांडे पृ. ३४) असे हरिभाऊ म्हणत असले व त्यांनी आपल्या कादंबऱ्यांतून या प्रकारच्या Idealism चे दर्शन घडविले असले तरी त्यामुळे त्यांच्या Realism वर असलेली Factualismची छाया लपत नाही.परंतु ही छाया मान्य करूनही असेच म्हटले पाहिजे की, हरिभाऊपूर्व कालातील संकेतबद्ध, अद्‌भुतवादी साहित्याचा विचार करता हा हरिभाऊप्रणीत वास्तववाद म्हणजे वाङ्मयीन प्रगतीचा एक महत्त्वाचा टप्पा होय. या अद्‌भुताचे वर्चस्व हरिभाऊंच्या काळातही किती होते याचा प्रत्यय खुद्द हरिभाऊंच्याच ऐतिहासिक कादंबऱ्यांवरूनच येतो.

आपल्या सामाजिक कादंबऱ्यांतून कट्टर वास्तववादाचा पुरस्कार करणारे हरिभाऊ स्वतःच्या ऐतिहासिक कादंबऱ्यांतून अद्‌भुताचा आश्रय करताना का आढळतात? – कथावस्तूचा दूरस्थपणा सिद्ध करण्यासाठी ? त्यांतील काही पात्रांचे अलौकिकत्व प्रकट करण्यासाठी ? की भव्यतेचे अद्‌भुताशी काही निकटचे नाते असते, अशा कल्पनेतून ? या प्रश्नाचे उत्तर काय असेल ते असो. मात्र येथे एवढे नमूद केले पाहिजे की, या अद्‌भुताच्या आश्रयातही वास्तवाचे त्यांचे भान पूर्णपणे हरपले जात नाही.' 'सिंहगड' पोवाड्याच्या आधारे, ज्या वेळी त्यांच्या 'गड आला पण सिंह गेला' या कादंबरीवर हीत 'चक्र करून टाकणारे चमत्कारिक प्रसंग' नसल्याचा आक्षेप घेतला गेला. त्या वेळी पोवाड्यातील वर्णन पूर्णतया अतिशयोक्त असल्याने इतिहासदृष्ट्या त्याचा विचार करणे अनवश्यक असल्याचे हरिभाऊंनी सांगितले. ('हरिभाऊ' – डॉ. भिंगारे, पृ. २४२).

ऐतिहासिक कादंबरी म्हणजे स्वप्रांतीय ठराविक वीरांची केवळ पराक्रमगाथा, अशीही हरिभाऊंनी समजूत करून घेतली नव्हती. एरव्ही करुणरसाला प्राधान्य देणाऱ्या 'वज्राघात'सारख्या ऐतिहासिक कादंबऱ्या त्यांनी लिहिल्याच नसत्या. त्यांच्या सामाजिक कादंबऱ्यांतून तर हा कारुण्याचा प्रवाह सतत उचंबळत असताना दिसतो. हरिभाऊंसारखा वास्तववादी सहृदय लेखक जीवनातील विविध प्रकारच्या कारुण्याने आकृष्ट झाला नसता तरच नवल. विद्यार्थिदशेत असतानाच त्यांनी शेक्सपीअरच्या शोकनाट्याची महती जाणली होती. जीवनातील हे शोकनाट्य प्रकट करताना त्यांनी मात्र विशेषत्वाने कादंबरीचाच आश्रय केला. त्यांच्या संथ सोशीक वृत्तीला मानवणारे व तपशीलवार जीवनचित्रणाला पोषक ठरणारे हेच एक योग्य माध्यम होते. या माध्यमाच्या आधारे आत्माविष्कार करीत करीत मराठी कादंबरीच्या तंत्रमंत्रात हरिभाऊंनी कायापालट घडवून आणला, आणि मराठी कादंबरीला कायमचे ऋणी करून ठेवले. त्या ऋणाचे पुण्यप्रद स्मरण हा ते ऋण फेडण्याचा एक मार्ग.

---

१ असे भान गेल्याची उदाहरणे उत्तरकालीन ऐतिहासिक कथारचनेत कमी नाहीत.

---

प्रा. व. दि. कुलकर्णी

# एकनाथांच्या काव्यातील निसर्ग

'संतकाव्यातील लावण्यांगे' या विषयावर मुंबईच्या 'आकाशवाणी'ने एक व्याख्यानमाला गुंफली होती. त्या मालेत 'एकनाथांचे निसर्गदर्शन' असा एक विषय होता. वस्तुतः एकनाथांचा लौकिक निसर्गकवी म्हणून नाही. प्राचीन मराठी कवींमध्ये नरेंद्र, मुक्तेश्वर, दामोदर, भास्करभट्ट बोरीकर किंवा काही पंडितकवी यांच्या काव्यांतून निसर्गवर्णन येते, तहा अल्पांशानेच; शिवाय यांपैकी कोणी निसर्गदर्शनकार आहे असे म्हणण्यासारखी वस्तुस्थितीही नाही. निसर्गवर्णनकारांत ज्या कवीचा उल्लेखही होत नाही. अशा एकनाथांनी काय 'निसर्गदर्शन' घडविले यासंबंधी फार कुतूहल वाटते. एकनाथांच्या चतुश्लोकी भागवत, एकादश स्कंध टीका, भारुडे, अभंग किंवा काही स्फुट प्रकरणे यांत निसर्गवर्णनाला मूलतःच अवसर नाही. 'रुक्मिणी स्वयंवर'

आणि ' भावार्थ-रामायण ' या कथाकाव्यातच सापडल्यास निसर्गवर्णन सापडेल; कारण प्राचीन मराठी कवितेत जे निसर्गवर्णन आले आहे ते स्वतंत्रपणे आलेले नसून, कथेच्या आश्रयाने आलेले आहे. म्हणून ' भावार्थ-रामायण ' आणि ' रुक्मिणी-स्वयंवर ' या कथाकाव्यांचा निसर्गवर्णनाच्या दृष्टीने शोध घेतल्यास काय दिसून येते ?

एकनाथांची या सृष्टीकडे – पशू, पक्षी, वनस्पती अथवा मानव यांच्याकडे पाहण्याची दृष्टी आध्यात्मिक होती. सर्व संतकवींमध्ये, संत एकनाथांच्या इतका जाणीवपूर्वक, सातत्याने आणि विविध प्रकारे अध्यात्माचा प्रचार आपल्या लेखणीद्वारा दुसऱ्या कोणत्याही कवीने केला नाही. ' चतुःश्लोकी भागवत ' किंवा ' एकादश स्कंध ' यांसारखे शुद्ध भाष्यात्मक ग्रंथ तर राहोतच, पण 'रुक्मिणी-स्वयंवर ' किंवा ' भावार्थ रामायण ' यांसारखी आख्यान काव्ये घेतली, किंवा पदे, गौळणी, भारुडे यांसारखी स्फुट गीतात्मक रचना घेतली, तरीही एकनाथांचे साहित्यवस्त्र अध्यात्माच्या उभ्या आडव्या धाग्यांनीच विणलेले दिसते; त्याला किनार लावली आहे तीही अध्यात्माची, ते रंगवले तेही अध्यात्माच्याच रंगाने. आणि हे सारे एकनाथांनी केले ते कायावाचामनेकरून, आळस झाडून, पुनरावृत्तीचा यत्किंचितही कंटाळा न मानता; स्वतःसाठी नव्हे तर सर्वांच्यासाठी.

जीव-शिव यांचे सदैव ऐक्य पाहणाऱ्या एकनाथांच्या दृष्टीने निसर्गाला स्वतंत्र स्थानच नाही. शुद्ध ऐंद्रिय संवेदनांचे सौंदर्य शब्दांकित करणाऱ्या अर्वाचीन कविदृष्टीची अपेक्षा येथे करणे अगदी व्यर्थ ठरेल. एकनाथांनी निसर्गाकडे पाहताना वाल्मीकींचीही दृष्टी पत्करली नाही. एकनाथांची दृष्टी ' संता 'ची आहे, वाल्मीकींची दृष्टी ' महाकवी 'ची आहे; यामुळे 'वाल्मीकिरामायणा'त केवळ निसर्गवर्णन नाही, तर ' निसर्गदर्शन ' आहे. ' निसर्गदर्शन ' हे ' वाल्मीकिरामायणाचे अनुपम, अविभाज्य असे लावण्यांग आहे. त्यात हेमंत, वसंत, वर्षा, शरद या ऋतूंची वर्णने आहेत; त्यात गंगेच्या–मंदाकिनीच्या वर्णनाबरोबर पंपासरोवराचे आणि समुद्राची वर्णने आहेत; त्यात चित्रकूटादी पर्वत आणि तेथील वनशोभा यांच्याबरोबर अशोक वनिकेचे वर्णन आहे. संध्या, चंद्रमा यांची वर्णने आहेत. वाल्मीकींनी एखाद्या चित्रकाराच्या नजरेने यांतील सौंदर्य टिपून ते महाकवीच्या प्रतिभेने सजीव केले आहे.

सुप्तैक हंसं कुमुदैरुपेतं महाह्रदस्थं सलिलं विभाति ।
घनैर्विमुक्तं निशि पूर्णचंद्रं तारागणाकीर्णमिवान्तरिक्षम्‌।
अशा हृदयंगम काव्यपंक्ती मनाला वेड लावून जातात.

' वाल्मीकि-रामायणा ' तील निसर्गदर्शन हे मूळ महाकथेहून अलगपणाने वावरणारे नाही; ते त्या कथारसातूनच उद्‌भवलेले, कथारसातून विकास पावणारे आणि कथारसाची अभिवृद्धी करणारे असे आहे. त्यातून काव्यातील प्रधान पात्रांचे मनोभाव व्यक्त होतात.

' पश्य लक्ष्मण पुष्पाणि निष्फलानि भवन्ति मे ।
पुष्पभारसमृद्धानां वनानां शिशिरात्यये ॥

हा श्लोक वाचताना सहृदय फुले पाहतो, ती वाल्मीकींच्या डोळ्यांनी नव्हे आणि स्वतःच्याही डोळ्यांनी नव्हे; तर सीताविरह झालेल्या उदास रामचंद्रांच्या डोळ्यांनी. वृक्षांतून बाहेर पडलेला आणि कमलकेसरांचा संपर्क झालेला वायू सीतेच्या निःश्वासाप्रमाणे रामचंद्रांना मनोहारी वाटतो. रामचंद्र कमलकोशदलाकडे टक लावून पाहतात, कारण त्यांना ती कमलकोशदले सीतेच्या पापण्यांसारखी दिसतात. ' वाल्मीकि-रामायणा 'तील निसर्गवर्णनात शुद्ध निसर्गचित्रांबरोबर, व्यक्तिमनोभावदर्शनही समर्पकपणे घडविलेले आहे. कोणी तरी कोणाला अगदी जिव्हाळ्याने, उत्कटतेने निसर्गदृश्य दाखवीत असता, आणि निसर्गाबरोबर आपले हृदयही चित्रित करून जातो. अशा जिवंत निसर्गचित्रांमुळे सौंदर्य लाभलेले रामायण एकनाथांच्या हाती आलेले आहे.

पण एकनाथांना या निसर्गाशी, या रामचंद्राशी काहीही कर्तव्य नाही; त्यांचे रामायण वेगळे आणि म्हणून त्यांचा निसर्गही वेगळा. एकनाथांचे रामायण हे ' वाल्मीकिरामायणा 'वरील ' एकाकार-टीका ' आहे. येथे एकनाथांनी संताशेवरून ' अर्थान्वये ग्रंथार्थ ' सांगत असतो ' परमार्थु ' सहज जोडला आहे; म्हणून एकनाथी रामायण, हे एकनाथांच्या दृष्टीने रामायणाचा **भावार्थ** सांगणारे आहे. तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रात जशी ' भावार्थ दीपिका ' तशी कथाकाव्याच्या क्षेत्रात हे ' भावार्थ रामायण '. आजच्या काव्यसमीक्षकांना रामायणाचा भावार्थ एकनाथांच्याहून अगदी वेगळा दिसून येईल, पण एकनाथांनी काय अनुभविले होते ? ते म्हणतात,

मुख्य मुळीं एक मूर्ती । तेचि चतुर्धा अभिव्यक्ती ।
या नांव व्यूहचतुष्टय म्हणती । एक निश्चितीं विभाग ॥
आत्मप्रबोध तो लक्ष्मण । भावार्थ तो भरत जाण ।
निजनिर्धारी तो शत्रुघ्न । आनंद विग्रही पूर्ण श्रीराम ॥

अहमात्मा तोचि दशरथ। उत्पत्तीसी मुख्य हेत।
दूर गेलिया श्रीरघुनाथ। निवर्तत अहमात्मा॥
आतां विवेक आणि निजविचारू। तैसे वसिष्ठ विश्वामित्र गुरू।
त्या पासोनि अति साचारू। शस्त्रास्त्रविद्या दृढ केली॥
कौसल्या ते सुविद्या। सुमित्रा ते शुद्ध मेधा
कैकयी ते अति अविद्या। मंथरा कुविद्या तीपासीं॥
कुविद्या क्षोभवोनि अविद्येसीं। श्रीराम केला वनवासी।
तंव सीता अनन्य भावेसीं। श्रीरामा सरसी निघाली॥
... ... ... ... ... ... ...
जैसे बोध विरक्ति परमार्थासी। तैसे सीता लक्ष्मण श्रीरामासरसीं।
ऐसे तिघे निघाले वनवासीं। कृतकार्यासी लक्षोनी॥

श्री भावार्थरामायण, अयोध्याकाण्ड, अध्याय १, ओव्या १७ ते ३२.

एकनाथी रामायणाचा हा मूळ कंद आहे; यातून सारे धुमारे फुटून 'भावार्थरामायणा'चा विस्तार झालेला आहे.

रामायणींचें निजसार। क्षरीं कोंदलें अक्षर।
पदापदार्थ चिदचिन्मात्र। परम पवित्र रामकथा॥ ...
श्रीरामकथेचा गुह्यार्थ। यथार्थ वदवी रघुनाथ।
माझे हातीं लेखणी देऊन। कथा लिहवीत श्रीराम॥

असा हा प्रकार आहे.

यांच्या अशा 'आत्मा' – राम आणि 'अहं' – रावण ह्या रामायण रचनेत संकोच विस्ताराचे रूढ संकेतही बदलतात. खरे म्हणजे एकनाथांचे निसर्गाकडे लक्षच जात नाही; त्यांनी 'वाल्मीकि-रामायणा'तील निसर्ग-वर्णनांचा संकोच केला हे म्हणणे यामुळे अर्थशून्य ठरेल. एकनाथांनी निसर्गवर्णने बहुतेक ठिकाणी गाळलेली आहेत; आणि ज्या थोड्याशा ठिकाणी ती ठेविली आहेत तेथे त्यांवर अध्यात्माचे पुट चढविलेले आहे किंवा अध्यात्माचाच रंग त्यांना तेथे आढळला आहे. मुळात रामायण कथेचा आत्माच पार बदलून टाकल्याने निदान आपल्या कथाभागाची सुंदर पार्श्वभूमी म्हणूनही त्यांना निसर्गाची योजना करण्याची आवश्यकता भासली नाही. त्रिवेणी संगम पाहिल्यावर भरत शत्रुघ्न हे लोटांगण घालून 'त्यजोनिया पादत्राण, चरण चाली निघाले', एवढेच एकनाथ सांगतात आणि ताडकन पुढे जातात. तसेच 'इंदिरा सरोवरात स्नान', म्हणजे 'सर्व रसांची गोडी जाण' एवढा स्नान पुण्याईचा अभिप्राय नमूद करण्याचे कर्तव्य एकनाथ पाळताना आढळतात. स्वर्गलोक, तारा-लोक, ध्रुवलोक, तपोलोक यांची वर्णने त्यांतील सौंदर्य वगळूनच अन्य तपशीलांनी भरून टाकलेली आहेत. पंपा सरोवराच्या निसर्ग सौंदर्याचा एकनाथांना मोह नाही. त्या सरोवराच्या उत्पत्तीची कथा मात्र देण्याचे त्यांना अगत्य वाटते. अरुणोदयाच्या वर्णनात सांकेतिकता तर आहेच, पण सौंदर्यदर्शनाच्या आनंदापेक्षा अरुणोदय-कालच्या जगरहाटीचाच तपशील आलेला आहे. वर्षा-काळ जाऊन शरत्काळ आला म्हणून एकनाथांची दृष्टी चलित झालेली नाही; रामचंद्रांचीही पण; कारण

ग्रासोनिया वर्षाकाळ। शीघ्र पावला शरत्काळ।
श्रीराम काळाचाहि काळ। सुनिश्चळ स्वस्थानीं॥

नाही म्हटल्यास शरदातील निर्मळ आकाश आणि शशि-सूर्यांची प्रसन्न प्रभा एकनाथांच्या साधु मानसास सुख-विताना दिसते. युद्धकाण्डात आलेले पर्जन्याचे वर्णन मात्र पुष्कळच जिवंत वाटते. 'चित्रकुटी'ची अत्यद्‌भुत शोभा पाहून श्रीरघुनाथ सुखावल्याची नोंद एकनाथ करतात.

ते मंदाकिनी अति पावन। कांठीं सुवर्णकमळें विकासनान।
सूर्य तेजासम जाण। कुमुदें उत्फुल्ल साजिरीं॥

या एका ओवीत मंदाकिनीचे सौंदर्यमाहात्म्य एकनाथां-च्या दृष्टीने संपते. हनुमंताने लंकागिरी पायाने समुद्राच्या तळी दडपताच.

'उचंबळलें समुद्रजळ। सरिता उचंबळल्या तत्काळ।
तेणें तिंचलें ध्रुवमंडळ' अशी वर्णनाची अतिशयोक्ती होते. अर्थात हनुमानाचे उड्डाण आहे तसे पत्करल्या-नंतर, हा सागरप्रक्षोभ सौम्यच म्हणावयाचा. 'वावटळी'-चे वर्णन असेच अतिशयोक्त आहे.

लागतां त्या वायूची झडप। सत सागर सत द्वीप।
तेणेंसीं पृथ्वी सकंप। सुटे चळकांप मेरुसी॥

वस्तुतः प्राचीन मराठी अतिमानवी कथांतून येणाऱ्या अतिशयोक्ती ह्या सामान्योक्ती होत, असे मानल्यास रसा-स्वादात व्यत्यय येईल असे वाटत नाही.

येथवरील उल्लेख हे कथेतून मधूनमधून त्रुटितपणे आलेल्या काही निसर्गस्थळांसंबंधीचे होत. या मानाने, भावार्थ–रामायणात अरण्ये व वनोपवन यांची वर्णने अधिक विस्ताराने येतात. द्रोणागिरीचे वर्णन तीन ठिकाणी

थोडे थोडे असे आलेले आहे. द्रोणागिरीवरील 'स्वतेजे लखलखणाऱ्या' दिव्यौषधींच्या क्षणात अदृश्य होणाऱ्या शक्तीचे वर्णन एकनाथांनी अधिक गोडीने केल्यासारखे वाटते. या दिव्यौषधी

पानें शीतल सुकुमार। खुपों न शकती चंद्रकर।
फळें हिरवीं सुंदर। रक्तांबर फुलें तिचीं॥

अशी आहेत. रामचंद्रासमवेत वानरसेनेला या पर्वताची विचित्र शोभा विस्मयानंद देती झाली; या वर्णनात एकनाथांनी ताटस्थ्य झटकून दिल्याचे आढळते.

बालकांडातील ताटिकावनाची भयानकता ताटिका राक्षसीच्या वर्णनानेच पटविली जाते; निबिड घोर अरण्य-वर्णनाने नाही. पण किष्किन्धाकांडात आलेल्या दंडकारण्याचे वर्णन मात्र अधिक प्रत्ययकारक वाटते.

पुढे वन अति विकळ। वृक्ष काखरले सकळ।
नाही पत्र पुष्प फळ मूळ। शुष्क जळ सरितांचें॥
वनीं नाही मुंगी माशी। नाही पशुपक्षी कीटकेसीं।
सूर्य तपे निजदाहें सीं। तेणें कासाविसी वानरां॥

निर्जन, निर्जल-रुक्ष प्रदेशाचे हे चित्रण यथातथ्य आणि परिणामकारक वाटते. वानरांच्या कासाविशीच्या संबंधाने ते कथेशी एकरूपही झालेले आहे.

सुंदरकांडात अशोकवनाचे वर्णन येते. त्या वनाला 'अशोकवन' का म्हणतात यावरच प्रथम एकनाथांनी भरपूर भाष्य केले आहे आणि नंतर तेथील फळझाडांची माहिती पुरविली आहे; अर्थात ही यादी नाही, तर सीतेचा शोध लागल्याच्या आनंदानंतर निर्धास्तपणे फळां-कडे पाहणाऱ्या एका कपीच्या – हनुमंताच्या – आश्रयाने हे वर्णन केलेले आहे; त्यात निसर्गसौंदर्याचा भाग नसला तरी जिवंतपणा आहे. नारळांचे घड, पक्व खर्जुरी, पिकले आंबे, द्राक्षांचे घोस, परिपक्व फणस, पिकली केळी, आंबट निंबे, कुळकुळित जांभळे आणि करवंदे, आणखी कितीतरी विविध फळे पाहून हनुमंत 'करी हर्षाचा गोंधळ' आणि 'घोटी लाळ भिटक्या देत' असे एकनाथ वर्णन करतात; इतकेच नव्हे, तर 'देखोनि साकरेची राशी। हनुमान खाजवी दोन्ही कुशी' हाही तपशील देण्यासारखा आहे असे एकनाथांना वाटले आहे. या वर्णनात हनुमानाला अगदीच माकड कल्पिले आहे हा विचार बाजूला ठेवला आणि एकाच ऋतूत ही सारी फळे येतात हे गृहीत धरले तर, हे वर्णन त्यांतल्या त्यात कथारसाशी निदान एकजीव तरी झाल्याचा आनंद देणारे आहे.

उत्तरकांडांत (भावार्थ रामायणाच्या) अध्याय ४२ मध्ये अशोक वाटिकेचे पुन्हा वर्णन आलेले आहे. त्यात फळझाडे, फुलझाडे, औदुंबरादी गगन चुंबित तरू, भोकरी – चोरे – आवळी इ. वृक्ष, तसेच वापी–कारंजी–पोखरणी, हंसकोकिळा शुकादी पक्षी, कनकाचे बुरुज आणि रत्नांचे क्रीडापर्वत आहेत. 'अमरावतीसी नंदनवन ते सरी न पावे यासी जाण' – असे त्याचे वैभव व सौंदर्य केवळ जंत्रीरूपाने उभे करण्याचा प्रयत्न केला आहे (हा भाग एकनाथरचित नसल्याने त्यावर अधिक लिहिणे नको).

फळांची वर्णने ही निसर्गसौंदर्याच्या नित्याच्या परिचित वर्णनात येत नाहीत. दोनतीन ठिकाणी फळांचे अंतर्दृष्टीने आध्यात्मिक असे वर्णन केले आहे. किष्किन्धा-काण्ड अध्याय १५ मधील वर्णनाची अनुकृती युद्धकाण्ड अध्याय ५० मध्ये केलेली आहे (युद्धकाण्डात अशी अनुकृतीची कितीतरी स्थळे आढळतात. यावरून त्याच्या लेखकासंबंधी विशेष काही विचार करता येईल. असो. तो विषय अप्रस्तुत आहे.).

किष्किंधाकाण्डांत वर्णिलेल्या फळांचे दोन प्रकार दिसतात. एक बिघडलेली व दुसरी चांगली. बिघडलेल्या फळांचे वर्णन—

एकें विठुळलीं सकाम वार्ते। एकें हिरवीं करकरितें।
एकें बहुबीजें बुचबुचितें। एकें कचकचित अर्धकाचीं॥
एकें जडजाडवें जारटलीं। एकें सकाम लोभें सारटली।
विकल्प मुरडें मुरकुटलीं। झडोन पडलीं अमार्गीत्र॥
एकें विवाद कर्मठें। विधि निषेध अति अंचटें।
एकें तपस्ते जें तिखटें। एकें तुरटें मतमुद्रा॥
एकें वरिवरी बरवंटे। आंत द्विजद्वेषाचे काटे।
एकें दिसताती चोखटें। अति कडवटे परनिंदा॥
एकें भेदवाटें खणुवाली। सभेदाच्या बुचबुचित आळी।
त्यासी न सेविती काडळी। पडिल्या धुळीनें मिळती॥

अशा या फळांना वानरांनी हातही लावला नाही. पण एकनाथांनी वानरांना जी फळे खावयास दिली ती साधीसुधी नव्हती.

वनिता हातींहूनि निसटलीं। अहंममता देंठींहूनि सुटली।
संकल्प विकल्पें तुटलीं। फळें आलीं परिपाका॥

नित्यनिर्विकारें पाडा आलीं । शांतिसे जे स्वयें
मुराली।
जीं नैराश्यें मधमधलीं । फळें सेविलीं वानरीं ॥
शांत दांत असवारलीं । आंत बीज ना बाहेरी साली।
सुखस्वरूपें साकारिलीं । फळें सेविलीं वानरीं ॥
अहं कोहं सोहं विहीन । ब्रह्मीं ब्रह्मत्वही लीन ।
सांडोनिया मी तूं पण । फळें परिपूर्ण सेविती ॥

हनुमंताच्या विनंतीवरून तापसीने आणून दिलेली ही फळे अशी ' निजात्मबोधे मधमधित ' झाली होती.

बालकांडात आलेले विदेहवनाचे वर्णन, ' निसर्ग शोभावर्णन ' असे संपादकांनी शीर्षक देऊन, मुदित केले असले, तरी त्या वनाची शोभा काय झाली आहे ते पुढील उताऱ्यावरून सहज ध्यानी येईल.

वृक्ष समूळीं सपर्चीं गोड । चोजें वीण फळांचे घड।
देखतां पांथिकांचें पुरे कोड । छाया सेवितां चाड
निचाड होय ॥
देखोनि ते वनस्थळीं । मुमुक्षु मयुर स्वानंदमेळीं ।
पिच्छें पसरोनि रोमावळी । सुख सुकाळीं नाचती ॥
विदेहवनींचा सुगंध । पावतां प्रकटे परमानंद ।
मंदही पावे निजबोध । हा अति विनोद आरामी ॥
स्वानंदें मयूर गर्जती । तेणें वेदार्थ चवकती ।
सांडोनि कर्मवाद वृत्ती । निश्चल राहती निःशब्दें ॥
वनीं पारवे ते घुमती । तेणें गंधर्व गाणीं वेडावती ।
सामवेदाची उपरमे वृत्ती । पक्षी बोलती अनुपम्य ॥

अरण्यकांडातील पंचवटीतील पक्ष्यांच्या ध्वनींचे वर्णन एकनाथांनी जे केले आहे ते याहूनही गहन आणि पक्ष्यांच्या आध्यात्मिक ज्ञानाचा अधिकार दर्शविणारे आहे.

श्रीरामा देखोनि आल्हादें । कोकिळा कूजती पंचमशब्दें ।
घुमरी घुमघुमती स्वानंदें । सुखानुवाद अति मधुर ॥
श्रीरामा तूं तूं, सीते तूं तूं । धन्य धन्य सुमित्रा तूं तू ।
ऐसे कपोत कूजतू । पुण्य पुरुषार्थी ये वनीं ॥
स्वतः प्रमाण कीं परतः प्रमाण । प्रयोगोपाधीनें
व्यावर्तित कोण ॥
जहद जहल्लक्षणेचें काय प्रयोजन । शुकसारिका आपण
विवादती ॥
जेथें शुक बोले विचक्षण । आत्मा येथें स्वतः प्रमाण ॥
तो जहद जहत् नेणे । श्रीराम पूर्व लक्षावा ॥

एकनाथांनी आपल्या ' रुक्मिणीस्वयंवर या काव्यात ' रुक्मिणीचा निरोप घेऊन सुदेव ब्राह्मण द्वारकेत आला तेव्हा तेथील उपवन त्याला कसे दिसले याचे वर्णन केले आहे, तेथेही विदेहवनाचेच वातावरण आहे—पक्ष्यांची रुंजी ऐकून गंधर्व स्तब्ध झाले आणि सामवेद मौनावले. प्रबोध पारव्यांच्या घुमण्याने वागीश्वरी चित्तात चमकली, बृहस्पती विस्मित झाला आणि सुरवर आश्चर्यचकित झाले. शुक-पिंगळ्यांच्या अनुवादनाने वेदान्त दचकला; द्वारकेचे पक्षी अति गुह्याचे गुह्यार्थ बोलत होते—असे सारे अलौकिक आध्यात्मिक सामर्थ्य तेथे खेळते आहे.

नरेंद्राच्या रुक्मिणी-स्वयंवरात द्वारकेच्या वनोपवनांचे जे वर्णन येते ते शृंगारसूचक, नव्हे तर शृंगाराला आवाहन करणारे आहे. मदन आणि वसंत हेच त्या उपवनांचे मालाकार आहेत. सप्त सागरांच्या मोटा चालू आहेत; चंद्रवायू हे पाणी धरणारे आणि प्रत्यक्ष शृंगार हा झाडे लावणारा आहे.

तेथ काम वसंत बनकरू : पाणी-काटे सातै सागरू
बोळी धरी चंद्र पवनु चतुरू : शृंगारु लावणी करी.
( नरेंद्र–रु० स्वयं०–७७९ )

भास्कर कवीच्या ' शिशुपालवध ' काव्यातील द्वारकेच्या उपवनांचे वर्णन असेच ' काम '–प्रधान आहे. त्या उपवनांत चंदन तरूंच्या सावलीत, परागांच्या शय्येवर रतिशिथिल राजकुमारींना पेंग येत आहे...चंपकपुष्पे म्हणजे सुवर्ण पुष्पांनी मदन-लिंगाची पूजा करावी त्याप्रमाणे दिसत आहेत...असा एकूण प्रकार आहे.

दामोदर कवीच्या ' वच्छहरणा ' तील वृंदावनवर्णनात मात्र एकनाथी-पंथ आढळतो; तेथील तरूंची नम्रता पाहून मुनिजनांना विस्मय वाटतो आणि तेथील शुक-सारिका वेदान्त सिद्धान्ती असून त्यांचा संवाद आत्म-बोध घडविणारा असतो...हे वळण एकनाथी आहे; पण दामोदराने हे अल्पांशानेच गिरविले आहे.

' वच्छहरण ' हे एक दीर्घ आख्यानपर कथाकाव्य आहे; आणि ' शिशुपालवध ' हे आख्यानकाव्य आणि विदग्ध महाकाव्य यांच्या सीमारेषेवर रेंगाळणारे असून नरेंद्राचे ' रुक्मिणीस्वयंवर ' मात्र स्वरूपाने ' विदग्ध महाकाव्य ' आहे. निसर्ग वर्णनांची खास स्वतंत्र अशी सोयच मुळी विदग्ध महाकाव्याच्या लक्षणात करून ठेवलेली असल्याने, त्यात निसर्गवर्णनाला भरपूर अवसर

असतो—अल्पपणे आणि कथांतर्गतही. नरेंद्राने याचा कलापूर्ण उपयोग करून घेतलाही आहे. आर्ष महाकाव्यात असे साहित्यशास्त्रीय संकेत किंवा दण्डक नाहीत—पण त्यामुळे निसर्गवर्णनाला त्यात उलट कथाश्रयाने कितीतरी मोठ्या प्रमाणावर स्थान लाभते. वाल्मीकि-रामायणासंबंधी याबाबत प्रारंभी लिहिलेले आहेच. मराठीतही मुक्तेश्वराच्या महाभारतातून येणाऱ्या निसर्गवर्णनात वृक्ष-पशु-पक्षी यांच्या याद्या समृद्धपणे येत असल्या तरी मुक्तेश्वराला स्वतंत्र निसर्गसौंदर्य दृष्टी होती याचा चांगलाच प्रत्यय येतो उदा०

शेष वेचती अठरा घटका। पूर्व दिशेनें क्षाळिलें मुखा।
कुंकुम रेखिलें त्या तिलका। अरुणोदय बोलिजे॥

किंवा

गगनसमुद्रीं मुक्ताफळें। अरुण चंचुनें कनकमराळें।
वेंचोनि घेतां कव्ाकुशळें। नाहींच केलीं नक्षत्रें॥

एकनाथपूर्वकालीन महानुभाव कवींची महाकाव्ये आणि एकनाथानंतर लगेच येणारा कलाकवी मुक्तेश्वर याचे महाभारत या विदग्ध आणि आर्ष महाकाव्यातून आढळणारे निसर्गवर्णनाचे स्वरूप तुलनेसाठी येथे अल्पांशाने मांडले. याचा अधिक साक्षेपाने तपशीलवार असा विचार विस्ताराने करता येईल. पंडित कवींच्याही काव्यांचा या दृष्टीने आधार घेणे अधिक उपकारक ठरेल. पण प्राचीन मराठी काव्यातील निसर्गदर्शनाचा येथे सामग्र्याने विचार करावयाचा नसल्याने त्याची प्रस्तुत आवश्यकता नाही.

आणखी एक विचार येथे करावासा वाटतो. वाल्मीकि-रामायणात निसर्ग आणि मानव यांच्या भावबंधांतून निसर्गदर्शन प्रायः घडत असलेले दिसते हे मागेच स्पष्ट केले आहे. एकनाथ मधूनमधून असा भावबंध चित्रित करू पाहतात, पण तेथे मूळ व्यक्तिरेखा पार बदलते. शबरीच्या आश्रमातून राम आणि लक्ष्मण बाहेर पडले; ऋष्यमूक पर्वताकडे जाताना ते वनस्थली पाहत आहेत; पण पशु-पक्ष्यांच्या कूजनाने क्रीडेने रामचंद्राचा चित्तक्षोभ होतो – 'मां हि शोकसमाक्रान्तं संतापयति मन्मथः' असे रामचंद्र उद्गारतात...मृग-मृगी, मयूर-मयूरी, चक्रवाक-चक्रवाकी या मिथुनांची प्रीती पाहून रामचंद्र व्याकुळ होतात, पण त्या महानुभावाची उदारता नष्ट होत नाही–रामचंद्र म्हणतात

एक एव सुखी लोके चक्रवाको विहंगमः।
पश्य दृष्ट्या मनोरम्या छाययानुगता प्रिया॥

पण एकनाथांनी आपल्या रामचंद्राच्या तोंडून या सुखी मिथुनावर शापवाणी सोडावयास लावले आहे. एकनाथांचा रघुनंदन कोपतो आणि कोकिळाला 'याचे खुंटो वदनें वचन। यासी पडो दृढ मौन' असा शाप देतो. मृगमैथुन, गजगजी क्रीडा, मयूर संयुक्त मयूर, पाहून 'स्त्रीसंगें प्राण जाईल' असे दारुण शाप हा मर्यादा पुरुषोत्तम रामचंद्र सटासट देत सुटतो. या शापांना एकनाथांनी उःशाप मिळवून दिले आहेत. वाल्मीकींचा निसर्ग आणि त्याच्याशी हृदयसंवाद करणारा महामती रामचंद्र कोणीकडे आणि एकनाथांचा निसर्ग आणि ही शापवाणी उच्चारणारा लघुचेतस् रामचंद्र कोणीकडे!

एकनाथांच्या वाङ्मयातील रस 'ऐहिक' नाही, तो 'अध्यात्मरस' आहे. मूळ कथेतच अध्यात्म दिसू लागल्यावर निसर्ग त्यातून वेगळा कसा उमटणार? आज एकनाथांनी निसर्गरूपावर घेतलेली अथवा आजच्या दृष्टीने लादलेली आध्यात्मिक रूपके, आपणांस अनुचित, सौंदर्यविघातक, कदाचित अरसिकतेची द्योतकही वाटतील; अतिविकृतही वाटतील – पण एकनाथांच्या स्वतःच्या साहित्यिक भूमिकेशी ती पूर्णपणे सुसंगत आहेत. एवढेच त्याचे समर्थन देता येईल. एके काळी (आणि अजूनही कोठे कोठे) मराठी रसिकतेने तिचे अमाप कौतुक केले आहे. हेही विसरून चालणार नाही.

नाही म्हणावयास एकनाथांच्या काव्यातून क्वचित एखादुसरी ओवी निसर्गाचे रम्यरूप तेजाळून जाते, एखाद्या रमणीने काळी चंद्रकळा सोडून पीत-अंबर परिधान करावे, तसे या अरुणोदयी वाटते, असे एकनाथ उद्गारतात.

नेसली प्रिया काळिमावुंथी। सोडोनि पीतांबर दे पती
तेवीं अंधार त्यजोनि राती। दे गभस्ती पीतप्रभा॥

पण एकनाथांची प्रतिभा अशा अपवादानेच निसर्गदर्शनाच्या प्रांती तळपते, आणि चुकूनच जणू, निसर्गसौंदर्याचा वेध घेणाऱ्या आपल्या शक्तीची चुणूक दाखविते. एकनाथांचा निसर्ग हा खास त्यांचा खास 'एकनाथी' आहे! त्याकडे आपल्या ऐहिक आणि आजच्या वाङ्मयीन अभिरुचीच्या दृष्टीने पहाणेही शक्य नाही; कदाचित ते अप्रशस्तच होय.

'किंबहुना एकनाथांचे 'भावार्थ रामायण' ही एक स्वतंत्रच कृती भासणे इष्ट ठरेल. वाल्मीकि-रामायणाचे ते केवळ मराठी रूप नाही. ते वेगळे "एकनाथी रामायण आहे. त्याचे कथाशरीर वाल्मीकिरामायणाचे आहे, आणि आत्मा एकनाथी वाङ्मयीन प्रयोजनाचा-हेतूचा-आहे. त्यामुळे काव्याच्या जातिवंत कसोट्या लावून भावार्थ रामायणाचा कस पाहावा, अशी हुशारी मनास वाटतच नाही.

प्रा. द. भि. कुलकर्णी

# वसंत बापट — एक हरवलेला कवी

: १ :

१९५२ मध्ये बापटांचा 'बिजली' हा संग्रह प्रकाशित झाला. त्या संग्रहाचे सरळच दोन भाग पडत होते. पहिला भाग असा होता की त्यात बापटांनी काव्याचा 'साधन' म्हणून उपयोग केला होता. 'बिजली', 'देशाची हाक', 'सदैव सैनिका पुढेच जायचे', 'तुला नव्या जगाची आण' या कविता अशा साधन म्हणून लिहिल्यागे त्या. वाचकाची केवळ सौंदर्यभावना जागृत करावी व त्याला सौंदर्यानंद द्यावा असा कवीचा त्यात हेतू नसावा. वाचकाला 'कार्यप्रवृत्त' करण्याची कवीची त्यात इच्छा दिसते. अशा हेतूने लिहिली गेलेली पुष्कळशी कविता पद्याच्या वर चढू शकत नाही. प्राचीन काळातील पुष्कळसे संतकाव्य हे प्रचारपद्यच आहे; त्याला काव्याची पातळी नाही. पण कवीची प्रतिभा तशीच विलक्षण असेल तर हे प्रचारपद्य आपले प्राथमिक काम भागवून वर तुकारामी अभंगही होऊ शकते. काव्य हे कला-विलासाच्या इच्छेतूनच निर्माण होते असे कुठे आहे? कधी ते श्रमपरिहाराच्या निमित्ताने बहिणाबाईच्या मुखातून बाहेर पडते तर कधी पक्षप्रचाराच्याआड्न अमर-शेखांच्या गळ्यातून अवतरते. पण बापटांना ही किमया 'बिजली'त साधली नाही.

: २ :

याचे कारण कवीच्या व्यक्तित्वावर गुंतागुंतीचे वाङ्मयीन संस्कार झाले आहेत हे असावे. 'बिजली'-मध्ये बालकवी व कुसुमाग्रज या दोन अगदी भिन्न गुणधर्मीच्या कवींचे संस्कार पाहावयास मिळतात. 'पहाटेचे स्वप्न' हे त्याचे एक ठळक उदाहरण. कवीला स्वप्नात भारत व शांतता यांच्या स्वयंवराचे दृश्य दिसते. परंतु 'हा दोन्ही हातांनी थोटा' असे पाहून राजा आपली मुलगी भारतास देत नाही – असा या कवितेत कथाभाग आहे. खंडित भारताची वेदना या कवितेत नाहीच; फक्त एक हुकुमी 'विषय' म्हणून तिचा उपयोग कवीने केला आहे. कुसुमाग्रजांच्या बहुतेक कवितांना कथावस्तू असली तरी तिचे रूपांतर 'अनुभवा'त करण्याचे सामर्थ्य कुसुमाग्रजांमध्ये आहे; ते इथे बापटांजवळ नाही. आणि या कवितेचे वृत्त, शब्दयोजना व लय ही मात्र थेट 'फुलराणी' वळणाची आहेत. कवितेचे अंतरंग व बहिरंग यांत एवढे भेसूर द्वैत क्वचित पाहावयास मिळेल! भारताची फाळणी झाल्यामुळे शांतता त्याला पारखी झाली हा दारुण अनुभव कवी असा 'कोमल' करतो.

> निराश राजा, निराश 'शांती'
> दीर्घ तयांच्या निश्वासाने
> जागृति आली! माझ्या नेत्री
> प्रकाश भरला बालरवीने
> त्या स्वप्नातुनि या स्वप्नामधि
> नियती मजला घेउनि आली
> कुठल्या स्वप्नी अर्थ असे ते
> शोधक बुद्धी शोधत बसली

: ३ :

रविकिरणमंडळापेक्षा वेगळी कविता कुसुमाग्रजांनी लिहिली. तशी नवकाव्यापेक्षा वेगळी कविता बापटांना लिहिता आली असती—ते त्यांच्या प्रकृतीला धरून झाले असते. पण मर्ढेकर व मुक्तिबोध यांच्यासारखी प्रतिभा-वंतमंडळी व त्यांच्यामागे भक्तपणे उभे असलेले सौंदर्य-वादी व साम्यवादी तत्त्वज्ञान यांमुळे नवकाव्याला उपेक्षून आपला विकास करण्याचे धैर्य बापटांना झाले



अनुक्रमणिका

नाही. शिवाय या नवकाव्याच्या काळात बालकवींचे पुनरुज्जीवन झालेले. म्हणून की काय 'बिजली'च्या अखेरीस लोपलेला बालकवींचा संस्कार 'सेतू'मध्ये पुन्हा दिसू लागला. याच संग्रहातील 'जर का पटता शब्द', 'सरली झिम्मड', 'शिणलेले आभाळ', 'वैशाख : १', 'वैशाख : २' इत्यादी कविता वाचताना मर्ढेकरांचे स्मरण सहजच होते.

नवकाव्याच्या काळात टिकून राहणे कविसंमेलनातील यशामुळे बापटांना जमले. हे यश अगदीच खोटे नव्हते. संमेलनातील श्रोते म्हणजे काही भावगीताचे श्रोते नव्हते. या संमेलनी श्रोत्यांत जुनी मातब्बर, पण नव्या स्थित्यंतराचा खरा बोध न झालेली, कवि–लेखक–संपादक–मंडळी होती. तिच्या कौतुकाला वाङ्मयाच्या क्षेत्रात एक महत्त्व होते.

प्रारंभी बापटांच्या या संमेलनी कविता स्थूल अनुभवावर आधारलेल्या होत्या; ऐसपैस, सुबोध व कथनपर होत्या. 'स्वातंत्र्य! कुठे स्वातंत्र्य?', 'दख्खनची राणी', 'झेलमचे अश्रू' या कविता आपण सर्वांनीच ऐकल्या आहेत. पद्याहून त्यांची पातळी थोडीही वरची नाही. कुसुमाग्रजांच्या कवितांशी त्यांचे साम्य आहे; पण नृप आणि नट यांच्यामध्ये जेवढे असते तेवढेच.

पुढे 'सेतू'मध्ये या संमेलनी कवितांनी व्याज–नाट्यात्मकतेचे सोंग घेतले. 'जपावयाला शिकली होतिस', 'स्मरते तुजला?', 'फुंकर', 'विस्मृति', 'संवाद' अशी किती उदाहरणे द्यावी? त्यांतील हळवी संभाषणे आणि स्वगते, विषयाला कलाटणी देण्याची खुबी, गांभीर्याचा, तटस्थतेचा, सहनशीलतेचा अथवा असाच कशाचा तरी हटकून आणलेला आव – हे सारे ऐकताना फार बरे वाटत असावे. प्रसंगी 'साखळी' आणि 'केवळ माझा सह्यकडा' या कवितांमधून जुनी कथन-परताही डोकावत आहे. पण आता मुख्य भर आहे नाट्याभासावरच. कुसुमाग्रजांची अभिजात वर्णनशैली व बापटांची शाब्दिक वर्णनपरता यांत जसे मोठे अंतर पडले तसेच कुसुमाग्रजांची नाट्यात्मकता व बापटांचा नाटकीपणा यांतही.

**: ४ :**

बापट हे अनुकरणात सुखावणारे कवी नाहीत. पण अजूनही त्यांना आपले सत्त्व किंवा नेमका अनुकरणादर्श सापडला नाही. एखादा हसतखेळत स्वार्थ साधतो. त्यात कुणालाच अवघडल्यासारखे होत नाही. आणि दुसऱ्याला लहानसा स्वार्थ साधायचा म्हटले तरी सतरा अवधाने सांभाळावी लागतात व ते साऱ्यांच्याच डोळ्यांत येते. बोरकरांनी डोळे मिटून राजकवी तांब्यांचे अनुकरण केले व त्यातूनच त्यांना हळूहळू स्वत्व गवसले. असे आंधळे बळ बापटांमध्ये नाही. 'अनुकरणातून सुटण्यासाठी अनुकरण' या चक्रापत्तीत बापट अडकून पडले आहेत. बापट अनुकरणशील कवी आहेत; पण अनुकरणातून सुटण्याचा त्यांच्याइतका नेकीचा प्रयत्न दुसऱ्या एखाद्याच कवीने केला असेल.

'बिजली'पासून 'अकरावी दिशे'पर्यंत जेव्हा आपण बापटांवर नजर फिरवितो तेव्हा आपल्या हे लक्षात येते की या कवीच्या आलेखाला जरी फार खालच्या चौकोना-तून सुरवात झाली असली तरी कितीतरी सूक्ष्म चौकोनांना प्रयत्नाने छेद देत देत त्याची रेघ वरवरच जाऊ पाहत आहे.

अनुकरणातून सुटण्यासाठी बापटांनी 'बिजली'त कुसुमाग्रजी आशय व बालकवींची धाटणी (पहाटचे स्वप्न) असे मिश्रण करून पाहिले तर 'सेतू'मध्ये बालकवींचा आशय व मर्ढेकरी धाटणी (धुके, अपरूप) अशी मिसळ साधून पाहिली. पण मूळ निर्मितिप्रक्रियेलाच बाधक असणारी ही रीती असल्यामुळे ती लवकरच कवीला सोडावी लागली.

बापटांनी दुसरा प्रयत्न केला तो कवितेचा दृश्य आकार बदलविण्याचा. हा प्रकार 'बिजलीच्या अखेरीसच सुरू झाला. 'बरी केली झाकापाक' ही साधी अष्टाक्षरी छंदातील कविता. पण त्यातही दहादहा चरणांचा काव्य-खंड करून व पुन्हा अखेरच्या ओळीला अंतऱ्याचे रूप देऊन बापटांनी कवितेला एक वेगळा दृश्य आकार दिला आहे. दृश्य आकारातील असे प्रयत्न 'ठोकळ्यांचे घर' 'फलश्रुति' या कवितांतही दिसतात. पण या प्रयत्नांचा संबंध प्रत्यक्ष निर्मितिप्रक्रियेशी कुठे होता? म्हणूनच कवितेत काही गुणधर्मात्मक बदल घडवून आणणे या प्रयत्नाला साधले नाही.

मात्र या प्रयत्नाने त्यांच्या काही कवितांना जसा एक वेगळा दृश्य आकार मिळवून दिला तशीच एक थोडी वेगळी श्राव्यलयही मिळवून दिली. 'जायचेच ना', 'जयकेतू' या 'बिजली'तील व 'जपावयाला शिकली होतिस', 'विचारते', 'बाभुळगाठ' या 'सेतू' मधील कवितांना जी वेगळी श्राव्यलय आहे तिचे बरेचसे श्रेय कवीच्या या दृश्य आकारातील प्रयोगालाच द्यावे लागले.



कवींचे मिश्रण करणे किंवा कवितेची शब्दनिष्ठ आकृती बदलविणे या प्रयत्नातील उथळपणा स्वतः कवीलाच पुढे जाणवला असावा. कारण 'सेतू' मध्ये कवीने आपला मोर्चा वळविला आहे तो मुख्यतः काव्यानुभवाकडे. आपले काव्य अनुकरणरहित व वैशिष्ट्यपूर्ण व्हायचे असेल तर त्यातील अनुभव आगळा असला पाहिजे असे कवि-मनाने घेतले असावे. या विचारातून त्याला दोन पर्याय दिसले :

अ. आपले अ–सामान्य अनुभवच काव्यात मांडावे.

आ. सामान्य अनुभवांना असामान्यतेची डूब द्यावी.

या कवीजवळ अ–सामान्य असे अनुभव नाहीतच. मग त्याने दुसरा पर्यायच वापरला व त्यातून 'अजून', 'फुंकर', 'विस्मृति', 'विचारते', 'फितूर', 'नाटक', 'कर्णफुले', 'निचिन्त', 'अधम', या कविता निर्माण झाल्या. आपल्या अनुभवाची तीव्रता वाढविण्याकरिता त्यातील सर्व घटकांची प्रमाणबद्ध वाढ करता येते; त्यातून नाट्य निर्माण होते. पण आपला अनुभव अ–सामान्य करण्यात असा प्रमाणबद्ध विकास नसतो. त्याच्या कुठल्यातरी एखाद दुसऱ्याच घटकावर जोर दिला जातो; व त्यातून यांत्रिक पूर्वनियोजन, नाटकी' पणा, लाकडी सफाई, उथळ सुबोधपणा हे दोष निर्माण होतात. आणखीही एक दोष निर्माण होऊ शकतो व तो म्हणजे हळवेपणा. पण बापटांच्या कवितेत हा सहसा दिसत नाही.

: ५ :

अनुभवाला अ–सामान्य करण्याच्या या बापटांच्या वृत्तीमागे आणखी एक कारण असावे : आत्मनिष्ठे-बद्दलच्या भ्रामक कल्पना. मर्ढेकरांनी आत्मनिष्ठेला महत्त्व दिले म्हणून आत्मनिष्ठा म्हणजेच सर्वस्व अशी चमत्कारिक समजूत मराठीत रूढ झाली. वास्तविक मर्ढेकरांनी आत्मनिष्ठा > भावनिक तादात्म्य > वाङ्मयीन माहात्म्य असे एक वर्तुळ सांगितले होते. पण इकडे दुर्लक्ष होऊन फक्त आत्मनिष्ठेकडेच अनेकांनी डोळे लावले व तेही चुकीच्या अंगाने. आत्मनिष्ठेत स्वतःचे अनुभव कलावंताने अविकृत स्वरूपात मांडावे असा एक विचार होता. पण या विचारातून अनुभवाच्या अविकृतीपेक्षा त्याची स्वतः सापेक्षताच अधिक वाखाणली जाऊ लागली. यातूनच वेगळे अनुभव हेरण्याची किंवा अनुभवाला वेगळे रूप देण्याची हौस बळावली – म्हणजे हे वळण आत्मनिष्ठेच्या मुळावरच आले.

स्वत्व प्रस्थापित करण्याचा आणखी एक प्रयत्न म्हणून त्यांनी वेगवेगळे काव्यप्रकार हाताळले : विशेषतः लावणी व नाट्यकाव्य. हे दोनही प्रकार त्यांच्या प्रतिभेला मूलतः अनुकूल होते. त्यांची प्रतिभा आहे अभिजातवादी कवीची. पण भावकाव्याच्या काळात स्वच्छंदवादाचे सोंग घेण्याची इच्छा तिला झाली. त्यामुळे आत्मनिरपेक्षपणे अनुभवही मांडता आले नाहीत की आत्मसापेक्षतेने त्यांचा आविष्कारही साधला नाही. अनुभव आपले म्हणायचे व ते नाटकीपणाने मांडायचे. त्यामुळे त्यांची कविता बहुधा 'एपिक' व 'लिरिक' या दोनही मूलभूत गुणधर्मांना आचवली; यांच्या मिश्रणातून राजकवी तांब्यांनी जसा तिसरा 'ड्रॅमॅटिक' गुणधर्म निर्माण केला तसेही बापटांना साधले नाही.

लावणीकार काही आत्माविष्कार करीत नव्हता. त्याचे व्यक्तित्व निव्वळ साधनीभूत होते. जनमनामध्ये जे अनु-भव धगधगत होते त्यांना शब्दरूप देण्याचे कार्य लावणी-कार करीत होता. लोकवाङ्मयात जो 'एपिक' गुणधर्मांचा आभास होतो तो या व्यक्तिनिरपेक्षतेमुळेच. 'गोरी', 'वय वर्षे सोळा', 'रंगाने तू गव्हाळ', 'नाजुक रुपडे' या लावण्यांमध्ये असा 'एपिक' गुणधर्मांचा आभास आहे का? आजच्या काळात ते शक्यही नाही. लावणी कितीही कुणाला आवडत असली तरी खऱ्या अर्थाने आज ती अव-तरू शकत नाही. एकेका काळात एकेक नवा वाङ्मयप्रकार उद्भवतो तो यामुळेच. नव्या काळातील अनुभवांना व्यक्त करण्यास जुना काव्यप्रकार अपुरा पडत असतो, तो असा. पण याचे भान बापटांना नाही. पेशवाई लावणीच्या धर्तीवर, काही आधुनिक जीवनाचे निर्देश घालून, बापटांनी लावण्या लिहिल्या. त्या पूर्वीच्या लावण्या नाहीत यात नवल नाही. पण अनुभवाच्या मर्माकडे जाण्याचे बळ अजून करीत नसल्यामुळे इतर कवितांप्रमाणे इथेही कवी काही अनुभवांशी 'फ्लर्टिंग' करीत आहे असेच वाटते.

'प्रियंवदा' हे नाट्यकाव्य. पण नाट्यकाव्य हा काव्याचा प्रकार नाही. तो नाट्याचा प्रकार. नाट्यगीतात नाट्य काव्याला पूरक असते. तसे नाट्यकाव्यातून काव्य नाट्याला पूरक ठरते. नाट्य या वाङ्मयप्रकाराचे वैशिष्ट्य हे की त्यात वाङ्मयाचे जितके म्हणून गुणधर्म असू शक-तात ते सारे सामावू शकतात. 'एपिक-लिरिक-ड्रॅमॅटिक' हे प्रधान गुणधर्म तर त्यात असतातच. नाट्यकाव्यामध्ये

यातील शेवटचे दोन गुणधर्म मुख्य असतात एवढेच. पण 'लिरिक' गुणधर्मांशी बापटांचे सहसा जमले नाही. 'ड्रॅमॅटिक' गुणधर्म त्यांना साधू शकतो पण तोही पुन्हा 'एपिक-लिरिक' गुणधर्मांच्या आश्रयानेच फुलत असल्याने तिथेही त्यांना व्याजनाट्यावरच भागवावे लागते. 'प्रियवंदे'मध्ये असेच एक जुजबी व्याजनाट्य आहे.

**: ६ :**

महत्त्वाची गोष्ट अशी की 'अकरावी दिशा'मध्ये ही धडपड संपलेली नाही.

'अंध', 'मुकी मुकी रात्र', 'गोष्ट' या कवितांचा दृश्य आकार जरी वेगळा असला तरी त्यामागे आता निव्वळ आकारशोध नाही. कवितांतील अनुभवांच्या त्या अपरिहार्य बाह्यरेखा आहेत. म्हणूनच त्या फटकून राहून आपल्या डोळ्यांत खुपत नाहीत अनुभवाचे अ-सामान्यीकरण करण्याची लकबही आता मागे पडली आहे. 'क्षणभर या सौधावर' ही कविता पाहा. 'विवाहित स्त्री व तिचा पूर्वाश्रमीचा प्रियकर' या बापटांना आवडणाऱ्या अनुभवावरच ही कविता आहे. 'फुंकर'चा अनुभव व या कवितेतील अनुभव यांचा तोंडवळा सारखा आहे. पण त्यांच्या प्रतीमध्ये किती फरक पडला आहे. 'फुंकर' ही भावकविता नाही; इथे मात्र एक भावकविता प्रगटली आहे. तिची पातळी फारशी वरची नसली तरी कविता वैशिष्ट्यपूर्ण करण्यापायी अनुभवाचे नाटकीकरण किंवा असाधारणीकरण करण्याचे कवीने कटाक्षाने टाळले आहे. 'भेट' आणि 'प्रवास' या कवितांबद्दलही असेच म्हणता येईल.

पण या तीनही कवितांत त्यांची एक दुसरीच जुनी सवय डोकावत आहे: कथनपरता.

अ. **ये क्षणभर मजजवळी**
**पश्चिमेस...त्या तिकडे ...**
**सूर्याचा घट उलटा**
**सागरात बुडताना**
**पाहू या**
**आणि तसे बघताना**
**गुंफू या दोघेजण**
**हात असे कटिभवती**
**भानावर नसल्याचे भासवून ...**

आ. **माझे अबोलीचे ओठ**
**त्यांना पाषाणाचे बळ**
**माझा अभोगी शृंगार**
**लपवतो सारे वळ**

इ. **बकुळीखाली भोळी चिमणी**
**खेळत होती छप्पापाणी**
**किंचित अपऱ्या नाकाची**
**भुरक्या झिपऱ्या केसांची**

ही सारी चतुर असली तरी निवेदनेच आहेत. कथाकाव्यात किंवा नाट्यकाव्यात अशा निवेदनांनाही स्थान असते. पण भावकाव्यात भाषेचे रूपच बदलते. तिला पूर्णांशाने भावसंक्रामक व्हावे लागते. 'छायांकित' या कवितेत बापट अशा भावसंक्रामक भाषेच्या पुष्कळच जवळ गेले आहेत. पण तिथेही

**तुझी धिटाई उद्दंड**
**आणी शहाण्याच्या छाटा**
**चूड पेटवून डोळा**
**आज जागतो चव्हाटा**

अशा विसदृश व वर्णनपर ओळी आहेतच. 'मुकी मुकी रात्र', 'लेणे', 'चंद्रकोरीपरी कोवळे हासणे', 'अरे, मी जाणते सारे', 'निसर्गातल्या आदिशक्तीपरी तू', 'तू गर्भालस', 'स्वप्नामधुनी जरा दूर व्हा' या 'अकरावी दिशा'मधील यशस्वी भावकविता. यशस्वी या अर्थाने की भावकवितेला मूलतःच विघातक असलेले घटक या कवितांत नाहीत. म्हणजे आता कुठे बापट कर्जातून मुक्त होत आहेत; पण पूर्ण झाले आहेत का? 'रात्र : झेलमच्या बागेत' या कवितेत बोरकर, 'आंधळा अंधार' या कवितेत ना. व. देशपांडे व 'लेणे' या कवितेत चित्रे यांचे दर्शन होत नाही का? शिवाय बालकवी नाहीतरी शाहीर, कुसुमाग्रज व मर्ढेकर यांच्या छटा कितीतरी कवितांत दाखविता येतील. दुसऱ्या एखाद्या कवीबाबत आपण एवढे लक्षही दिले नसते. पण जो कवी आरंभापासून अट्टाहासाने अनुकरणातून मुक्त होण्याचा प्रयत्न करतो त्याच्या बाबतीत असे दक्ष राहिलेच पाहिजे – त्याची वाटचाल जाणण्यासाठी. मग 'उमा'-सारख्या नाट्यकाव्यात 'किरणांचा उधळून पिसारा' असा चरणार्धही आपल्याला कुसुमाग्रजांच्या स्मरणाने अस्वस्थ करतो. 'लाखदा माझ्या मनाला' व 'हिमालय' या संमेलनी कविता वाचून खंत वाटते.

अनुक्रमणिका



: ७ :

बापटांची प्रतिभा भावकाव्याला अनुकूल आहे का ? ‘ पूर्णाहुतीचा तो दिवस ’ ( बिजली ), ‘ विनोबा ’ ( सेतू ), ‘ मुकी मुकी रात्र ’ ( अकरावी दिशा ) अशा प्रत्येक संग्रहातून एखादीच अस्सल भावकविता शोधून सापडेल. एरवी प्रचारपद्ये, संमेलनी पद्ये, नाट्यगीते, नाट्यकाव्य असे प्रकारच अधिक आढळतील.

बापट प्रचारपद्ये लिहितात म्हणून त्यांना हिणवायचे कारण नाही; कारण प्रचारपद्य हाही काव्याचा एक प्रकार आहे; आणि भावकाव्याइतका सरस नसला तरी आस्वादानुकूल आहेच. प्रसंगी त्यातून भावकाव्याचे धुमारेही फुटू शकतात. बापटांबद्दल तक्रार करायची ती अशी की, देवल किंवा अमर शेख यांच्याइतकी सरस प्रचारपद्ये ते लिहू शकले नाहीत ही. ‘ बिजली ’च्या प्रारंभी ‘ बिजली ’, ‘ देशाची हाक ’ अशी काही प्रचारपद्ये आहेत. पण ‘ सेतू ’ मध्ये त्यांनी एकदम मोहराच बदलविला. ‘ प्रचार हेही साहित्याचे एक दालन असले तरी ते काव्यापासून फार निराळे आहे ’ असे त्यांना आता वाटू लागले. त्यामुळे ‘ बिजली ’नंतर बापटांनी प्रचार-पद्ये लिहिली तरी ती ‘ सेतु–अकरावी दिशा ’मध्ये समाविष्ट केली नाहीत. नाही केली ते बरेही झाले. कारण प्रचारपद्याला आपले प्राथमिक कार्य करता करता आपोआप अस्सल काव्याचे पंख फुटू शकतात हे ‘ कलश ’काराप्रमाणे बापटांना कधीच कळले नाही. वास्तविक मराठी कवितेची ही गरज होती. केशवसुत, कुसुमाग्रज, मुक्तिबोध यांनी अस्सल सामाजिक काव्य लिहिले तरी ते समाजाच्या पातळीवर जाऊन लिहिले नव्हते; ज्यांनी तसा प्रयत्न केला त्यांना ते अस्सल काव्याच्या पातळीवर चढविणे जमले नव्हते – अशी आधुनिक कवितेची गरज होती. पण बापटांनी तर प्रचार आणि काव्य यांची एकदम फारकत करून टाकलेली. त्यांना या दिशेने विकास कसा साधावा ? कुसुमाग्रजांचे शिष्यत्वच स्वीकारायचे होते तर कुसुमाग्रजांनी जिथे विश्रांती घेतली तिथून पुढे जायला हवे होते.

पण अशी समजूत यायला आपल्या व्यक्तित्वाची, कलानिर्मितीच्या प्रक्रियेची व मराठी काव्यपरंपरेची जिद्दीने जाणीव करून घ्यावी लागते किंवा स्वभावतः ती असावी लागते. आत्मविकासासाठी बापट सतत व सोशिकपणे धडपडत असले तरी जगाच्या दहा दिशा टाकून स्वतःची अकरावी दिशा त्यांना सापडत नाही याचे कारण अशी कुठल्याही प्रकारची जाणीव त्यांच्यापाशी नाही. ‘ सेतू ’ला जोडलेल्या भूमिकेवरून काव्यविषयक – जीवनविषयक त्यांच्या कल्पना किती जुजबी आहेत हे कळतेच, पण त्यांच्या काव्यावरूनही ते चांगले स्पष्ट होते. प्रथम सामान्य प्रचारपद्ये, मग त्याचेच नागर – पण अस्सल नव्हे – रूप म्हणून संमेलनीय पद्ये, नंतर श्राव्यलयीने मुरडणाऱ्या, कृतक आत्माविष्कार करणाऱ्या भावकविता, स्थूल कथानकप्रधान – कथनप्रधान नाट्यकाव्ये, आधुनिकतेचा आभास निर्माण करणाऱ्या पण लावणीची परंपरा न ओळखणाऱ्या लावण्या > नाट्यगीते असा त्यांच्या धडपडीचा आलेख आहे. दृश्य आकारातील प्रयत्न टाकून श्राव्यलयीकडे, श्राव्यलयीकडून अ-साधारण अनुभवाच्या निर्मितीकडे व अ–साधारण अनुभवांकडून विशिष्ट नव्या जुन्या काव्यप्रकारांकडे – सुनीत, नाट्यकाव्य, लावणी – बापट गेले हा त्यांचा विकासच म्हणता येईल – पण किती तोकडा !

कवितेच्या आकृतीकडून जेव्हा ते तिच्या अनुभवाकडे वळले तेव्हा एकदम अनुभवाचे मर्मच पकडण्याकडे ते का धावले नाहीत ? तसे करताना अनुभव, आपले व्यक्तित्व, भोवती विश्व व काव्यकला या साऱ्यांबद्दल एक रसरशीत अनुभूती त्यांना लाभली असती व त्यांच्या कवितेचा विकास वेगळ्याच दिशेने झाला असता. असे का घडले नाही ? त्याऐवजी आकृतीपासून कवितेच्या अनुभवापाशी आल्याबरोबर बापट अनुभवाच्या मर्माचा शोध घेण्याऐवजी त्याचे असाधारणीकरण करण्यात, त्याला नाटकी रूप देण्यात, तो वेगवेगळ्या काव्यप्रकारांत बसविण्यात उतावीळ का झाले ? इथेच त्यांच्या प्रतिभेची जात स्पष्ट होते. ही जात भावकवीची नाही. आपल्या व्यक्तित्वात बुडून आपल्या अनुभवाची लय पकडायची अन् तीच शब्दप्रतिमांतून उत्कटतेने आविष्कृत करायची अशी भावकवीची त्यांची जात नाही.

तरी पुन्हा पुन्हा भावकवितेकडे त्यांची प्रतिभा जात राहिली याचे कारण त्यांच्या प्रतिभेवर झालेले आधुनिक कवितेचे – जी मुख्यतः भावकविताच आहे – संस्कार; उदाहरणार्थ, बालकवींचे, मर्ढेकरांचे संस्कार. शिवाय कविसंमेलनांतील अवाङ्मयीन यशामुळे अधिकाधिक बहिर्मुख झालेली त्यांची वृत्ती – तिने त्यांना स्वतःच्या प्रतिभाधर्माचा धड शोध घेऊ दिला नाही.

त्यांनी जर धिमेपणाने स्वतःकडे पहावयाचा प्रयत्न केला असता तर त्यांच्या हे लक्षात आले असते की केशवसुत, बालकवी, यशवन्त, मर्ढेकर यांच्याप्रमाणे

साक्षात आत्माविष्काराची प्रेरणा आपल्यात नाही. उलट कुठल्याही–स्वतःच्या वा समाजाच्या–अनुभवाला एक वस्तुनिष्ठ आकार देऊन, त्याचे एखाद्या स्थलकालसापेक्ष घटनेत रूपांतर करून, परंपरेने दिलेली सर्व शक्ती आत्मसात करून अप्रत्यक्ष आत्माविष्कार करणे ही आपली प्रेरणा आहे. त्यांची प्रचारपद्ये, संमेलनी पद्ये, कृतक भावकविता, लावण्या व नाट्यकाव्ये याच त्यांच्या प्रेरणेची साक्ष देतील.

या आपल्या प्रेरणेची जाण नसल्यामुळे व काळ अशा प्रकारच्या कवितेला आपाततः तरी अनुकूल न वाटल्यामुळे त्यांची कविता आतील प्रेरणा वेगळी व वरील संस्कार व भोवतीची हवा वेगळी अशा कैचीत सापडली. त्यामुळे बाह्य प्रेरणेने बापट भावकविता लिहायला गेले तरी आंतरिक प्रेरणेने मूळ अनुभवाला घटनारूप देण्याच्या इच्छेने ते नाट्यात्मकतेकडे झुकू लागतात. पण वर्णन, चित्रण, नाट्यीकरण यांची वरवर :तर : चीड – व म्हणून पुन्हा या घटनारूप अनुभवाला आत्मनिष्ठेचा मुलामा देण्याचा प्रयत्न – यांतूनच नाटकीपणा निर्माण झाला. इतरांचेच नित्यपरिचित अनुभव नाट्यपूर्ण पद्धतीने मांडावे, परंपराप्रेमाची पूर्ती करावी या आंतरिक प्रेरणेतून लावणीकडे त्यांचे मन वळले ; पण आत्माविष्काराच्या तात्कालिक चलनाला भुलून त्यात आत्मनिष्ठा आणण्याचा प्रयत्न–अशी चमत्कारिक विसंगती बापटांच्या व्यक्तित्वात व कवितांत दिसून येते. या विसंगतीतून कुसुमाग्रजांनी जसा अचूक मार्ग काढला ती शक्ती बापटांजवळ नाही. कुसुमाग्रजांचा आदर्श त्यांनी इतक्या व्यापकपणे स्वीकारायचा आहे; त्यांच्यावरील गुंतागुंतीचे वाङ्मयीन संस्कार हे इतके खोलवर आहेत.

: ८ :

जिला प्रथम दर्जाची म्हणता येईल अशी कविता अजून बापटांनी लिहिली नाही हे खरे. पण तरीही त्यांच्या कवितेचे आपल्याला अगत्य वाटते. कारण कुसुमाग्रज व मर्ढेकर यांचे गुणधर्म एकत्र करण्याचा एक चुकीचा व फसलेला प्रयत्न या कवितेने करून पाहिला आहे. पण त्याहीपेक्षा महत्त्वाची गोष्ट म्हणजे या कवितेची धडपड संथ आणि पुष्कळशी वरवरची असली तरी ती कधीच बंद पडलेली नाही ; तिला कधीतरी आपले रूळ सापडतील असे वाटते.

परंतु याहून महत्त्वाची बाब म्हणजे कुंटे > राजकवीतांबे > बी > गिरीश > कुसुमाग्रज ही आज खंडित झालेली परंपरा चालविण्याचे बळ उद्या तिच्यामध्ये येऊ शकेल.

× × ×

प्रा. भवानीशंकर श्रीधर पंडित

# मराठी रंगभूमीचे जनक : अण्णासाहेब किर्लोस्कर

इ. स. १८८० साली मराठी रंगभूमीचा जन्म झाला. आणि इ. स. १९३० च्या आसपास ती नामशेष झाली. ही वस्तुस्थिती आहे. काही कर्तृत्वशाली व्यक्तींना ज्याप्रमाणे फक्त पन्नास वर्षांचेच आयुष्य लाभते ; पण तेवढ्या मर्यादित काळात ते चिरस्थायी व भरीव कार्य करून दिवंगत होतात. त्याचप्रमाणे मराठी रंगभूमीने अवघ्या अर्धशतकाच्या आयुष्यात महाराष्ट्राला रसिकता व सदभिरुची शिकविली, नवीन कलादृष्टी दिली, उद्योगधंद्यातील सहकाराची महती पटविली आणि नाट्यनिपुण नट, प्रतिभासंपन्न नाटककार व त्याची रम्योदात्त नाटके यांची उज्ज्वल परंपरा निर्माण करण्यात साहाय्य केले.

अनुक्रमणिका

संस्कृत व प्राकृत वाङ्मयांत नाटके आहेत. परंतु प्राचीन मराठी वाङ्मयात नाटके नाहीत. नाटकांची परंपरा अशा रीतीने खंडित का व्हावी हा एक विचारणीय प्रश्न आहे. मराठी वाङ्मयाच्या प्रारंभकालीच महाराष्ट्रावर मुसल्मानांचे आक्रमण झाले. पुढे महाराष्ट्रात चवदा वर्षांचे दीर्घ अवर्षण पडले. त्यानंतर स्वराज्याची स्थापना झाली. पुढे स्वराज्याचे साम्राज्य झाले. परंतु इतके सर्व होऊनही महाराष्ट्राच्या कारभाराची घडी शेवटपर्यंत नीट बसली नाही. नाटकासारखे वाङ्मयाचे ललित प्रकार शांततेत व सुबत्तेत उदयाला येतात. महाराष्ट्राच्या इतिहासात हा जवळजवळ पाच शतकांचा काळ धामधुमीचा होता. तेव्हा त्या झटापटीच्या जमान्यात नाटकासारखा वाङ्मयाचा मनोरंजक प्रकार महाराष्ट्रात मूळ धरू शकला नाही.

पाच शतकांच्या या प्रदीर्घ अवधीत संतांचे आध्यात्मिक व पंडितांचे पौराणिक भक्तिपर वाङ्मय निर्माण झाले. कारण धर्माच्या संरक्षणासाठी आणि संस्कृतीच्या संवर्धनासाठी त्या काळी त्या प्रकारच्या प्रोत्साहक व संजीवक साहित्याची नितांत आवश्यकता होती. विजिगीषु इस्लामच्या चढत्या वाढत्या आक्रमणाला शक्य तितका पायबंद घालण्याचा तो पराकाष्ठेचा प्रयत्न होता. त्या प्रामाणिक प्रयत्नाच्या पोटी पारमार्थिक संतांना ‘ काव्यालापांश्च वर्जयेत् ’ आणि प्रापंचिक पंडितांना ‘ रंडागीतानि काव्यानि ’ असे वाटावे हे साहजिक होते. शिवाय महाराष्ट्रावर ज्याची राजकीय सत्ता दिवसेदिवस अधिकाधिक पसरत होती त्या इस्लामला गाणेबजावणे, हसणेनाचणे, सोंगे सजवणे व हातवारे करणे निषिद्ध होते. त्या वेळच्या सोवळ्या हिंदुसमाजात नटांसंबंधी काही चमत्कारिक कल्पना होत्या. स्त्रीवेषधारी नटाचे मुखावलोकन केले तर पुरुषाला सात जन्म स्त्रीचा व स्त्रीला सात जन्म पुरुषाचा जन्म येतो आणि जो नट स्त्रीवेष घेतो तो पुढे सात जन्म षंढ होतो या त्या कल्पना होत. श्रीधराच्या शिवलीलामृतात अशा चमत्कारिक सामाजिक समजुतींची एक यादीच आहे. पेशवाईच्या ऐन भरभराटीतील महाराष्ट्रीय समाज नाटकांच्या बाबतीत कमालीचा उदास व अरसिक होता. तो संस्कृत कवींची आणि त्यांच्या अभिजात नाटकाची यथेच्छ निंदा करण्यात आनंद मानीत असे. समाजाच्या या शुष्क व रुक्ष मनोवृत्तीविषयी संस्कृत नाट्यवाङ्मयाच्या रसोदधीत अवगाहन केलेल्या कविश्रेष्ठ मोरोपंतानी आपल्या ‘ रामरीती ’त म्हटले आहे, —

धातूत जसे हाटक नाटक वर सर्व सुप्रबंधांत
ते अरसिकांत संप्रति निष्फळसे मुकुर जेवि अंधांत
रस न समजती, म्हणविति रसिक म्हणुनि चित्त बहुत
हळहळते

जे तन्निंदक भाषण होते कर्णात तप्त हळहळते
थोरांही स्तविले कवि, तन्निंदा तिळहि सोसवत नाही
मज सुरस ग्रंथांही, वृत्तिपरा जेवि सोस वतनाही.

बहुरूप्यांची विविध वेषांतरे, कळसूत्री बाहुल्यांचे नानाप्रकारचे खेळ, कोंकणातील दशावताऱ्यांनी भिन्नभिन्न सोंगे, वऱ्हाडातील दंढारे आणि उत्तर हिंदुस्थानातील रामलीला हे मनोरंजनाचे खेड्यापाड्यांतील प्रकार फार पूर्वीपासून आजतागायत चालू आहेत. त्यांचे मूळ स्वरूप आहे तसेच आहे. त्यात कालमानाप्रमाणे फारशी सुधारणा दिसत नाही. त्यांचा मराठी रंगभूमीशी आणि मराठी नाटकांशी अर्थाअर्थी संबंध नाही. महाराष्ट्रात अनेक घराण्यांत विवाह किंवा व्रतबंधासारख्या मंगलकार्याच्या प्रसंगी कुलदैवताच्या नावाने गोंधळ घालण्याची परंपरागत पुरातन प्रथा आहे. पुढे पानपतातील पराभवानंतर पेशवाईच्या उत्तरार्धात मुसलमानी फौजांतील तमाशांच्या अनुकरणाने महाराष्ट्रात तमासगीर आले. तमाशा, तमासगीर, शाहीर, इष्क, आशूक, माशूक, पाकसूरत, खूबसूरत, गिरेबाज खबूतर इत्यादी तमाशातील शब्द व त्यामागील कल्पना मुळात मुसलमानी आहेत. तमाशातील स्त्रीचा साज चढवलेला ‘ नाच्यापोऱ्या ’ हा मुसलमानी वाङ्मयातील ‘ साकी ’चा मराठी अवतार आहे. या दोन्ही प्रकारांचे मराठी रंगभूमीशी व नाटकाशी दूरचेही नातेगोते नाही. उलट या साऱ्या कलाहीन व ओबडधोबड करमणुकींच्या ग्राम्य प्रकारासंबंधीची नापसंती नागर सुशिक्षितांच्या म्हणींत व वाक्प्रचारांत व्यक्त झाली आहे. ‘ भोरप्याने सोंग पालटले वरी ’ ही बहुरूप्यासंबंधीची तुकोबांची उक्ती सर्वश्रुतच आहे. ‘ काय पण अवतार आहे ’ या नागर वाक्प्रचारात कच्छ, मच्छ, वराह, नरसिंह व वामन या अवतारांची ओंगळवाणी व किळसवाणी कुरूपता अभिप्रेत आहे. ‘ रात्र थोडी व सोंगे फार ’ आणि ‘ काय पण सोंग आहे ’ यात सोंगाविषयीचा व त्याच्या मुखवट्याविषयीचा तिरस्कार व उबग आहे, ‘ बाहुली नाचवणे ’ या वाक्प्रयोगात बाहुल्यांत नाट्याचा पूर्ण अभाव आहे, स्वतंत्र प्रज्ञा नाही हा आशय आहे. ‘ गावढ्यापुढे वाचली गीता, कालचा गोंधळ बरा होता ’ या म्हणीत गोंधळ हा प्रकार गावदळ

असल्याचे सूचित केले आहे. 'तमाशा.' हा शब्द नेहमीच नाटकाच्या विरोधात योजण्यात येतो. 'तमाशा' म्हणजे कलाहीन धांगडधिंगा आणि 'नाटक' म्हणजे कलात्मक दृश्य काव्य. रंगभूमी आणि नाटक यांची पातळी फार वरची आहे. त्यांचा या मनोरंजक ग्रामीण प्रकारांशी मुळीच संबंध नाही. 'काही नाट्यसमीक्षक बादरायणसंबंध जोडतात तो हास्यास्पद आहे.'

महाराष्ट्रात ज्या वेळी 'रंगभूमी' व 'नाटक' हे शब्द प्रचलित नव्हते त्या वेळी दूर दक्षिणेत तंजावरला तत्रस्थ भागवत मंडळीचा 'यक्षगान' हा मनोरंजनाचा प्रकार रूढ होता. तंजावरला छत्रपती शिवाजी महाराजांचे सावत्र बंधू एकोजी राजे राज्य करीत होते. त्यांच्यामागून गादीवर बसलेल्या शहाजी, एकोजी, प्रतापसिंह व सरफोजी या राजपुरुषांच्या नावांवर काही 'यक्षगाने' आहेत. शिवाय मेरुस्वामी व त्र्यंबक ज्योतिर्विद यांच्या नावांवर काही 'यक्षगाने' असून काही 'यक्षगानां'चे कर्तृत्व अनामिक आहेत. या यक्षगानांची एकूण संख्या पस्तीस असून त्यांची हस्तलिखिते तंजावरच्या सरस्वती-महालात सुरक्षित आहेत. यांपैकी 'लक्ष्मीनारायण कल्याण' हे यक्षगान इतिहासाचार्य राजवाडे यांना उपलब्ध झाले होते. तंजावरचे मराठे राजे अतिशय रसिक व मोठे विद्याप्रेमी होते. त्यांच्या राज्यांत फारसे उपद्रव नव्हते. बहुतेक ठिकाणी शांतता व सुबत्ता होती. त्यामुळे तेथे यक्षगाने निर्माण झाली. या यक्षगानांत 'गान' प्रमुख आहे आणि 'संवाद' गौण आहेत. किंबहुना संवाद तात्पुरते नावालाच आहेत. त्यांच्यात अभिनयाला अवसर नाही. 'गाना'त देखील सारा भर नृत्यावर आहे. सारांश, या यक्षगानांचा मराठी रंगभूमीशी व मराठी नाटकाशी दूरचादेखील संबंध नाही.

तंजावरला ज्याप्रमाणे यक्षगान करणारी भागवतमंडळी होती त्याप्रमाणे कर्नाटकात भागवतातील आख्याने वठवणारी भागवतमंडळी होती. कर्नाटक या नावातच नाटक आहे. कर्नाटक व तंजावर हे द्रविडांचे प्रांत. शंकराचार्य, रामानुजाचार्य, निंबार्क, मध्व, विष्णुस्वामी, वल्लभ इत्यादी महान धर्मप्रवर्तक द्रवीड होते. द्रवीड प्रांतात शैव व वैष्णव यांचे मेळावे मोठे. भक्तीची व्यापक चळवळ तिकडूनच साऱ्या भारतवर्षात पसरली. त्या जुन्या काळात स्त्रीशूद्रादी निरक्षर असत. पोथ्यांचा प्रचार कमी असे. पठनपाठनाचे कार्य केवळ ब्राह्मणज्ञातीकडे असे. तेव्हा बहुजनसमाजास भागवतग्रंथातील श्रीकृष्णचरित्र समजावे म्हणून देवळाच्या बाहेर किंवा देवळाच्या आवारात अथवा एखाद्या राजपुरुषाच्या सभांगणात 'कृष्णलीला' होत. या लीला करून दाखविणाऱ्या लोकांना ते कृष्णाचे भक्त म्हणून 'भागवत' म्हणत. आणि त्यांच्या समूहाला 'भागवत-मंडळी' म्हणत.

कर्नाटक प्रांत सांगली संस्थानास लागून आहे. सांगलीच्या गादीवर चिंतामणराव अप्पासाहेब सांगलीकर असताना कर्नाटकातील भागवत मंडळ्या सांगलीला येत व कानडी भाषेत कृष्णभक्तिपर 'आख्याने' करून दाखवीत. चिंतामणराव अप्पांनी काही आख्याने पाहिली. अशी आख्याने मराठीत असावीं अशी त्यांना इच्छा झाली. त्यांच्या संस्थानात विष्णुदास भावे हरहुन्नरी गृहस्थ होते. चिंतामणराव अप्पांनी त्यांना कानडी आख्यानांच्या धर्तीवर मराठी आख्याने रचून ती करून दाखविण्याची आज्ञा केली. तेव्हा भाव्यांनी इ. स. १८४३ साली 'सीतास्वयंवर' आख्यान करून दाखविले. चिंतामणराव अप्पा गादीवर असताना राज्य सांभाळण्याचा मक्ता इंग्रज रेसिडेंटाकडे होता. दिवस स्वस्थतेचे व शांततेचे होते. रिकामा वेळ घालविण्यासाठी अप्पासाहेबांना मनोरंजनाचे एखादे साधन हवे होते. तेव्हा ते त्यांनी अशा रीतीने प्राप्त केले.

भाव्यांच्या 'आख्यानां'चे मराठी रंगभूमीशी व मराठी नाटकाशी अगदी साम्य नाही. ही आख्याने बहुधा श्रीमंतांच्या वाड्यात एखाद्या उंच ओसरीवर किंवा देवळाच्या आवारातील एखाद्या प्रचंड व ऐसपैस तख्तराव्यावर करून दाखवत. या उंच जागांवर सोंगे सजून उभी रहात. रावणाच्या दहा तोंडांसाठी मातीच्या किंवा कागदाच्या मुखवट्यांची योजना असे. मारोतीचे सोंग घेणाऱ्याला माकडाचा मुखवटा असे. सोंगे उंचवट्यामागील खोल्यांमधून प्रवेश करीत. क्वचित उंचवट्यापुढे साटिनचा एखादा सरक पडदा असे. 'आख्यान' लावण्यापूर्वी सूत्रधार ओसरीच्या एका बाजूस उभा राहून मृदंगाच्या तालावर व झांजांच्या नादावर श्लोक म्हणे. उदाहरणार्थ,

> प्रधान बोलें मग रावणाला,
> "न का तुम्हीं भोगिलि जानकीला ?"

हा श्लोक त्याने म्हटला की, प्रधानाचे सोंग घेणारी व्यक्ती रावणाचे सोंग घेणाऱ्या व्यक्तीला श्लोकाच्या दुसऱ्या चरणातील प्रश्न गद्यामध्ये हातवारे करून

विचारीत असे. श्लोकाचा अन्वयार्थ लावण्याची ही पद्धती नाटकातील संवादाशी समांतर आहे असे तरी म्हणता येईल का ?

'आख्याने' बहुतकरून पौराणिक असत. कीर्तनात हरदासांच्या कथा कानी पडल्यामुळे प्रेक्षकांना 'आख्याना'तील कथाभाग पूर्वपरिचित असे. फरक इतकाच की हरदासी कथा ते कानांनी ऐकत, तर भागवती 'आख्यान' डोळ्यांनी पाहत. या 'आख्यानां'-चा आरंभ एका ठराविक साच्याचा असे. त्यामुळे उजाडे-पर्यंत जागरण करून 'आख्यान' पाहण्याचे वातावरण निर्माण होत असे. सुरुवातीस 'अभिनव वाग्विलासिनी' व 'चातुर्यकलाकामिनी' सरस्वती मोरावर बसल्या-सारखे करून जवळजवळ तासभर नाचत असे. मोर लाकडी असे. सरस्वतीचे सोंग संपादणारे पोर तो लाकडी मोर दोन जांघांत दाबून स्वतःच्या पायांनी नाचत असे व मोरास नाचवीत असे. त्यात 'वाग्विलास' किंवा 'चातुर्यकला' यांचा पूर्णतया अभाव असे. मग 'गणेशटोपी' घातलेला 'गणपती' कापडी सोंड हाताने हलवीत प्रविष्ट होत असे. त्यानंतर देवांची कचेरी असे. मग राक्षसांचा दरबार भरत असे. राक्षसांची कामे करणारी सोंगे राळ उडवीत, 'अलल्ल् डुर्र अलल्ल् डुर्र' असा आरडाओरडा करीत, पट्ट्याचे हात फिरवीत, मृदंगाच्या तागड थोम् तागड थोम् या नादावर धांगड-धिंगा करीत प्रवेश करीत. जवळजवळ एक तासभर त्यांचा धुडघूस चालत असे. ही कामे करणारी मंडळी दिवसा हलवायाच्या दुकानात दूध आटवी, संध्याकाळी आखाड्यात पेहेलवानी करी आणि रात्री अंगात पिशाच आल्याप्रमाणे थैमान घाली. 'विष्णुदास भाव्यां'च्या या 'आख्यानां'चे स्वरूप पुष्कळ प्रमाणांत हरदासी कथेशी मिळते जुळते आहे. मराठी रंगभूमीशी व नाटकाशी त्याचा संबंध पोचत नाही. मराठी रंगभूमीचा व मराठी नाटकाचा जन्म इ. स. १८४३ साली झाला असा जो महाराष्ट्रात समज आहे तो वस्तुतः बरोबर नाही.

इ. स. १८४३ मध्ये विष्णुदास भावे यांची पौराणिक 'आख्याने' सुरू झाली आणि इ. स. १८८० मध्ये बळवंत पांडुरंग ऊर्फ अण्णासाहेब किर्लोस्कर यांची 'गानी शकुंतला' रंगभूमीवर आली. त्या मधल्या जवळजवळ तीन तपांच्या काळात वेडगळ विषयावर घाणेरडे 'फार्स' लिहिणारे आणि त्यांच्या अचकट विचकट प्रयोगांनी लोकांची अभिरुची बिघडविणारे अनेक साधारण लेखक व सामान्य नट होऊन गेले. इंग्रजी वाङ्मयातला फार्स हास्यप्रचुर असतो आणि त्यातला उपरोध व विनोद मार्मिक असतो. पण महाराष्ट्रात नारायणराव पेशव्यांच्या करुण वधावर देखील फार्स आहे. याच कालखंडाच्या काही वर्षे अगोदर विद्याखाते अस्तित्वात आले होते. आणि पुढे इ. स. १८५७ च्या सुमारास विद्यापीठ स्थापन झाले होते. त्यात शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांकरिता परशुरामपंत तात्या गोडबोले, कृष्णशास्त्री राजवाडे व गणेशशास्त्री लेले या त्या काळच्या विद्वान पंडितांनी शाकुंतल, उत्तररामचरित, विक्रमोर्वशीय, मृच्छकटिक, मालतीमाधव, मुद्राराक्षस, वेणिसंहार इत्यादी अभिजात संस्कृत नाटकांची मराठी भाषेत रूपांतरे केली. ही रूपांतरे काव्यदृष्ट्या वाचनीय असली, तरी प्रयोगक्षम नव्हती. गोडबोले व राजवाडे या दोघांनी शाकुंतलाची रूपांतरे केली आहेत. तरीदेखील अण्णा किर्लोस्करांनी 'गानी शकुंतला' रचली. कारण त्यांना प्रयोगदृष्ट्या रचना करावयाची होती. या अवधीत विद्यापीठात शिकणाऱ्या विद्वानांना शेक्सपिअरच्या नाटकांची गोडी लागली. महादेवशास्त्री कोल्हटकर, नातू, शंकर मोरो रानडे, बजाबा रामचंद्र प्रधान, विष्णू मोरेश्वर महाजनी, गोपाळ गणेश आगरकर इत्यादिकांनी अथेल्लो, ज्यूलियस सीझर, किंग लिअर, कॉमेडी ऑफ एरर्स, सिंबेलाईन, हॅम्लेट आदी शेक्सपिअरच्या नाटकांचे मराठी अनुवाद केले, विनायक जनार्दन कीर्तने यांनी इंग्रजी नाटकांचा आदर्श समोर ठेवून थोरले माधवराव व जयपाल ही स्वतंत्र नाटके लिहिली. ही नाटके छापून इंग्रजी बुकांसारखी बांधलेली असत म्हणून या नाटकांना 'बुकिश नाटके' म्हणत. यांच्या अगोदरची विष्णुदास भाव्यांची 'आख्याने' पोथीप्रमाणे सुटी व विस्कळीत असत. त्यांच्या विरोधात बांधलेल्या नाटकांना बुकिश हे विशेषण मिळाले होते. बुकिश नाटकांच्या वेळी रंगभूमी अस्तित्वात आली होती व तिच्यावर त्या नाटकांचे प्रयोग देखील होत. परंतु ही बुकिश नाटके महाराष्ट्रास रुचली नाहीत आणि त्याच्या भूमीत कायमची रुजली नाहीत. आज केवळ मराठी नाटकाच्या इतिहासातील जीर्ण अवशेष येवढेच त्यांना महत्त्व आहे. त्यांच्यात नवयुगाचे प्रवर्तन करण्याचे व नवीन परंपरा निर्माण करण्याचे सामर्थ्य नव्हते. परंतु ३१ आक्टोबर १८८२ रोजी अण्णासाहेब किर्लोस्करांनी पुण्यास आनंदोद्भव नाटकगृहात आपल्या गानी

शकुंतलेचा यशस्वी प्रयोग करून दाखविताच खरी मराठी रंगभूमी जन्माला आली. आणि तिच्याबरोबर मराठी नाटकाचाही संभव झाला. त्या दिवसापासून दिवसेदिवस मराठी रंगभूमीची प्रगती होत गेली आणि नाटकाचे वाङ्मयीन मूल्य अधिकाधिक वाढत गेले. अण्णांच्या पूर्वी महाराष्ट्राला खऱ्या रंगभूमीची ओढ नव्हती आणि वाङ्मयीन नाटकाची आवड नव्हती. अण्णांनी मराठी नाट्याच्या सृष्टीत न भूतो न भविष्यति क्रांती केली यात संशय नाही.

अण्णांनी हे क्रांतिकार्य केले. त्या वेळी व त्यानंतर जवळजवळ पाव शतकाहून अधिक काळपर्यंत विष्णुदास भावे विद्यमान होते. इ. स. १८८५ साली त्यांनी आपला 'नाट्यकवितासंग्रह' संक्षिप्त आत्मवृत्तासह प्रसिद्ध केला आहे. अण्णांच्या नाटकांचा उदय होताच भाव्यांची 'आख्याने' मावळली. अण्णांच्या नाटकांच्या एक दोन वर्षे अगोदर सोकर बापूजी त्रिलोकेकर यांनी संगीत नाटके लिहिली होती. पण ती प्रयोगाच्या दृष्टीने गैरसोयीची होती; डोंगरे यांनी संगीत नाटके लिहून ती रंगभूमीवर यशस्वी करण्याचा प्रयत्न केला होता. परंतु त्यांच्या ठिकाणी अण्णांची योजकता नव्हती. त्यामुळे ती लवकरच नष्ट झाली.

अण्णांची प्रसिद्धी झाली नव्हती त्या वेळी मुंबईच्या ज्ञानप्रसारकसभेपुढे काशिनाथ बाळकृष्ण मराठे यांनी १६ फेब्रुवारी १८७२ रोजी 'नावल व नाटक या विषयी निबंध' वाचला होता. त्यात ते म्हणतात, "मराठी-मध्ये नवीन झालेल्या नाटकांपैकी 'माधवराव' या नाटकात रसाविर्भाव, सुंदर भाषा, विषयाची प्रौढी वगैरे गुण उत्तम साधले आहेत. परंतु जर संस्कृत नाटकांच्या भाषांतराची गणना केली नाही तर अद्यापि मराठीमध्ये एकही उत्तम नाटक झाले नाही. सर्व प्रकारच्या सुधारणांमध्ये विद्वानांचा पाय पुढे आहे तर ही नाटककला सुधारण्याकडेही त्यांनी लक्ष द्यावे असे आम्हांस वाटते. तुमची बायकामुले, चाकरचुकर, अल्पज्ञानी देशबांधव यांचे हित व मनोरंजन व्हावे अशी तुमची इच्छा असली तर स्वतः आपण नाटके रचावी अशी आमची विनंती आहे."

मराठ्यांची ही विनंती अण्णांच्या वाचनात आली होती किंवा नव्हती हे माहीत नाही. पण अण्णांनी मराठी रंगभूमी व मराठी नाटककार यांची एक थोर अविस्मरणीय परंपरा निर्माण करून मराठ्यांच्या इच्छेपेक्षा कितीतरी पटीने अधिक महनीय कार्य करून दाखविले. अण्णा बेळगावास कमिशनरच्या ऑफिसात कारकून होते ते ऑफिस काही काळ पुण्यात हालविण्यात येत असे. ते पुण्यास आले असताना अण्णांनी एकदा मुंबईचा एक फेरफटका केला. त्यात त्यांनी इंग्लंडातून हिंदुस्थानात आलेल्या काही नाटक कंपन्यांची इंग्रजी नाटके पाहिली. इंग्रजी ऑपेऱ्यावरून त्यांना 'संगीत नाटका'ची कल्पना स्फुरली. याविषयी सौभद्राच्या प्रस्तावनेत ते सांगतात, "दोनतीन वर्षांपूर्वी काही एक कारणाने **ह्या संगीताची** कल्पना माझ्या मनात उद्भवून श्रीमहाकवी कालिदासाच्या शाकुंतलाचे **भाषांतर संगीतात** केले व त्यास **योग्य** अशी **मंडळी** अनुकूल झाल्याने त्याचा **रंगभूमीवर प्रयोगही** करून दाखविला. तो **रसिकजनास** मान्य झाला. तेव्हा हे **संगीत सौभद्र** नाटक **तयार केले**. यात कितीएक ठिकाणी **इंग्लिशपद्धतीवरही रस** आले आहेत." यावरून अण्णांनी इंग्लिश नाटके पाहिली व अभ्यासिली होती याविषयी संशय राहात नाही. या विधानास उपोद्बलक असा एक पुरावा आहे. सुप्रसिद्ध कवी गंगाधर रामचंद्र मोगरे यांनी दिनांक १९।२।१८८५ रोजी अण्णांना एक कविताबद्ध पत्र पाठविले होते. त्यात म्हटले आहेः—

**जाता विक्रम भोज, मुंज विलया, आधार येथे नसे**
**ऐसे पाहुनि गौरकायभुवनी जी नाट्यविद्या वसे**
**तीला आर्यमहीत आणुनि पुन्हा विद्वज्जनांच्या मना**
**जो आनंद तुम्ही दिला न करवे त्याची मला कल्पना।**

तात्पर्य, अण्णांनी जुन्या नाटकांपासून स्फूर्ती घेतली; किंवा जुन्यानव्यांचा समवाय केला या समजुती बरोबर नाहीत. अण्णांनी इंग्रजी ऑपेऱ्याच्या धर्तीवर सर्वस्वी **नवीन** असा **संगीत नाटकांचा प्रकार** महाराष्ट्रात आणला. अण्णांच्या नाटकांत संवाद गद्यात असले तरी ते पद्याशी एकजीव झाले आहेत. किंबहुना बहुतेक संवाद पद्यात असून संगीताच्या नियोजनामुळे ते चिरस्मरणीय झाले आहेत. त्यांना प्रयोगात गाळून चालत नाही. 'लग्नाला जातो मी द्वारकापुरा', 'किति किति सांगू तुला' किंवा 'पांडुनृपतिजनक जया' ही पद्ये म्हणजे वस्तुतः गद्य आहे. परंतु त्यांचा अवतार संगीतात झाला आहे. अण्णांच्या वेळेपासूनच मराठी नाटकाच्या क्षेत्रात काही इंग्रजी शब्द कायमचे ठाणे

देऊन बसले आहेत. कंपनी, थिएटर, स्टेज, गॅलरी, पिट्, तिकीट, पास, ड्रॉपसीन, सीनसिनरी, गेटकीपर, ग्रीनरूम, पार्ट, वन्समोअर इत्यादी. यावरून मराठी रंगभूमीचा व मराठी नाटकांचा इंग्रजीशी असणारा ऋणानुबंध अमान्य करता येत नाही.

अण्णांनी ऑपेऱ्याची कल्पना इंग्रजीवरून घेतली. पण नाटकातील सामाजिक वातावरण व संगीत आपल्या महाराष्ट्रीय पद्धतीशी मिळतेजुळते ठेवले. अण्णा निव्वळ नाटकाचे नादी नव्हते. ते तीव्रबुद्धीचे कल्पक, कलाकुशल संयोजक आणि दूरदृष्टीचे व्यवहारज्ञ होते. त्यांच्या वेळचा महाराष्ट्र नादलुब्ध होता. लग्नाकार्यांत आणि सभासमारंभात नृत्यगाननिपुण कलावंतिणींचा रोजगार मोठ्या चर्कतीत चाले. तेव्हा अण्णांनी नाटकातील संगीताला प्राधान्य दिले. त्यांनी वाघोलीकर, नाटेकर व भाऊराव कोल्हटकर हे गायकरत्न एकत्र आणले. कोल्हटकरांना गोड गळ्याबरोबर सुंदर रूपही लाभले होते. ते नायिकेचे काम करीत. मुजुमदारांना रूप होते; पण गळा नव्हता. ते प्रतिनायिकेचे काम करीत. अण्णांनी एकत्रित केलेल्या नटांच्या गानविषयक आवडीनावडीचा विचार केला. आणि वाघोलीकरांकरिता लावण्यांच्या चालींची योजना केली, नाटेकरांसाठी उत्तर हिंदुस्थानी व कर्नाटकी चाली तयार केल्या आणि कोल्हटकरांसाठी परंपरागत स्त्रीगीतांच्या चाली घातल्या. त्यामुळे अण्णांच्या संगीतात तोचतोपणा आला नाही आणि ते कंटाळवाणे झाले नाही. ते वेगवेगळ्या आवडीच्या रसिकांना सारखेच प्रिय झाले. कलावंतिणींचे नाचगाणे फक्त पैसेवाल्या रसिकांनाच पहाण्यास व ऐकण्यास मिळे. अण्णांचे संगीत आबालवृद्धांना व स्त्रीशूद्रांना पूर्णपणे खुले होते. अण्णांचा कृष्ण चार हातांचा देव नाही. तो दोन हातांचा माणूस आहे. त्यांच्या रामराज्यवियोगातील नटी 'कठिण बाई व्यर्थ आम्ही अचला' असे स्त्रीजातीचे गाऱ्हाणे गात आहे आणि शंबुक बहुजनसमाजाचे प्रतिनिधित्व करीत आहे. या सामाजिक वातावरणामुळे अण्णांची नाटके लोकप्रिय झाली. अण्णांनी त्यांचे पौराणिक स्वरूप पार पालटून टाकले. अण्णांच्या नाटकांत नाट्याला भरपूर वाव आहे. त्यांचे संवाद साधे, सोपे व सुटसुटीत असले तरी अर्थगर्भ आहेत. प्रसंग वेचक व वेधक आहेत. पात्रांच्या स्वभावरेखा सूक्ष्म व सूचक आहेत आणि नाटकाच्या आरंभापासून तो अंतापर्यंत यथोचित रसाविर्भाव आहे. अण्णांच्या अलौकिक प्रतिभेने महाराष्ट्रीय समाजाच्या व साहित्याच्या क्षेत्रात जे अभूतपूर्व कार्य केले त्याचे तात्याचा पुणेकराने 'नवीन रीत काढली संगीताची। राळ उडाली कलावंतिणींची' असे वस्तुस्थितिनिदर्शक वर्णन केले आहे. अण्णांनी निर्माण केलेल्या नवीन रंगभूमीने जी उलथापालथ घडून आली तिचे अत्यंत प्रभावी वर्णन मोगऱ्यांनी केले आहे :—

**न बसे था प डफावर, नीरस होऊनि**
**लावण्या बसल्या ;**
**हरिले संगीताने भान, तिथे नाच बैठकी कसल्या!**
**घुंगुर तोडुनि टाकुनि, खुंटीला लावुनी विणा, टाळ**
**गणपति सरस्वतीसह बसले निश्चित बाळगोपाळ!**
**अललल न पडे कर्णी, मौन बकासुर हिडिंब आदरती**
**रानोमाळ पलायन शूर्पणखा, त्राटिका, बकी करिती**
**गाणी मागे पडली सगुणा, शांता, अनी, बनी, तापी**
**म्हणती, मरोनि गेल्या वृत्ति सुभद्रा शकुंतलालापी.**
**पदवीधरही झाले लुब्ध, तिथे बायका, मुले काय?**
**म्हणती सर्व अहा ही धन्य महाराष्ट्र भारती माय!**

दिनांक २ नोव्हेंबर १८८५ रोजी अण्णांना मृत्यू आला. अवघ्या पाच वर्षांच्या अल्प अवधीत त्यांनी एक नवीन अलौकिक सृष्टी निर्माण केली आणि इहलोकीची यात्रा संपविली. त्यांच्या निधनानंतर दिनांक २२ फेब्रुवारी १८८६ रोजी नारायण वामन टिळक यांनी 'संगीत आनंदराव किंवा पाशबद्ध स्वदेशाभिमानी' या आपल्या नाटिकेच्या प्रस्तावनेत 'कवितेस नवे सुंदर रूप आणणारा मोहरा, ईश्वरदत्त कवित्वाचा प्रभाव असणारा, पाचपन्नास वर्षांत झाला नाही असा लोकप्रिय नाटककार' या शब्दांत अण्णांची प्रशंसा केली आहे. इतिहासाचार्य राजवाडे कुणाचाही अकारण गौरव करणारे नव्हते. त्यांनी 'महाराष्ट्रातील बुद्धिमान, प्रतिभावान व कर्त्या लोकांची मोजदाद' या आपल्या लेखात चिरस्थायी व भरीव कामगिरी करणाऱ्या सात प्रतिभाशाली व्यक्तींत सयाजीराव गायकवाड, न्यायमूर्ती रानडे, विष्णुशास्त्री चिपळूणकर,

लोकमान्य टिळक, नामदार गोखले आणि शंकर बाळकृष्ण दीक्षित यांच्या पंक्तीत अण्णांना स्थान दिले आहे.*

अण्णांनी नाट्यकलेला रसिकांत मानाचे स्थान मिळवून दिले; सर्वसामान्य लोकांची सदभिरुची वाढवून तिला इष्ट व योग्य असे वळण लावले, पेशवाईनंतर बेकार झालेल्या हरदासपुराणिकांना, भटाभिक्षुकांना, निराश्रित गवयांना व शिपाईप्याद्यांना एक नवा व्यवसाय मिळवून दिला, 'नाटक्या' म्हणून पूर्वी ज्यांची अवहेलना होत होती त्या नटाला सामाजिक प्रतिष्ठा प्राप्त करून दिली; बजवस्त्रे, आचारी, पाणके, न्हावी, धोबी, मोलकरी, कामकरी आदी अवांतर नौकरचाकरांना कामे देऊन अन्नास लावले आणि बेळगाव, पुणे, मुंबई, नागपूर, इंदूर इत्यादी दूरदूरच्या ठिकाणी आपल्या मंडळीचे प्रयोग करून सर्वत्र संस्कृतीचा व कलेचा प्रसार केला. अण्णा स्वतः नट, गायक, नाटककार व अभिनय शिक्षक होते, ते गेले; पण त्यांच्या पश्चात त्यांच्या रंगभूमीची परंपरा अर्धशतक कायम राहिली. त्यांच्यानंतर देवल, श्रीपाद कृष्ण कोल्हटकर, खाडिलकर व गडकरी हे एकापेक्षा एक वरचढ असे नाटककार उत्पन्न झाले, त्यांच्या सौभद्रानंतर शारदा, मूकनायक, कीचकवध व एकच प्याला अशी एकाहून एक सरस व सुंदर नाटके निर्माण झाली आणि जोगळेकर चोडस, बालगंधर्व आदी असामान्य नटांनी रंगभूमी गाजवली. अण्णा झाले नसते जर आज जशी हिंदी साहित्याला रंगभूमी नाही तशी ती मराठी साहित्यालाही लाभली नसती, मराठी नाटकांचा उत्कर्ष झाला नसता आणि मराठी नटांची परंपरा खंडित झाली असती.

---

* लोकशिक्षण. भाद्रपद. शके १८३५.

कै. गोविंदराव टेंबे व्याख्यानमालेत प्रा. भ. श्री. पंडित यांनीं कोल्हापूर येथे ता. २४-६-६३ पासून जीं तीन व्याख्याने दिलीं त्यांतील एका व्याख्यानातून वरील मजकूर उद्धृत करण्यात आला आहे.



अनुक्रमणिका

डॉ. वसन्त विठ्ठल पारखे

# विष्णुदासनामा : मराठी साहित्यातील यक्षप्रश्न

मराठी साहित्येतिहासाच्या क्षेत्रात विष्णुदासनामा ही व्यक्ती फार वादग्रस्त झालेली असून अजूनपर्यंत त्या वादाची यशस्वी उकल झालेली दिसून येत नाही ! विष्णुदासनामाकृत प्राकृत महाभारताच्या अनेक हस्तलिखित प्रती आता उपलब्ध झाल्या असून त्यांचा अभ्यास-सुद्धा एका संशोधनपर प्रबन्धात झालेला आहे.[१] परंतु तरीही ही समस्या पूर्णपणे सुटलेली नाही. या लेखात या समस्येवर काही विचार, पूर्वी झालेले संशोधन जमेस धरून, व्यक्त केले जात आहेत.

विष्णुदासनामा या कवीविषयी विचार करीत असताना त्याजविषयी आपल्या मनात ज्या प्रमुख शंका – विचारांचे जाळे–पसरू लागतात त्या म्हणजे,

( १ ) संत नामदेव आणि विष्णुदासनामा – महाभारतकार ह्या दोन व्यक्ती एकच असाव्यात काय ?

( २ ) विष्णुदासनामा स्वतंत्र कवी म्हणून अस्तित्वात असावा काय ?

( ३ ) विष्णुदासनाम्याच्या नावावर असलेल्या अनेक हस्तलिखित पोथ्या सापडतात. त्या सर्वांचा कवी एकच व्यक्ती असावी काय ?

संत नामदेव हे विठ्ठलाचे परमभक्त होते. आपल्या अभंगांत त्यांनी आपले आराध्य दैवत जे ‘ विठ्ठल ’, त्याची मोठ्या उत्कटतेने आणि भक्तिभावाने आळवणी केलेली आहे. या अभंगांत त्यांनी अनेक ठिकाणी स्वतःस, ‘ विष्णुदासनामा ’, ‘ नामदेव ’, ‘ नामा ’, ‘ नामया ’, असे म्हणवून घेतले आहे.[२]

परंतु दुर्दैवाचा भाग असा आहे की संत नामदेवांच्या अभंगांची जरी विपुल रचना आपणांस आज प्राप्त झालेली असली तरी त्या रचनेत, ‘ विष्णुदासनामा ’ या अन्य कवीच्या अभंगांची सुद्धा सरमिसळ झालेली दिसत असल्याने संत नामदेवांचे अस्सल अभंग कोणते, हे ठरविणे अत्यंत दुष्कर कार्य झालेले आहे !

‘ विष्णुदासनामा ’ या कवीच्या नावावर मोडणाऱ्या प्राकृत महाभारताच्या ज्या अनेक हस्तलिखित प्रती आज आपणांस प्राप्त झाल्या आहेत, त्यांत ग्रंथकर्त्या विष्णुदास नाम्याची नामोल्लेखाव्यतिरिक्त कोणतीही अन्य माहिती मिळू शकत नाही ; इतकेच नव्हे तर ग्रंथकर्त्या विष्णुदास नाम्याने महाभारताशिवाय अन्य ग्रंथ रचिला असल्याचा निर्देश सुद्धा या वेगवेगळ्या हस्तलिखित प्रतींत झालेला आढळत नाही ! तसा निर्देश सापडला असता तर त्या ग्रंथाच्या द्वारे विष्णुदासनाम्याच्या विषयी आणखी माहिती मिळविता येणे शक्य झाले असते !

---

( १ ) विष्णुदासनाम्याच्या महाभारताचा विवेचनात्मक अभ्यास सौ. सरोजिनी शेंडे. ( Ph. D. प्रबन्ध ) ( Unpublished manuscript in the University Library, Bombay. No 2591 A. )

( २ ) पहा :—‘ विष्णुदासनामा म्हणे स्वामी माझा ’; नामदेवाचा गाथा – जोग प्रत ( चित्रशाळा ). पान ५; २ – ६
‘ त्याला बाहे वेडा नामदेव ’; तत्रैव; पान ५,१६–३
‘ नामा म्हणे ऐसे करिता स्तवन ’; तत्रैव; पान ६; २२– १०
‘ नामया सुकृत झालें असे फार; ’ पान तत्रैव; ४३. १७५–८

हा मराठी महाभारतकार विष्णुदासनामा आपणांस, 'नामदेव,' 'नामा विष्णुदास', 'विष्णुदास नामया' असे संत नामदेवाप्रमाणेच म्हणवून घेत असल्याचे दृष्टोत्पत्तीस येते[१]. साहजिकच या नामसादृश्यामुळे संत नामदेव आणि मराठी महाभारतकार विष्णुदासनामा ह्या दोन व्यक्ती एकच असाव्यात, असे लोकांचे मत बनू लागले. परंतु ते मूळ धरू लागण्यापूर्वीच त्या मताचा अनेकांनी समाचार घेऊन त्या मताचे खंडन केले आहे.

विष्णुदासनाम्याने लिहिलेल्या बुधनावणीत, विष्णुदास नाम्याने नामदेवाचा उल्लेख केलेला आढळतो.[२] त्या उल्लेखानुसार विष्णुदासनामा आणि ज्ञानेश्वरकालीन नामदेव हे दोघे भिन्न असून मात्र दोघेही शिंपी होते, असे कै. वि. का. राजवाडे यांचे मत आहे.[३] परंतु श्री. गो. का. चांदोरकर मात्र, कामाबाईच्या आरतीतील उल्लेखानुसार[४] त्यास 'विप्र' असल्याचे मानतात.[५] कमळाकर संताच्या आख्यानात विष्णुदासनामा, नामदेवाचा स्पष्ट उल्लेख करतो.[६] त्यामुळे विष्णुदासनामा, नामदेवाहून भिन्न असल्याचा निर्वाळा डॉ. सौ. शेंडे देतात.[७]

आपणांस विष्णुदास नाम्याने रचिलेले शुकाख्यान उपलब्ध झाले आहे. त्यात विष्णुदास नामा लेखनकाल देत म्हणतो—

'मन्मथ संवत्सर पौष मासी।
सोमवार अमावस्येच्या दिवशी।
पूर्णता आली ग्रंथासी।
श्रोते सावकाशी परिसिजे॥

पिले जंत्रीनुसार हा लेखनपूर्ती दिनांक २२ जानेवारी १५९६ असा ठरतो. या उल्लेखानुसार विष्णुदास नाम्यात आणि संत नामदेवात सुमारे ४०० वर्षांचे अंतर पडत असल्याचे स्पष्ट होते.

विष्णुदास नामा, कपोताख्यानात आपल्या गुरूचे नाव 'रामभारथी असे देतो[८], तर शल्यपर्वात तो आपल्या गुरूचे नाव 'गोपिनाथ' असे देतो[९]; आणि अन्यत्र ते 'चिंतामणी' असेही असल्याचे दिसते[१०]! संत नामदेवांचे गुरू विसोबा खेचर होते, हे सर्वश्रुत आहेच. अतएव या भिन्न भिन्न गुरूंच्या निर्देशामुळेही विष्णुदास नामा संत नामदेवापेक्षा भिन्न ठरतो. विष्णुदास नाम्याच्या उपासनापंथाबद्दलसुद्धा वाद आहे. त्यास काहीजण महानुभाव मानतात[११]; परंतु संत नामदेवाविषयी मात्र ते महानुभाव असल्याचे कोणाच्या स्वप्नातसुद्धा यावयाचे नाही!

विष्णुदासनाम्याच्या कालनिर्णयाच्या दृष्टीने उपयुक्त वाटणारा एक पुरावा डॉ. सौ. शेंडे यांनी पुढे आणलेला आहे[१२]. विष्णुदास नाम्याने हरिश्चन्द्र पुराण या नावाचे काव्य रचिले आहे. या हरिश्चन्द्र पुराणाचे पोर्तुगीज भाषांतर

---

(१) तें सांग विप्र ती नामदेवा; सभापर्व प्रसंग ६, ओ. ५६९; भा. इ. सं. मं. पुणे प्रत. क्र. २९–१६१० 'म्हणे नामा वीरुदासु'; तत्रैव; अध्याय १, ओ. ६. (तीच प्रत)
'ते सांग रे आता विष्णुदास नामया', ऐसीक पर्व ओ. ३५; तंजावर प्रत, क्र. १३६९

(२) नामदेवाचे पवित्र। नाम उच्चारी अखंडित।
नामे होय हरिहर भक्त। नामप्रिय गोविंदा॥ नवे नवनीत, पान १२४, ओवी २०

(३) भा. इ. सं. मं. वा. इतिवृत्त शके १८३७, पान ८

(४) सिणल्या वेदश्रुती, भंगली शेषाची रसना वो।
विप्र विष्णुदास लागे अंबेच्या चरणा वो॥
नवे नवनीत, पान १२७; ५–१

(५) भा. इ. सं. मं. वा इतिवृत्त शके १८३६, पान ६९

(६) ज्ञानदेव सोपानदेव। चांगा मुक्ताई नामदेव।
कबीर रोहिदास भक्तराव। ब्रह्मानंदे चालले॥
डॉ. सौ. शेंडे यांचा Ph. D. प्रबन्ध, पान २१

(७) डॉ. सौ. शेंडे यांचा Ph. D. प्रबन्ध, पाने २१, ३५९ पाहा.

(८) भा. इ. सं. मं. पुणे; वा. इतिवृत्त शके १८३५, पान १७८

(९) तत्रैव, शके १८३७, पान २०४

(१०) म. सा. (चतुर्थावृत्ती), पान २८८

(११) भा. इ. सं. मं. त्रै मा. वर्ष १२ अंक ४ था, पान १७०; म. सा. पान–२८८; महानुभावीय मराठी वाङ्मय (द्वितीयावृत्ती) पान–२३

(१२) डॉ. सौ. शेंडे यांचा Ph. D. प्रबन्ध, पान २८.

अनुक्रमणिका

(Prose translation) पाद्री दाँ फ्रँसिस्कु गार्सिय याने केले. फ्रँसिस्कु गार्सिय इ. स. १५९८ त जेसुईट सोसायटीत प्रविष्ट झाला. इ. स. १६०२ ते १६३३ त त्याने हिंदुस्थानात वास्तव्य केले. इ. स. १६३३ त तो दक्षिणेत गेला आणि इ. स. १६५९ साली तो क्रागानोरच्या आर्चबिशपच्या जागी असताना मरण पावला. याने ज्या अर्थी विष्णुदास नाम्याच्या हरिश्चन्द्र पुराणाचे भाषांतर केले त्या अर्थी त्या काळी महाराष्ट्रामध्ये विष्णुदास नाम्याचे हरिश्चंद्र पुराण लोकप्रिय असले पाहिजे. एखादा ग्रंथ लोकप्रिय होण्यासाठी निदान ५० वर्षे तरी लागतात. म्हणून विष्णुदास नाम्याने महाभारत व इतर काव्ये इ. स. १५८० ते १६३३ च्या सुमारास रचिली असावीत, असे आग्रही मत डॉ. सौ. शेंडे यांनी मांडले आहे.

सारांश, विष्णुदास नामा बुधबावणीत व कमळाकर संताच्या आख्यानात नामदेवांचा स्पष्ट उल्लेख करतो तसेच तो स्वतःस विप्र म्हणवून घेतो म्हणून तो संत नामदेवांपेक्षा भिन्न ठरतो; त्याचप्रमाणे शुकाख्यानातील कालनिर्देशानुसार विष्णुदास नाम्यात आणि संत नामदेवात सुमारे ४०० वर्षांचे अंतर पडते; पाद्री दाँ फ्रान्सिस्कु गार्सीयच्या भाषान्तरानुसार विष्णुदास नाम्याच्या महाभारतरचनेचा काल सुमारे इ. स. १५८० ते १६३३ असा डॉ. सौ. शेंडे ठरवीत असल्याने त्याला संत नामदेवानंतरचा कवी मानावे लागते.

हे जे सर्व पुरावे पुढे आणले गेले आहेत त्यांपैकी काही शंकास्पद वाटतात. बुधबावणीच्या एका प्रतीत विष्णुदास नामा नामदेवांचा उल्लेख करतो; तर त्याच्याच दुसऱ्या प्रतीत तो तसा उल्लेख का करीत नाही? तसेच विष्णुदास नाम्याची बुधबावणी आणि महालिंग दासाची बुधबावणी यांत फार साम्य आढळते! असे का असावे? फ्रान्सिस्कु गार्सिय याने विष्णुदास नाम्याच्या हरिश्चंद्रपुराणाचे भाषांतर केले आहे. परंतु या हरिश्चन्द्राख्यानाचा कर्ता विष्णुदास नामा असावा काय, याविषयी संशय वाटतो! कारण विष्णुदास नामा आणि मुक्तेश्वर यांच्या हरिश्चन्द्र पुराणात सुरुवातीपासून अखेरपर्यंत, अगदी बारीकसारीक तपशीलातही विलक्षण साम्यता दिसते, असे स्वतः डॉ सौ. शेंडेच सांगतात![1] मुक्तेश्वरपूर्व कवींनी, नामदेव, जनाबाई, कृष्णयाज्ञवल्की, विष्णुदासनामा, यांनी हरिश्चन्द्राख्यानावर रचना केल्याची माहिती कै. डॉ. नांदापूरकर यांनी दिलेली आहे[2]. महाराष्ट्र साहित्य पत्रिकेत विष्णुदासनाम्याच्या तीन पर्वांचा जो तौलनिक अभ्यास प्रसिद्ध झालेला आहे त्यांत, विष्णुदास नाम्याने कृष्णयाज्ञवल्कीच्या कथाकल्पतरूमधून बराचसा भाग उचलला असल्याचे सप्रमाण सिद्ध केले आहे. कदाचित तेथूनच ते आख्यान स्वतंत्रपणे विष्णुदास नाम्याच्या नावावर घातले गेले असण्याची शक्यता आहे. 'मुक्तेश्वरी भारत' म्हणून सापडणाऱ्या पोथ्यांत गोपाळ, जिवाशिवा या कवींची पर्वे आढळतातच ना? किंवा जिवा शिवा वा गोपाळ कवींच्या समग्र भारतात मुक्तेश्वरी पर्वे समग्र उतरवून घेतलेली दिसतात ना?

विष्णुदास नाम्याची बुधबावणी आणि हरिश्चंद्राख्यानाचे पोर्तुगीज भाषांतर हे पुढे आलेले दोन पुरावे जरी शंकास्पद वाटत असले तरी इतर पराव्यानुसार संत नामदेव आणि विष्णुदास नामा निर्विवादपणे भिन्न व्यक्ती ठरतात, हे मान्य केले पाहिजे.

परंतु शुकाख्यानकर्ता विष्णुदास नामा अथवा हरिचंद्रपुराण रचणारा विष्णुदास नामा अथवा कामाबाईची आरती करणारा विष्णुदास नामा किंवा कमलाकर संताचे आख्यान सांगणारा विष्णुदास नामा आणि बुधबावणीकार विष्णुदास नामा ह्या सर्व व्यक्ती एकच असून त्याच विष्णुदास नाम्याने मराठी महाभारत रचिले असावे, असे का मानले जाते ते मात्र अनाकलनीय आहे!

या निरनिराळ्या आख्यानांचा कर्ता 'विष्णुदास नामा' हाच महाभारताचाही कवी असावा असे दर्शविणारा अंतर्गत पुरावा यापैकी कुठल्याही रचनेत मिळत नाही, अथवा विष्णुदास नाम्याच्या महाभारतात इतर कोणत्याही रचनेचा उल्लेख झालेला दिसत नाही; त्याचप्रमाणे कोणताही अन्य कवी विष्णुदास नाम्याच्या महाभारतासह त्याच्या इतर आख्यानांचा निर्देश करीत नाही! उलटपक्षी रामभारथीचा शिष्य विष्णुदासनामा, किंवा चिंतामणीशिष्य विष्णुदासनामा, अथवा गोपिनाथाचा शिष्य विष्णुदासनामा, अथवा भागवतकार महानुभावीय कवी 'विष्णुदासनामा' इतक्या विविध व्यक्ती 'विष्णुदास नामा,' हे नामाभिधान

(१) डॉ. सौ. शेंडे यांचा (Ph. D.) प्रबन्ध. पान २७४

(२) मुक्त-मयूरांची भारते; पान ७२५

धारण करणाऱ्या आढळतात. या कवींच्या गुरूचे नाव, उदा. रामभारथी, चिंतामणी, गोपिनाथ इत्यादी परमेश्वराला उद्देशून केलेला उल्लेख, असे मानले जाऊन, ह्या सर्व व्यक्ती अभिन्न आहेत, असे मत प्रतिपादिले जाते. पण ते योग्य दिसत नाही.

कपोताख्यानात विष्णुदास स्पष्ट म्हणतो[1]—

मग म्यां वंदिला श्रीगुरु ।। रामभारती दिगंबरु ।।

या निर्देशावरून 'रामभारथी' हे गुरूचेच नाव ठरते. कारण जर हे सर्व 'विष्णुदास नामा' एकच मानले तर त्या विष्णुदासाने परमेश्वराला स्वतंत्र रीत्या नमन केलेले आढळते. युधचावणीमध्ये तो श्रीगणेशास आणि श्रीसरस्वतीस नमन करीत असताना दृष्टीस पडतो. परंतु रामभारथी हे नाव त्याच्या मानवी गुरूचे आहे किंवा परमेश्वराला उद्देशून असलेला उल्लेख आहे, या वादात जरी शिरले नाही तरी चालेल ! कारण हे कपोताख्यान विष्णुदास नामाकृत नसून खरे ते विष्णुदास नरसिंहाचे आहे. मग कपोताख्यानकर्ता विष्णुदास नरसिंह म्हणजेच विष्णुदास नामा मानावयाचा काय ?

श्री. गो. का. चांदोरकर यांना विष्णुदासनामा आणि कृष्णदासनामा या दोन व्यक्ती एकत्र असाव्यात, असा संशय आला होता.[2] परंतु या तर्कास पुष्टी देणारी माहिती कोणत्याही उपलब्ध हस्तलिखितांत आढळत नसल्याने श्री. चांदोरकर यांची समजूत चुकीची आहे, असा निर्णय डॉ. सौ. शेंडे देतात.[3]

श्री. चांदोरकर यांनी केवळ संशयच व्यक्त केला होता. परंतु त्यांना आलेला संशय जवळजवळ खरा ठरणारा पुरावा आज उपलब्ध झालेला आहे. कृष्णदासनाम्याच्या भारताचे एक हस्तलिखित औंधच्या ग्रंथालयात आढळते.[4] त्यात कृष्णदासनामा म्हणतो—

श्री दत्तात्र देवाये न्मो : आतां तुज न्मों मनें भावें :
तुंम्ही माझीयां चोला चीत द्यावें :
मी वीनवीतो स्वभावेः आदीनाथा । ।। १ ।।
जी तुं ज्ञान अमृतांचा सागरूः सकळसास्त्रांसी आधारुः
तुं संताचा आदी गुरु : नीजरुप पंथा : ।। २ ।।
आतां न्मु सारजावीत्पंनी : प्रश्नं जालीसी यौगीनी :
बोलती जाली अमृतवानी : कथां सागैन
मनेभावें ।। ३ ।।
आता थालीपर्व जालीयावरी : धर्म म्हनें गा श्रीहरी :
येथौनी पंडुचें पुत्र आगोचरी : वैराटा जाती ।। ४ ।।
हे कथा परीसी गा उत्तमं : तुम्ही आईकां अनुक्रमं :
सांचे कृष्णदास नामा : पुढें कैसे वर्तले ।। ५ ।।

परंतु याच पानाच्या मागच्या बाजूस असलेल्या ओव्या पहाव्यात. कवी म्हणतो—

ब्रह्महत्यैची पातके : नासती श्लोकें येकें :
वीस्णुदास वदे मुखें : अठराही पर्वें : ।। २१ ।।
ऐसी कथा भारथी : ऐकील्यां दोस जाती :
सकळ क्षेमा करावी संती : म्हने वीस्णुदास
नांमयाः ।। २२ ।।

आता विष्णुदासनाम्याचे शांतिपर्व भारत इतिहास संशोधक मंडळाच्या बाडात उपलब्ध आहे.[5] त्या प्रतीची भाषा, लिहिण्याची धाटणीसुद्धा औंधच्या या प्रतीसारखीच आहे. कवी म्हणतो : —

स्री गणेसाये न्मोः ।। स्री सरस्वती न्मोः ।।
स्री गुरुभ्यो न्मोः ।।
ऐका कथा पुन्ये पावनः । भारथीचा ईतीहास जानः ।
सांती पर्वीची येथुनः । कथा असे चालीलीः ।। १ ।।
मग आपुलाल्या आसनीः । दोघे बैसले येउनी : ।।
तंव जन्मीका आडुनीः । राये रुसी न्मसकारीला ।।२।।
मग राये रुसी वीनवीले : । काली अस्त्री पर्व संपले : ।
तेन्हा मज सांगीतले : । जे उदथीक सांगो सांती
पर्व : ।।३।।
जी सांती पर्व ते काये: । तेथे कैसी कथा आहेः ।
ते ऐकावया पाहे : । तातां मन माझे वदीत : ।।४।।
ऐसे ऐकोनीया वचनः । हर्सला वैसपायेन : ।।

(१) सरस्वतीमहाल लायब्ररी, तंजावर, हस्तलिखित क्रमांक ८७३
(२) संत-कवी-काव्यसूची पान २१
(३) डॉ. सौ. शेंडे यांचा प्रबन्ध : पान १७
(४) भवानी म्यूझियम व ग्रंथालय हस्तलिखित क्रमांक 29-30/35/3
(५) भा. इ. सं. मं. पुणे. हस्तलिखित क्रमांक २२।२४३

तरी तु आयीक गा कथनः । जन्मोजया ॥५॥

तेव्हा कृष्णदास नामा आणि विष्णुदास नामा यांच्यावरील दोन उताऱ्यांतील समान भाषा व उल्लेख पाहता कृष्णदास नामा आणि विष्णुदास नामा या दोन व्यक्ती अभिन्न अथवा एकच असाव्यात असे वाटू लागते.

एक विष्णुदासनामा, महाभारतकार, महानुभावीय पंथाचा असून त्याला नागदेवाचार्यांनी उपदेश दिला होता.[1] आपणांस कृष्णदास नामा या महानुभावीय कवीने केलेल्या आरत्या आढळतात[2]; तसेच त्याचे कर्णपर्वही उपलब्ध आहे. या कर्णपर्वाची भाषासुद्धा विष्णुदासनाम्याच्या शांतिपर्वाशी जुळणारीच आहे! कृष्णदासनामा कर्णपर्वात म्हणतो[3]—

श्री परेंसाये न्मोः श्री कृष्णांये न्मोः श्री दत्तात्रेये न्मोः॥ ब्रह्मांडगोळकाचाइ तु हंसु : नीर्गुण परमात्मां परेंमु : गनेंसा सारजेंच्या सौरसु : तेथौनीं जाला : ॥ १ ॥ तो अष्टगनांचा गणेपतीः सपुर्ने सारजा मुलक्षनं अती : कृपाहंस वाहानी नीगुतीः कौंवल्यें कटाक्षी वसें : ॥ २ ॥ सतसब्दे परब्रह्म थोर : चीतसब्दें माया नीर्वीकार : आन्नदसब्दें परमात्मां साचार : संचीदान्नद स्वरूप तों ॥३॥ ऐसा स्वरूपक्षेती : अवतरलां कैवल्यें मुर्त्तीः तया वीघ्न हराप्रती : प्रथमं न्मस्कारु केला : ॥ ४ ॥

न्मस्कार श्रीकृष्णाचरनांप्रतीः दतदीगंबराईती : बावनपुरुषावरद मुर्त्ती : नमीन श्री चारुदेवा : ॥ ९ ॥ जो रीद्धीसीद्धी संपुर्न : डंभखेळे जगजीवन : तया प्रभुचें चर्न : आरंभी वंदीयेलें : ॥१०॥ परमार्थी बोध बरवा : चक्रद्धरू होयें सुव्हावांः पुढें मोक्ष मार्ग जानावाः नागार्जुनं मतें : ॥ ११ ॥ मग तें ब्रह्मवीद कवीतें : श्रुतसुबोध कवीतें: वंदोनीया श्रीगुरुतें: ग्रंथ आरंभीला : ॥ १२ ॥

नागदेवचरित्रात विष्णुदासाविषयी होत असलेला उल्लेख, आणि कृष्णदास नामा, चक्रधर आणि नागार्जुनांचा करीत असलेला उल्लेख पाहिला म्हणजे कृष्णदास नामा आणि विष्णुदास नामा ही एकच 'व्यक्ति' असावी असे वाटू लागते. आणि दोघांचीही समान भाषा पाहिली की हा तर्क दृढ होऊ लागतो. महानुभावपंथात शिरल्यावर कदाचित "श्रीकृष्णाचा दास" म्हणून त्याने आपणांस विष्णुदासनाम्याच्या ऐवजी कृष्णदास नामा असेही म्हणवून घेतले असावे !

या तर्कास पुष्टी देणारा आणखी एक भाग असा आढळतो की विष्णुदास नाम्याच्या भारताची काही हस्तलिखिते महानुभावीयांच्या लेखनपद्धतीप्रमाणेच, ओवीच्या अंती दण्डाऐवजी विसर्ग चिन्हे देऊन लिहिलेली आढळतात; इतकेच नव्हे तर काही प्रती महानुभावीयांच्या गुप्त लिपीतसुद्धा लिहिलेल्या आहेत, असे मी ऐकले आहे! महानुभावीय महंत नंदळीपाठी या विष्णुदास नाम्याचे महानुभाव लिपीत लिहिलेले बरेच ग्रंथ आहेत, असे श्री. य. खु. देशपांडे सांगतातच.[4] महानुभावीय पंथियांनी केवळ आपल्या कवींचेच लिखाण गुप्त लिपीत लिहून ठेवलेले आहे. इतर प्रसिद्ध कवींच्या पोथ्या त्यांनी अशा प्रकारे नकलून ठेवल्याचे ऐकिवात नाही !

तेव्हा आज आपणांस विष्णुदास नाम्याच्या नावावर गणल्या जाणाऱ्या भारताच्या ज्या पोथ्या आढळतात, त्यांत महानुभाव विष्णुदासनामा ऊर्फ कृष्णदासनामा याच्याही पोथ्या मिश्रित झाल्याचे दिसते !

विष्णुदासनाम्याच्या महाभारताच्या उपलब्ध हस्तलिखितांचा अभ्यास केल्यावर निष्कर्ष काढताना डॉ. सौ. शेंडे म्हणतात[5], "विष्णुदासनाम्याने महाभारतातील आदी पर्वाच्या सुरुवातीलाच एक हृदयंगम कथासूत्र रचून त्याचा धागा **सर्व पर्वांतून फिरत ठेवला आहे (जाड टाइप माझा)** हे कथासूत्र म्हणजे महाभारतकथनाचा एक महत्त्वपूर्ण हेतूच होय. मूळ महाभारत यज्ञप्रसंगी कालक्षेप करण्यासाठी रचिले गेले. परंतु विष्णुदासनामा त्याची निराळीच पण वैशिष्ट्यपूर्ण उपपत्ती लावतो. ते

(१) "विष्णुदासनामाच्या : सेवटीं पण्डित मुखें वेधु संक्रमणु "– महानुभावीय मराठी वाङ्मय, (द्वितीयावृत्ती) पान–२३

(२) महानुभाव महाराष्ट्र ग्रंथावली कविकाव्यसूची. संपा. वि. ल. भावे (ठाणे शके १८४६) पान ६

(३) भवानी म्यूझियम आणि ग्रंथालय हस्तलिखित क्रमांक 29–30/35/3

(४) महानुभावीय मराठी वाङ्मय (द्वितीयावृत्ती) पान : २३

(५) डॉ. सौ. शेंडे यांचा प्रबन्ध पान : ३३

ब्रह्महत्येच्या पापाचे परिमार्जन करण्यासाठी निवेदिले गेले, असे तो प्रतिपादन करितो... त्याच्या महाभारतात इतर कोणत्याही महाभारताच्या अनुवादात न आलेला हा उल्लेख पुन्हा पुन्हा येतो. प्रत्येक पर्वाच्या शेवटी एक मृत ब्राह्मण जिवंत होतो, व एक हात वस्त्र पांढरेशुभ्र होते, असा निर्देश सापडतो. **हे उल्लेख निरनिराळ्या भागांतील हस्तलिखित प्रतींतही आढळतात. (जाड टाइप माझा)** त्यावरून ते ह्या महाभारताचा एक महत्त्वपूर्ण वेगळेपणाच प्रस्थापित करतात, असे म्हणावयास हरकत नाही. ''

विष्णुदासनाम्याच्या महाभारतातील या कथासूत्राची वाचकांना कल्पना यावी म्हणून वेगवेगळ्या पर्वातील आदी व अंतीच्या काही ओव्या पुढे मुद्दाम उद्धृत केल्या जात आहेत.[१]

**उद्योगपर्व :**

प्रारंभ :– वैशंपायन म्हणे गा भारथा।
राया परीक्षिती सुता।
परीस तु पूर्वजाची कथा।
तरी तेणें ब्रह्महत्या महादोष नाशती॥
तव म्हणे परीक्षीती सुत।
जी हे वचन येथार्थ॥
जे पर्वी ब्राह्मण उठे मृत्य।
कापड एक हात शुद्ध होय॥

अंत :– मग म्हणे वैशंपायन।
राया उद्योग पर्व जाले येथून।
तरी उद्रेक तुज लागून।
सांगो भीष्म पर्व॥
ऐसे रुषी बोलिला।
तव रवी अस्तमाना गेला॥
रावें पाहे तंव मृत्य ब्राह्मण उठिला।
कापड शुद्ध जाले एक हात॥

**भीष्मपर्व :–**

अंत :– ऐसा बोलिला वैशंपायन।
तव सविता झाला अस्तमान॥
प्रेतींतील उठिला ब्राह्मण।
कापड जाले शुद्ध हात॥

**द्रोणपर्व :–**

अंत :– असे रुषी बोलिला वचन।
तव रवी झाला अस्तमान।
मृत्य जा... उठले ब्राह्मण।
कापड जाले शुद्ध हात॥

**कर्णपर्व :–**

प्रारंभ :– जी प्रत्यही प्रचीत।
मग असे जी होत।
मृत ब्राह्मण उठत।
कापड हात शुद्ध होय॥ ४॥

विष्णुदासनामाविरचित महाभारताच्या या हस्तलिखित पोथ्यांचा कवी, भाषेच्या, कथानकाच्या धाग्याच्या दृष्टीने एकच आहे हे स्पष्ट दिसते.

उद्योग, भीष्म, द्रोण व कर्ण या पर्वांतून मृत ब्राह्मण जिवंत होण्याचे कथानक सर्वत्र गुंफले गेले असल्याने व सर्वांची भाषाही एकच असल्याने निर्विवादपणे ही पर्वे एकाच कवीची ठरतात. परंतु याच उताऱ्यांची तुलना, महानुभावीय कवी विष्णुदासनाम्याच्या, पूर्वी उध्दृत केलेल्या शांतिपर्वातील ओव्यांशी केली असता भाषिक दृष्ट्या महदंतर पडत असल्याचे प्रकर्षाने जाणवते! एकच कवि जर या सर्व भारती पोथ्यांच्या असेल तर इतके अंतर का पडावे?

या कथासूत्राविषयी आणखी एक गोष्ट खटकते. डॉ. सौ. शेंडे म्हणतात त्याप्रमाणे हे उल्लेख किंवा हे सूत्र ( Theme ) एकाच पर्वाच्या वेगवेगळ्या हस्तलिखित प्रतीत सुद्धा सापडावयास हवे. परंतु आश्चर्य असे की तसे ते आढळत नाही! विष्णुदास नाम्याचे ऐषीक पर्व म. सा. पत्रिकेत मी प्रसिद्ध केलेले आहे.[२] त्यात या सूत्राचा निर्देशही आढळत नाही. विष्णुदासनाम्याच्या मुंबई व तंजावर येथील ऐषीक, स्त्री, स्वर्गारोहण, या पर्वांचा तौलनिक अभ्यासमुद्धा म. सा. पत्रिकेत प्रसिद्ध झालेला आहे.[३] त्यातही या कथासूत्राची

---

(१) भा. इ. सं. मं. पुणे–अहवाल शके १८३२; संग्राहक: का. ना. साने. पाने ३४–३६
(२) म. सा. प. वर्ष ३४, अंक १३९; जानेवारी १९६२; पाने ३९—४१
(३) म. सा. प. जानेवारी ६२; ऑक्टोबर १९६२; जानेवारी १९६३

अनुपस्थिती असल्याचे वाचकांना दिसून येईल. याच लेखात ग्रीष्मपर्वाच्या एका प्रतीतील अंतीच्या ओव्या उद्धृत केलेल्या आहेत. पुण्याच्या भारत इतिहास संशोधक मंडळात याच्या भारताचे एक भीष्म पर्व आहे.[1] त्यातही या कथासूत्राचा कोठेही निर्देश झालेला नाही !

स्वर्गारोहणपर्व हे महाभारताचे १८ वे पर्व. तेव्हा या पर्वाच्या अंती भीष्म द्रोणादी पर्वांप्रमाणे, एक हात कापड शुद्ध होत, अठरा हात कापड शुद्ध होऊन अठरा ब्राह्मण जिवंत झाले व जन्मेजयाच्या अठरा ब्रह्महत्यांचे पातक नष्ट झाल्याचा कथाभाग यावयास हवा. परंतु तो तसा न येता केवळ, व्यासाने भारती कथा सांगितल्याने जन्मेजयाच्या अठरा ब्रह्महत्या गेल्या असेच, तंजावरच्या स्वर्गारोहण प्रतीत आढळते.[2] परंतु भारत इतिहास संशोधक मंडळाच्या पुणे येथील, विष्णुदासनाम्याच्या स्वर्गारोहण पर्वाच्या एका हस्तलिखितात[3] मात्र या कथासूत्राचा उल्लेख आढळतो. तो असा :—

ऐसी कथा पाहे : सतरा दिवस चालीलि आहे :
तितुके कापड शुद्ध होये : सतरा ब्राह्मण उठीले ॥
प्रसंग १ ला ओ. १४

म्हणून, ज्या अर्थी मुंबई किंवा तंजावर प्रतीत, एक हात कापड शुद्ध होत एक ब्राह्मण जिवंत होत असल्याचे मुख्य सूत्र अनुपस्थित दिसते, त्या अर्थी या दोघांचा विष्णुदासनामा, ज्या विष्णुदासनाम्याच्या उद्योग, भीष्मादीपर्वांच्या ओव्या पूर्वी उद्धृत केल्या आहेत, त्या विष्णुदास नाम्यापेक्षा भिन्न ठरतो; असे दिसते.

तसेच तंजावरच्या स्त्री पर्वाच्या प्रतीत, भानुमती स्वर्गात जाऊन शिवाशी युद्ध करून दुर्योधनास सोडवून आणीत असल्याचे, जे सूत्र सर्वत्र गुंफिले गेले आहे, तेच सूत्र मुंबईकडील प्रतीत न आढळता, तंजावर स्त्रीपर्वाच्या प्रतीत न आढळणारा श्रीकृष्ण-लीला वर्णनपर कथाभाग मात्र तेथे वैपुल्याने वर्णिलेला आढळतो! अतएव मुंबईकडील हस्तलिखितांचा कवी तंजावरच्या हस्तलिखितांच्या कवीपेक्षा भिन्न का मानला जाऊ नये.

तेव्हा विष्णुदासनाम्याच्या नावावर मोडल्या जाणाऱ्या प्राकृत महाभारताच्या हस्तलिखित प्रतीचा अभ्यास केला असता, भाषाभिन्नतेमुळे, कथासूत्रभिन्नतेमुळे, तसेच सर्व हस्तलिखितात एकवाक्यता न दिसत असल्याने या सर्व हस्तलिखितांचे कवी वेगवेगळे विष्णुदासनामा ठरतात असे वाटते. त्यांपैकी एक महानुभावीय महाभारतकार विष्णुदास नामा ऊर्फ कृष्णदास नामा असावा, दुसरा "विष्णुदास नामा" अठरा हात कापड शुद्ध होऊन अठरा ब्राह्मण जिवंत होत असल्याच्या कथासूत्राचा असावा; तिसरा विष्णुदास नामा मुंबई प्रतीचा व चवथा विष्णुदास नामा तंजावर प्रतीचा कवी असावा असे वाटू लागते.

विष्णुदासनाम्याच्या प्राकृत महाभारताच्या निरनिराळ्या हस्तलिखितांची पाहणी करीत असताना ज्या निरनिराळ्या गोष्टी अवलोकनात आल्या त्यांच्यावरून मनात सुचलेले विचार विद्वानांच्या चिकित्सेसाठी, सत्यान्वेषणार्थ ठेवले जात आहेत. विष्णुदास नाम्याचा यक्षप्रश्न सुटण्यास या विचारांची काही मदत होईल अशी आशा आहे.

---

(१) भा. इ. सं. मं. पुणे हस्तलिखित क्रमांक १।१२

(२) तंजावर–स्वर्गारोहणप्रत :— ऐसे हे भारती कथा। व्यासें सांगीतलें परिक्षितीसुता। म्हणउनी अठरा ब्रह्महत्या। गेल्या जन्मोजयाच्या॥ ७—८६

(३) भा. इ. सं. मं. पुणे हस्तलिखित क्रमांकः २९।१६०७

य. ल. गुण्ये

# संगीत सौभद्र : कालविषयक एक विसंगती

तसे पाहिले तर सं. सौभद्र नाटकात अनेक गोड विसंगती आहेत. उदाहरणार्थ-यतिवेषधारी अर्जुनाच्या दर्शनास विदूषक गेला त्या वेळी यतिराज बसले होते तेथे जाण्यास पाऊलवाट सुद्धा नव्हती! पण लागलीच गर्गमुनी तेथे गेले तेव्हा "बारा हात रुंदीचा रस्ता तयार झालेला होता; घराप्रमाणे गुहेत सोई केल्या होत्या; दारात सुरेखसा मांडवदेखील घातलेला होता !!! इ. इ. अशा अनेक विसंगतींपैकी एकच कालविषयक विसंगती प्रस्तुत लेखाच्याद्वारे वाचकांपुढे ठेवीत आहे.

द्रौपदी ही पाच पांडवांची पत्नी. तिच्यावरून त्यांच्यांत कलह न व्हावा म्हणून नारदमुनींनी ठरवून दिले होते की दोन महिने आणि बारा दिवसपर्यंत तिने एका एका पांडवाची पत्नी म्हणून वागावे आणि "या नियमानुसार ज्याचा काळ असेल त्या पतिसमवेत द्रौपदी एकांतात असताना जर दुसऱ्या पांडवाने तिला पाहिली" तर शासन म्हणून त्या पांडवाने सतत "बारा महिने गृह वर्ज्य करून तीर्थयात्रा करीत पायी फिरावे. त्यानंतर तो शुद्ध झाला असे समजावे."

एकदा धर्मराज द्रौपदीसह एकान्तात असताना त्यांना पाहण्याचा दोष अर्जुनाच्या हातून घडला. तेव्हा त्या दोषाच्या परिहारार्थ ठरलेले शासन भोगण्यासाठी, बारा महिनेपर्यंत तीर्थयात्रा करीत फिरण्यासाठी अर्जुन राजधानी बाहेर पडला. या गोष्टीला पुरते सहा महिने देखील झाले नाहीत अशा समयी (नाही झाले षण्मास मला राज्य सोडुनी) सौभद्र नाटकाची सुरवात होते. अर्थात राजधानीला परत जाण्यापूर्वी त्याने अजून निदान सहा महिने तरी तीर्थयात्रा करीत सतत फिरत राहिले पाहिजे आहे. पण फिरणे तर दूरच राहिले, त्रिदंडी संन्यास घेऊन तो द्वारकेस सुभद्रेच्या अंतःपुरातच ठिय्या देऊन बसतो आणि संन्यास घेतल्यापासून तो सुभद्रेशी विवाह करून तिच्यासह "एकवार बळरामास भेटून राजरोस होण्या"पर्यंत, वास्तविक जो सहा महिन्यांचा (निदान चार* महिन्यांचा) अवधी लागावयाचा त्याऐवजी फार तर दहा-बारा दिवसांतच नाटक संपले आहे!

कसे ते सौभद्र नाटकाच्याच शब्दांत आपण पाहू.

पहिल्या अंकात, नारदमुनी निघून गेल्यावर, एका राक्षसाने पळवून आणलेली सुभद्रा, अर्जुनाच्या दृष्टीस पडते. राक्षसाशी अर्जुनाची झोंबाझोंबी होत असतानाच तो मायावी राक्षस अदृश्य होतो. आणि "मुहूर्त टाळण्यासाठीच तू अरण्यात आलीस" असा आपल्यावर आळ येईल या भीतीने सुभद्रा अर्जुनासमोरच मूर्छित होते. तिला सावध करण्यासाठी तो पाणी घेऊन येतो तोपर्यंत त्या राक्षसाने तिला पुन्हा उचलून तिच्या महालात ठेवली देखील!

"सुभद्रे, आता मात्र खचित तुला मी अंतरलो" अशा समजुतीने अत्यंत विरक्त झालेल्या अर्जुनाला राक्षसाने तेथे टाकलेले सुभद्रेचे पत्र मिळते. त्यात

"रिपू नेता भार्येसी। सुचली यात्रा कैसी ।।
"याहुनि होउनि संन्यासी। न्या मज सेवेसी ।।"

---

*पहा:— कृष्ण– "चार मासांची अवधि असे पाही" अंक २
कृष्ण– "एवढाच चतुर्मास संपला की..." अंक २
बळिराम– "चार मास गृहि ठेवूनि घेऊ..." अंक ३
कृष्ण– "चातुर्मास झाला म्हणजे लग्न ठरलेच आहे" अंक ३
रुक्मिणी– "स्वामींच्या चातुर्मासाची सांगता करून" अंक ४

अनुक्रमणिका

अशी सूचना केलेली होती. त्याप्रमाणे आणि नारद-मुनींच्या आदेशाला मान देऊन अर्जुनाने त्रिदंडी संन्यास घेतला.

**येथे पहिला अंक संपला.**

दुसऱ्या अंकातील बळराम आणि कृष्ण यांचे सुभद्रेच्या भेटीस येणे ही गोष्ट तिच्या अदृश्य होऊन परत महालात येण्यानंतर प्रथमचीच आणि त्या प्रसंगानंतर दोनतीन दिवसांतच घडलेली आहे. पलंगावर निजलेल्या सुभद्रेला पाहून कृष्ण बलरामास म्हणतो "या सुभद्रेच्या प्रकृतीस कसे करावे? पहा! **दोन दिवसांत** तिचे निम्मे तेज नाहीसे झाले" सुभद्रेला आपल्या सखीजनात सोडून बलराम कृष्णाला घेऊन निघून गेल्यावर सुभद्रेचे कुसुमावतीशी जे अगदी मन मोकळे-पणाने बोलणे होते. त्यातदेखील कुसुमावतीने म्हटले आहे "बाईसाहेब! या **दोन दिवसांत** तुमची प्रकृती फार बिघडली आहे. ..."

हे बोलणे चालले आहे तो बळराम यतीला वाड्यात भोजनास* घेऊन आला.

यानंतर याच अंकात रुक्मिणी आणि सुभद्रेची (सुभद्रा नाहीशी होऊन नंतर महालात निजलेली मिळाली त्यानंतर प्रथमच) भेट होते तीत रुक्मिणी म्हणते "ही पाहिलीत दोन **दिवसांत** काय दशा होऊन गेली ती..." "**एक दोन दिवस** जाऊन तुमची प्रकृती अमळ ताळ्यावर आली म्हणजे तुम्हांला भेटावे..."

याच प्रवेशाच्या शेवटी सुभद्रा रुक्मिणीला विनवते "तू मनावर घेऊन कृष्णाच्या मनात चांगले भरवून दिलेस म्हणजे पुरे...मग तो हव्या त्या रीतीने माझ्या मनासारखे करील". रुक्मिणीने तसे करण्याचे कबूल केले. नंतर दोघीजणी पाटावर बसलेल्या यतीच्या दर्शनास जातात.

**येथे दुसरा अंक संपला.**

अंक तीनचा आरंभ बळिराम आणि कृष्ण यांच्या यतीसंबंधी बोलण्याने होतो. त्यात यतीची भोजन-प्रसंगी उडालेली धांदल, त्यानंतर "चारमास गृहि ठेवुनि घेऊ या त्याला"..."सुभद्रेच्या अंतर्गृहातच ठेवू" इ. इ. यावरून हे भाषण अंक दोनमध्ये सुचवलेले यतिभोजन झाले त्यानंतर प्रथमचेच असले पाहिजे. म्हणजे अंक तीनमधील हा प्रवेश अंक दोन संपल्यावर **एकदोन दिवसांतलाच** आहे हे स्पष्ट आहे.

भावाभावांचे हे भाषण संपताच कृष्ण सरळ रुक्मिणीच्या महालात जातो. तेथे (अंक दोनमध्ये सुभद्रेला कबूल केल्याप्रमाणे) रुक्मिणी कृष्णाला "अर्जुनाचा शोध करून सुभद्रेचे मनोरथ पूर्ण करावे." अशी गळ घालते. हा प्रसंग देखील अंक दोनमधील कबुलीनंतर लागलीच घडून आलेला असला पाहिजे हे उघड आहे.

याच भेटीत कृष्णाने रुक्मिणीला "तो यति म्हणजे अर्जुनच" असे गुपित कळवले आहे.

**येथे तिसरा अंक संपतो.**

अंक तीन संपून अंक चार मधील घटनांना आरंभ होईपर्यंत फार तर **चार सहा दिवसच** जाऊ शकतील. अंक चारच्या सुरवातीलाच सुभद्रा रुक्मिणीची पुन्हा भेट होते. तेव्हा साहजिकच "तू मला वचन दिले होतेस त्याचे काय केलेस ते सांग" असे सुभद्रा रुक्मिणीला विचारते. रुक्मिणीला अर्जुनाचे गुपित कळलेले असले तरी ते इतक्यातच सुभद्रेला कळवायचे नसल्यामुळे ती सरळ उत्तराची टाळाटाळ करते.

नंतर यतिवेष धारण करणाऱ्या अर्जुनाचा प्रथम प्रवेश होतो; त्यात त्याचे आत्मगत भाषण "दिसली पुनरपि गुप्त जहाली प्रिया सुभद्रा षोरवनी..." यावरून नुकत्याच घडलेल्या गोष्टींचा तो विचार करतो आहे आणि गोंधळून जात आहे असे दिसते. ही मानसिक स्थिती ते ते प्रसंग घडल्यानंतर **४-६ दिवसांतच** असणे शक्य आहे. चार महिने लोटल्यावर असणे कदापि शक्य नाही.

यानंतर यतीच्या दर्शनासाठी आलेली रुक्मिणी आपल्याशीच म्हणते "पहिल्या दिवशी त्याला पाहिले तेव्हा केवढा साधू असेल असे वाटले...**आता त्याला केव्हा पाहीन असे झाले आहे.**" हे स्त्रीस्वभावाला

---

* सारंगनयना—"थोरल्या सरकारांनी वाड्यात एक स्वामी आज भोजनास आणले आहेत." अंक २
विदूषक—"यतिमहाराज पाटावर बसले..." अंक २

अनुक्रमणिका

घरूनच आहे. कृष्णाने तिच्याजवळ गुपिताचा स्फोट केल्यावर अर्जुनाला पाहिल्याशिवाय राहणे तिला शक्यच नाहीं. तिने **फारतर ४-६ दिवस** दम धरला असेल पण गंमत अशी की याच भेटीत (अर्जुनाचे ढोंग बाहेर काढल्यावर) रुक्मिणी त्याला उदईक समुद्रतीरी गेल्यावर कसे वागायचे ते सुचवते. तोच सेनापती सात्यकि तेथे येऊन "उदईक समुद्रतीरी" जाण्याचे ठरल्याबद्दल सांगतो आणि **अंक चौथा संपतो.**

**दुसऱ्या दिवशी प्रातःकाळी** अंक पाचवा आरंभ होतो. सुभद्रेला अर्जुनाची ओळख पटते, तो तिच्याशी विवाहबद्ध होतो, बळिरामाचा राग दूर होतो, सर्वांकडून नवविवाहितांचे अभिनंदन होते आणि

**पांचवा अंक संपतो.**

| | | | |
|---|---|---|---|
| अंक | १-२ | अवघे | २-३ दिवस |
| ,, | २-३ | ,, | १-२ ,, |
| ,, | ३-४ | ,, | ४-६ ,, |
| ,, | ४-५ | ,, | १ ,, |

सारांश "सहा महिने" "चार महिने" कोठल्याकोठे गडबडले! आणि अण्णासाहेब किर्लोस्करांनी **सौभद्र नाटक १०-१२ दिवसांतच संपवले आहे-गुंडाळले आहे!**

♧

**डॉ. हरिभाऊ तोडमल**

# हास्यात्मिका

**ज्या नाटकांचा शेवट गोड होतो त्यांना Comedy आणि ज्यांचा शेवट शोकात होतो त्यांना Tragedy असे म्हणतात. मराठीत त्यांनाच अनुक्रमे सुखान्त व शोकान्त नाटके म्हणण्याचा प्रघात आहे.**

बऱ्याच नाटकांत प्रेमाचा त्रिकोण रंगविलेला असतो. नायक, नायिका व खलनायक हे त्या त्रिकोणाचे तीन बिंदू असतात. नाटकात हा त्रिकोण सोडविलेला असतो. म्हणजेच नायक व नायिका यांच्या प्रेमाचा विकास आणि विलास दाखविलेला असतो. हे प्रेम सफल व्हावे असा नायक पक्षाचा प्रयत्न असतो व त्यात माती कालविण्याचा खलनायकाचा डाव असतो. या दोन पक्षांच्या परस्परविरुद्ध संघर्षात नायक यशस्वी झाला तर प्रेमाचा (आणि नाटकाचाही!) शेवट विवाहात होतो. जर नायकाच्या पदरी अपयश पडले तर खलनायकाच्या कारस्थानात नायक, नायिका यांपैकी एकाची किंवा दोघांचीही आहुती पडते. त्या प्रेमाचा (व नाटकाचाही) शेवट शोकात होतो.

प्रेमाच्या त्रिकोणाची ही भाषा सर्वच नाटकांविषयी वापरता येत नाही. नाटकाचा अथवा कोणत्याही कथात्मक साहित्याचा संघर्ष हा प्राण असतो. अटीतटींचा संघर्ष किंवा युद्ध म्हटले की त्यात दोन प्रबळ व समबल पक्ष एकमेकांविरुद्ध ठाकलेले असतात. तसे नसेल तर त्या संघर्षात राम राहणार नाही. [प्रत्यक्ष जीवनात किंवा सूक्ष्म जीवनदर्शी साहित्यात हा संघर्ष इतका स्थूल व एकेरी नसतो. त्यातहि समस्या 'असतेच. पण तिचे धागे अनेकरंगी असतात; व त्यांची गुंतागुत अतिविचित्र झालेली असते; शिवाय त्यांचे ताण अनेकांगी असतात.] संघर्षातील सत्पक्षाविषयी बहुतेक सर्व रसिकांना सहानुभूती असते; व त्यांचा विजय व्हावा अशी त्यांची अपेक्षा असते. सत्पक्षाचा विजय होत असताना रसिकाला आनंद होतो. पण सत्पक्षाचा पराभव पाहताना त्याला वाईट वाटते. सत्पक्षाचा फारच छळ झाला किंवा त्यांपैकी कोणाला मृत्युमुखी पडावे लागले; तर रसिकाला फार हळहळ वाटते. तो गंभीर होतो; विचारमग्न होतो; काही काल भीतीच्या भोवऱ्यात गुदमरतो.

वरील विवेचन सामान्यतः सर्वमान्य व्हावे. पण ह्यापेक्षा सूक्ष्म विचार अनेक चिकित्सकांनी मांडले आहेत व आणखी काही नवीन विचार मांडणे शक्य आहे.

पहिला महत्त्वाचा विचार ॲरिस्टॉटल या ग्रीक तत्त्ववेत्त्याने 'काव्यशास्त्र' (Poetics) नावाच्या सुप्रसिद्ध प्रबंधात मांडला. त्यात त्याने प्रामुख्याने Tragedy ची व तदनुषंगाने Epic-काव्याची चर्चा केली आहे.* या ग्रंथात तो म्हणतो, होमर, माणसे असतात त्याहून अधिक चांगली दाखवितो; क्लिओफॉन असतात तशीच ठेवतो; विडंबनाचा निर्माता असलेला थेशियातला हिगेमॉन आणि डीलिअडकर्ता निकोकारीस हे माणसे असतात त्याहून अधिक वाईट दाखवितात. ...... याच वैशिष्ट्यामुळे शोकान्तिका व सुखान्तिका यांच्यामध्ये भिन्नत्व निर्माण होते; कारण सुखान्तिकेचे लक्ष्य माणूस अधिक वाईट आहे असे दाखविण्याकडे असते, तर शोकान्तिकेचे तो प्रत्यक्ष जीवनापेक्षा अधिक चांगला दाखविण्याकडे असते." त्याच्या म्हणण्याचा आशय हा की, दररोजच्या व्यवहारी जगतातल्या आपल्या वर्तणुकीपेक्षा वरच्या पातळीवरचे मानवी जीवन हा शोकान्तिकेचा व खालच्या किंवा त्याच पातळीवरचे वागणे हा Comedy सुखान्तिकेचा विषय होय. ॲरिस्टॉटलने Tragedy प्रमाणे Comedy चे अधिक खोलात जाऊन विवेचन केलेले नाही. पण हा एकच विचार फार महत्त्वाचा आहे.

शोकान्त होणे हे Tragedy चे प्रमुख वैशिष्ट्य असले तरी शेवट गोड होणे हे Comedy चे महत्त्वाचे वैशिष्ट्य नाही. Tragedy च्या संदर्भात मराठीमध्ये Comedyला सुखान्तिका हा शब्द वापरला जातो; पण हास्यात्मिका किंवा विनोदिका हा शब्द अधिक यथार्थ होईल. पाश्चात्य साहित्यात Comedy ची गणना विनोदी वाङ्मयात करतात; व मराठीतील विनोदी नाटकांचे अंतरंग शोधल्यास ॲरिस्टॉटलचा वरील विचार पटतो. उदाहरणार्थ, श्रीपाद कृष्णांचे सहचारिणी हे नाटक, जोशीद्वयांची म्युनिसिपालिटी व खडाष्टक ही रंगणारी विनोदी नाटके किंवा आचार्य अत्रेंची साष्टांगनमस्कारादी हशा पिकविणारी नाटके पाहावीत. इतर मराठी नाटकांत विनोदासाठी उपयोजिलेली पात्रेही वरील विचाराला बळकटी देतात. गडकऱ्यांच्या प्रेमसंन्यासातील मथुरा-गोकुळ हे जोडपे, पुण्यप्रभावातील कंकण-किंकिणी मुद्रान-दामिनी ही युगुले एकच प्याल्यातील तळीराम आणि आर्यमदिरामंडळ, व भावबंधनातील इंदुबिंदूचे कृष्णकारस्थान आणि त्यात गुरफटलेला कामण्णा ह्या पात्रांच्या कृतिउक्तीला आपण हसत असतो. कारण सरासरीने सामान्य व्यवहारी माणसे जशी वागतात तशी ही पात्रे नसतात. त्यांच्यात काही शारीरिक किंवा मानसिक उणीवा तरी आढळतात; अथवा त्यांतील काहीजणांचे वर्तन व्यवहारशून्य, कृत्रिम किंवा कालानुचित तरी असते. त्यामुळे ही पात्रे, त्यांची फजिती करणाऱ्या अनेक चमत्कारिक प्रसंगात फसतात व हास्यास्पद ठरतात.

परंतु जगात जशी उदात्तचरित माणसे थोडी तशीच व्यवहारशून्य आणि कालप्रवाहाशी समरस न होणारी मूर्ख माणसेही थोडीच असतात. अशा एकारलेल्या माणसांपेक्षा गुणदोषांच्या कमीअधिक सरमिसळीचीच बहुतेकजण असतात. शिवाय प्रसंगी सामान्य माणूसही मनाचा मोठेपणा दाखवितो आणि ज्यांना आपण थोर समजतो त्यांचे वागणे कित्येकदा अगदी पोरकट असते. अशी पात्रे शेक्सपीअरच्या नाटकात रंगविलेली दिसतात. त्याने लिहिलेल्या नाटकांत करुणरस व विनोद यांचा एकमेकांशेजारी आविष्कार झालेला दिसतो. तसेच त्याने संपूर्ण नाटक गंभीर पण शेवट गोड (Tragi-Comedy) अशा धाटणीचीही नाटके लिहिली; आणि ती नाटके रसिकमान्य झाली. देवलांची शारदा व गडकऱ्यांचे पुण्यप्रभाव ही नाटके या धाटणीचीच आहेत. तेव्हा सर्व सुखान्त नाटके हास्यप्रधान असतातच असे नाही. काही सुखान्त नाटके Tragedy इतकीच गंभीर असू शकतात. 'मरणं नैव वर्णयेत्।' हा भरताच्या नाट्यशास्त्राचा दंडक आहे. त्याप्रमाणे संस्कृत साहित्यातील बहुतेक गंभीर नाटकांचा शेवट दुःखान्त नाही. म्हणून ज्या नाटकांचा शेवट गोड आहे त्या सर्वांची गणना Comedy च्या सदरात करता येत नाही. शेवट गोड असो वा कटू असो, गंभीर नाटकांची प्रत वेगळी; विनोदी नाटकांची जात वेगळी. नाटक विनोदी आहे आणि शेवट सुखान्त आहे अशाच नाटकांना Comedy म्हणावे. Tragi-Comedy आणि High Comedy ही संबोधने लावली जाणारी नाटके प्राधान्याने गंभीर असतात. त्यांतील संघर्ष अटीतटीचा असतो.

*पृष्ठ ५५-५६-ॲरिस्टॉटलचे काव्यशास्त्र—अनुवादक गो. वि. करंदीकर.

बाण लावून वेध घेताना जशी धनुष्याची दोरी ताणलेली असते तशी ओढाताण अटीतटीचा सामना पाहताना प्रेक्षकाच्या मनाची होते. मग त्या सामन्याचा निकाल काहीही लागो. Comedy मध्ये असा अटीतटीचा सामना नसतो. Comedy पाहताना रसिक हसतखेळत असतो. त्याच्या मनरूपी धनुष्याची दोरी सोडलेली— मुक्त असते. म्हणून Tragedy चे मराठीत दुःखान्तिका किंवा शोकान्तिका हे भाषांतर बरोबर वाटत असले तरी Comedyचे सुखान्तिका हे भाषांतर अयथार्थ ठरते. Comedy साठी 'हास्यात्मिका' हा शब्द योजणे व तदनुरूप Comedy चा विचार करणेच इष्ट होईल.

एका व्यक्तीच्या व्यंगाला नाटकाचा विषय करण्याऐवजी समाजातील अनिष्ट आचाराला, खुळचट समजुतीला किंवा कालबाह्य रूढीला नाटकाचा विषय करून मोलियरने विनोदी उपहासप्रधान नाटके लिहिली* विनोदी लेख लिहिताना कोल्हटकरांनी प्रामुख्याने हेच धोरण ठेवले. बंडूनाना, पांडुतात्या, सुदामा या पात्रांना स्वतःचे असे आगळे व्यक्तिमत्व नाही. ते तत्कालीन समाजातील काही अनिष्ट प्रवृत्तींचे व मानवी स्वभावाचे नमुने ( Types ) आहेत. त्यांच्या लीला अतिशयोक्तीने वर्णन करून कोल्हटकरांनी तेव्हाच्या स्थितिप्रिय समाजाचा उपहास केला. त्यांच्या डोळ्यांत सुधारणेचे अंजन घातले. अगदी अलीकडे, स्वातंत्र्यपूर्वकाळी, महाराष्ट्रातील काही गांधीवाद्यांनी जो भोंगळ लुंगीवाद माजविला होता, त्याविरुद्ध मार्मिक विनोदी टीका पु. ल. देशपांडे यांनी 'तुझे आहे तुजपाशी' या नाटकात केली आहे. शिवाय या नाटकातील काकाजीसारख्या काही पात्रांना स्वतःचे असे आगळे विलोभनीय वैशिष्ट्य लाभले आहे. व्यंग व्यक्तीचे असो वा समाजाचे असो त्यातील हास्यास्पदता प्रगट करणे हाच विनोदी नाटकांचा विषय होय.

मग असा प्रश्न उद्भवतो की विनोदी नाटकात गंभीर प्रसंग असावेत की नसावेत? हास्यात्मिकेत करुणादी रसांना वाव आहे की नाही? मानवी जीवनात एकभावात्मक असे अलग कप्पे सापडत नाहीत. तेव्हा तदनुवर्ती वाङ्मयात केवळ एकरसात्मक जीवनदर्शनही कृत्रिम होईल. तेव्हा विनोदी नाटकात इतर रसांची अनुपस्थितीच असावी हा आग्रह काही उपयोगाचा नाही. तरीही विनोदी नाटक हे प्रामुख्याने विनोदी असावे, हे कोणालाही मान्य करावे लागेल. विनोदी नाटकात उन्नत व्यक्ती व गंभीर प्रसंग ही असलीच तर त्यांना गौण स्थान असावे व ती विनोदी वातावरणाला पोषक व्हावीत. जर हे तारतम्य सुटले, किंवा प्रमुख पात्रे विनोदास अनुकूल असूनही जर त्यांच्यातील उदात्तगुणांचाच अधिक आविष्कार झाला तर Comedyच्या वातावरणाला बाध येईल. गडकऱ्यांच्या भावबंधन नाटकाचा पोत पाहता ते Comedyच्या जातीचे नाटक आहे हे स्पष्टपणे जाणवते. पण त्यात नाटककाराने गंभीर वातावरणाची नको तितकी रेलचेल केली आहे. नाटकाच्या उत्तरार्धात तर धुंडिराज व लतिका ह्या दोन पात्रांच्या स्वभावातील थोर गुणांच्या अभिव्यक्तीलाच अधिक अवसर मिळाला आहे. त्यामुळे एका चांगल्या विनोदी नाटकाचा पाक बिघडला आहे. विनोद खुलण्यास पोषक असे हलके फुलके वातावरण सौभद्र नाटकात आहे. सौभद्र नाटकात तसे विनोदी प्रसंग किंवा पात्रे ही थोडी आहेत. त्यात करुण, शृंगार, अद्भुत इत्यादी रसांचाही आविष्कार झाला आहे. पण त्याची एकूण घडण Comedy ची आहे. सौभद्र नाटकातील कृष्णाच्या कारस्थानात नाटककाराने पहिल्यापासून रसिकांना सामील करून घेतले आहे. त्यामुळे कृष्णाच्या सद्हेतूबद्दल प्रेक्षकांच्या मनात किंतू उरत नाही. सुरुवातीलाच कृष्णाच्या कारस्थानाला यश येणार याबाबतही प्रेक्षकांची खात्री असते. त्यामुळे नाट्यगत पात्रे गंभीरपणे विविध मनोवृत्तीत वावरत असली तरी प्रेक्षक गंभीर न होता उलट त्यांना गालांतल्या गालांत हसतच असतो. शुद्ध

---

* Moliere followed the Horation precept, to observe the manners of his age, and give his characters the color befitting them at the time.
page 10, Introduction by Wylie Sypher –COMEDY

अनुक्रमणिका

Comedy चे स्वरूप समजण्यासाठी संशयकल्लोळ हे नाटक अभ्यसनीय ठरते. त्यातही थोडे गंभीर प्रसंग आहेत पण ते विनोदाला चांगला उठाव देतात. नाटककाराने प्रेक्षकांना आत्मविश्वासात घेऊन संशयकल्लोळ नाटकातील नवराबायकोंच्या संशयी स्वभावातील खुळेपणा पटवून दिलेला असतो. नाट्यगत पात्रांचा संशय उत्तरोत्तर वाढत जावा, अशा कौशल्याने संविधानकाची फार चांगली रचना झाली आहे. नाट्यगत पात्रांचा एकमेकांविषयी संशय वाढतो त्याच वेळी त्यांचे ते अज्ञान आहे, अन्यथा ती फार चांगली निष्ठाशील पतिपत्नी आहेत, याचा प्रेक्षकांना पुनःपुनः प्रत्यय येतो. तसाविरीमुळे बराच घोटाळा होतो, पण अखेरीस तो उकलतो. फाल्गुनराव व कृत्तिका यांची मने साफ होतात. सुताने स्वर्गास जाण्याचा त्यांचा खुळा आणि उतावळा स्वभाव त्यांना पटतो. पण जेव्हा ती गंभीरपणे नाटकात एकमेकांवर आरोपप्रत्यारोप करतात तेव्हा प्रेक्षक मात्र खदखदा हसतच असतात.

हास्यास्पद पात्रे व हास्योत्पादक प्रसंग हाच नाटकातील विनोदाचा प्रमुख विषय होय. हा विनोद पात्रांच्या विसंगत वागण्यातून मानसिक उणीवांतून, निरुपद्रवी शारीरिक व्यंगांतून निर्माण होतो. अनपेक्षित, विचित्र, असामान्य घटनाप्रसंगांमुळे, पात्रापात्रांच्या अनैसर्गिक देशवेषभाषाबदलामुळे,हा विनोद पोसला जातो आणि अतिशयोक्ती, चमत्कृतिपूर्ण कल्पना, मार्मिक टीका, कोटिबाजपणा या बौद्धिक कसरतीने तो विनोद अधिक उठावदार होतो, रोचक, आकर्षक होतो. यावरून एक गोष्ट स्पष्ट होते की, मानवी जीवनातील सत्य, शिव, सुंदर यांच्या आविष्कारावर विनोदी वाङ्मयाचा भर नसून तदपकर्षक, तद्विरहित वर्णनाला, चित्रणाला त्यात प्राधान्य प्राप्त होते.

विनोदी नाटक पाहताना प्रेक्षक हसत असतात; म्हणजेच आनंदी असतात. आणि इतर नाटकांचा जेव्हा सुखान्त होतो तेव्हाही ते आनंदित होतात. एवढेच नव्हे तर गंभीर शोकात्म नाटकांचा तात्कालिक परिणाम प्रेक्षकमनावर सुखदुःखात्मक होत असला तरी ज्या अर्थी प्रेक्षक पदरचे पैसे खर्चून वारंवार ही शोकात्म नाटके पाहण्यात गढून जातो, त्या अर्थी या सुखदुःखाचा परिपाक होऊन काही आगळा आनंद त्याला प्राप्त होत असलाच पाहिजे. दुःखिताला सहानुभूती दाखविणे हा मानवी स्वभाव आहे. उदारवृत्तीच्या माणसावर अकारण किंवा अल्पकारणामुळे जेव्हा दुःखाचे डोंगर कोसळतात तेव्हा प्रेक्षकाची सहानुभूती उतास येते. ही सहानुभूती दाखविण्याच्या मोबदल्यात, मानसिक प्रतिक्रियेने प्रेक्षकाला उदात्त समाधान प्राप्त होते. लौकिक पातळीवरील सुखदुःखापेक्षा या समाधानापासून मिळणारे सुखआनंद हा अधिक उन्नत असतो. करुणरसातील काव्यानंद म्हणायचा तो हाच.

काव्यानंदमीमांसा करताना, जीवनमूल्यांची चिकित्सा करताना आणि परमेश्वराचे स्वरूप उकलून दाखविताना आपण 'आनंद' हा एकच पारिभाषिक शब्द निरनिराळ्या अर्थाने वापरतो; पण त्यामुळे निश्चित अर्थबोध न होता संदिग्धता वाढते. हास्यात्मिकेचा प्रेक्षकावर होणारा परिणाम तपासताना असाच गोंधळ होतो. हास्यात्मिका पाहताना प्रेक्षक हसत असतो म्हणजे आनंदी असतो या बाबतीत वादच नाही. पण म्हणून हास्यात्मिका पाहताना होणारी प्रेक्षकाची मनोवस्था आणि सुखान्तिका किंवा दुःखान्तिका पाहताना होणारी प्रेक्षकाची मनोवस्था या एकच किंवा सारख्याच असत नाहीत.

मानसशास्त्रीय दृष्टिकोणातून चिकित्सा करायची म्हटले तर प्रेक्षक ज्या रसाची अनुभूती घेत असेल त्या रसाला अनुकूल अशी वेगळी त्याची मनःस्थिती होईल. शृंगाररसानुभूती वेगळी, वीररसानुभूती वेगळी. एवढेच नव्हे तर विभावभेदानुरूप एकट्या शृंगाररसानुभूतीमध्येही विविध सूक्ष्म छटा अनुभवाला याव्यात. रसिकमनात असे विविध, सूक्ष्म, रम्य भाव निर्मिण्यात यश मिळविणे हीच कवीची खरी कसोटी होय.

पण साहित्य असे रसात्मक म्हणजे भावप्रत्ययी असते तर विनोदी वाङ्मय रसाभासात्मक व टीकापर असते. विनोदविषय झालेली पात्रे अनेक भाववृत्तीत वावरत असली तरी प्रेक्षक त्यातील हास्यास्पदताच फक्त टिपीत असतो, व हसत असतो; नवरसात हास्याचीही मोजदाद करायची सवय लागल्यामुळे विनोदी वाङ्मयाचे इतर साहित्यापेक्षा वेगळे असलेले अंतरंग आपल्या लवकर लक्षात येत नाही. भावसौंदर्यानुभूती हा साहित्याचा प्राण आहे तर मानवी जीवनातील **औचित्यविसंगती** व्यक्त करणे हा विनोदाचा आत्मा आहे. विनोदाचे आवाहन प्रामुख्याने टीकात्मक बुद्धीला असते. तेव्हा काव्यातील सुसंगतीदर्शनाने होणारी मनोवस्था व विनोदी वाङ्मयातील विसंगतिदर्शनाने होणारी मनोवस्था व

विनोदी वाङ्मयातील विसंगतिदर्शनाने होणारी वैचारिक हास्योत्पादक प्रतिक्रिया या दोन्ही एकच किंवा सारख्या कशा असू शकतील?

अतिशय तहान लागल्याने येणारे वैकल्य आणि ही तहान भागल्याने मिळणारे समाधान हे तात्कालिक व लौकिक विकार होत. या विकारांमुळे जाणवणाऱ्या सुखदुःखात व्यक्ती स्वार्थीबुद्धीने गुरफटलेली असते. साहित्यानुभूती घेतानाही विशिष्ट विकारांची जागृती होते व ते काही प्रमाणांत सुखदुःखे देणारेच असतात. पण साहित्यात एवढेच नसते. साहित्याचे प्रयोजन केवळ सुखदुःखात्मक विकारजागृती हे नसून त्यातून भावसौंदर्याचा प्रत्यय आणून देणे, आहे. हा भावसौंदर्याचा प्रत्यय प्रेक्षक-मनात विविध विकारांची संघटना व सुसंगती निर्माण करतो. त्यात रमण्याचा आनंद हाच खरा कलानंद. हा कलानंद व तृष्णाशमनाने होणारा लौकिक आनंद यांत फरक मानावा लागेल.

कलात्मक आनंद देणे, हा विनोदी वाङ्मयाचा हेतूच नाही. विनोदी वाङ्मय वाचताना आपण हसतो—आनंदी असतो ; पण तो आनंद कलानंदापेक्षा वेगळा असतो.

मानवी जीवनातील औचित्य – विसंगतीचा बौद्धिक प्रत्यय येणे व त्यामुळे ज्ञानात्मक आनंद होणे हा विनोदी वाङ्मयाचा एक महत्त्वाचा परिणाम म्हणावा लागेल. विनोदी वाङ्मयात वर्णन केलेल्या दोषांपासून आपण अलिप्त आहोत ही आत्मतृप्ती हाही हास्यात्मिकेचा एक आनंद-दायी परिणाम होय. हास्यास्पद व्यक्तीपेक्षा आपण कोणी वेगळे आहोत, हा वाटणारा अहंकार सुखदायीच असतो. रसिकाच्या खेळकर–खोडकर प्रवृत्तीला मिळणारे मानसिक आव्हान व त्यातील क्रीडात्मक आनंद हा हास्यात्मिकेचा आणखी एक महत्त्वाचा आनंददायी परिणाम होय. शिवाय प्रेक्षकांच्या कल्पनाशक्तीला मिळणारे रोचक खाद्य व त्यामुळे मिळणारा आनंद हाही विनोदाचा एक अनुकूल परिणाम होय.

वरील विविध सुखदायी आनंदात्मक परिणाम गृहीत धरूनही प्रेक्षक ज्या विषयात रमतो तो विषय मानवी जीवनातील कुरूपता आहे, ही बोचक जाणीव झाल्या-वाचून राहत नाही. सर्कशीतील विदूषकांनी अधूनमधून चार कोलांटउड्या मारल्याने प्रेक्षकांना आनंद होतो. प्रेक्षक विदूषकांच्या कौशल्याचे कौतुकही करतो पण कसरत करणारे कलावंत सर्कशीच्या रिंगणातून बाहेर पडले व नुसते विदूषकच मर्कटचेष्टा करीत राहिले तर प्रेक्षक ते किती काळ सहन करू शकतील व त्यापासून करमणूक करून घेतील ? हास्यात्मिकेमुळे भरपूर करमणूक होत असली, क्रीडात्मक वृत्ती जागी झाल्याने मानसिक मोकळेपणा अनुभवता येत असला, तरीही साहित्यातील सौंदर्यप्रत्ययाने होणारी मनोवस्था अनुभवाला येतच नाही. शोकांतिकेच्या परिणामातील दुःख गृहीत धरूनही त्यामुळे जो भावसौंदर्याचा, कलात्मक आनंदाचा प्रत्यय येतो त्याला हास्यात्मिकेचा प्रेक्षक पारखाच राहतो. म्हणूनच जाणते रसिक काव्याच्या तुलनेने विनोदी वाङ्मयाला साहित्यात गौण स्थान देतात.

विनोदी वाङ्मय ही प्रतिभेची निर्मिती नाही अशी आतापर्यंतच्या काव्यानंदमीमांसेवरून समजूत होण्याची शक्यता आहे. एका महत्त्वाच्या बाबतीत काव्य आणि विनोदी वाङ्मय यांत साम्य आहे. दोन्हींच्या निर्मितीसाठी तरल कल्पनाशक्तीचा वापर व्हावा लागतो. किंबहुना विनोदी वाङ्मयाची ललित वाङ्मयात गणना केली जाते, त्याचे हेच एक प्रमुख कारण असावे. विनोदी वाङ्मयाची आस्वाद्यता या कल्पनाशक्तीच्या प्रतीवरच अवलंबून असते. एकाच साहित्यिकाने काव्य आणि विनोदी वाङ्मय यशस्वीपणे हाताळलेले आढळत असले तरी त्या साहित्यिकाची काव्यनिर्मितिकालीन मनोभूमिका वेगळी व विनोदलेखन करतानाची मनोवृत्ती वेगळी असावी. प्रतिभा व्युत्पत्ती, अभ्यास या तिन्ही कारणांची उपस्थिती दोन्ही ठिकाणी असली तरी प्रतिभेच्या कल्पनाशक्तीवरच विनोदी लेखकाचा अधिक भर असतो. विचार व कल्पनाशक्तीच्या साह्याने विनोदी लेखक मानवी जीवनातील विसंगतीचा शोध लावतो व त्यातून हशा पिकवितो. कवी व विनोदी-लेखक यांची अनुक्रमे सौंदर्याचा साक्षात्कार व कुरूपतेचा परिहार ही दोन कार्ये परमार्थाने परस्परपोषक असली तरी भिन्न आहेत. कवीपेक्षा विनोदी लेखकाला आणखी एक गोष्ट आवश्यक असते. लेखक क्रीडाप्रवृत्तीने जेव्हा भाष्य करतो तेव्हाच विनोद निर्माण होण्याची शक्यता आहे. अन्यथा विनोदशून्य व निंदाव्यंजक टीकाप्रबंध तयार होईल.

वरील विवेचनावरून विनोदी वाङ्मयाचे स्वरूप स्पष्ट होते. विनोद हा काव्य आणि टीका यांच्या सीमारेषा छेदून जाणारा स्वतंत्र वाङ्मयप्रकार आहे. नवरसांत हास्याची गणना केल्याने विनोदाची प्रतिष्ठा वाढत नाही किंवा अन्यथा कमी होत नाही. विनोदाचे सामर्थ्य स्वतंत्र आहे.

रामचंद्र चिंतामण ढेरे

# मराठी दत्तोपासनेची तेलगू धारा

गेल्या दीड-दोन हजार वर्षांपासून दत्तोपासना भारताच्या सांस्कृतिक इतिहासात स्थान पावली आहे. दक्षिणेत, विशेषतः महाराष्ट्रात दत्तोपासनेचे महत्त्व अनन्यसाधारण आहे. नाथ आणि महानुभाव या संप्रदायांच्या वातावरणातून यादवकाळातच दत्तोपासनेचे वैभव वाढू लागले; परंतु पंधराव्या शतकारंभी श्रीनरसिंहसरस्वतींच्या विभूतिमत्त्वाने दत्तोपासना मराठी लोकजीवनात व्यापक प्रमाणावर प्रसृत झाली आणि प्रत्यक्ष नरसिंहसरस्वतीच दत्तावतार म्हणून उपास्य बनले. कारंजा, औदुंबर, नरसोबाची वाडी व गाणगापूर ही त्यांच्या वास्तव्याने पुनीत झालेली स्थाने आज दत्तक्षेत्रे म्हणून गाजत आहेत आणि 'गुरुचरित्र' हा त्यांचे चरित्र गाणारा ग्रंथ दत्तोपासनेच्या क्षेत्रात मंत्रप्रतिष्ठा पावला आहे. आजही महाराष्ट्रातील सर्व विभागांत आणि सर्व स्तरांत दत्तोपासनेचा प्रभाव टिकून आहे. दत्तोपासना ही महाराष्ट्राच्या सांस्कृतिक इतिहासाची एक प्रभावी आणि प्रवाही धारा आहे. तिच्यातील सकाम प्रेरणांतून आजचा आंग्लविद्याविभूषित सुशिक्षितांचा वर्गही सुटू शकला नाही. ही वस्तुस्थिती धर्माभ्यासकांच्या दृष्टीने चिंतनीय आहे.

### दत्तोपासनेचा आंध्रमध्ये प्रवेश

नरसिंह सरस्वतींचे पूर्वावतार श्रीपाद श्रीवल्लभ हे महाराष्ट्रीय नव्हते—गोदावरीच्या मुखाजवळील पीठापुरम् हे त्यांचे जन्मस्थान. परंतु त्यांच्या चरित्र–चारित्र्याचा प्रभाव पडला तो महाराष्ट्रावर. त्यांच्या जन्मभूमीत त्यांची नामस्मृतीही उरलेली नव्हती. वासुदेवानंद सरस्वतींनी आपल्या भारतयात्रेत पीठापुरम येथील श्रीपाद श्रीवल्लभांचे जन्मस्थान निर्दिष्ट केले, तेव्हा स्थानिक लोकांना समजले की, मराठी भक्तिजीवनात देवतास्वरूप पावलेली एक विभूती आपल्याकडे जन्मास आली होती.

कर्नाटकात मात्र नरसिंह सरस्वतींचा प्रभाव पुष्कळच उमटला. त्यांच्या गाणगापूरच्या निवास–काळात त्यांना अनेक कानडी अनुयायी लाभले. मराठी 'गुरुचरित्रा'च्या कर्त्याची मातृभाषा कानडी होती, हे सर्वश्रुत आहे.

मराठी दत्तोपासनेची धारा सोळाव्या शतकाच्या उत्तरार्धात आंध्रमध्ये प्रविष्ट झाली, असे अलीकडेच प्रसिद्ध झालेल्या एका इंग्रजी लेखावरून ज्ञात होत आहे. 'डॉ. टी. एम्. पी. महादेवन् गौरवग्रंथा'त मद्रास विद्यापीठातील तेलगू विभागाचे प्रमुख प्रा. एन्. वेंकटराव यांचा[1] 'तेलगू साहित्यातील दत्त–सांप्रदायिक ग्रंथ' हा लेख प्रसिद्ध झाला आहे. या लेखात प्रा. राव यांनी आंध्रमधील दत्तसंप्रदायाच्या प्रवेशाची पार्श्वभूमी स्पष्ट करून, या संप्रदायाच्या प्रभावातून निर्माण झालेल्या अद्वैतवेदान्तपर तेलगू वाङ्मयाचा स्थूल परिचय घडविला आहे. प्रा. राव यांचा महाराष्ट्रातील दत्तसंप्रदाय आणि प्राचीन मराठी वाङ्मय यांच्याशी परिचय नसल्यामुळे त्यांना मराठी आणि तेलगू दत्तोपासनेचा अनुबंध संपूर्णतः स्पष्ट करता आलेला नाही. परंतु त्यांनी तेलगूतील दत्तसंप्रदायिक वाङ्मयाचा परिचय, स्थूलपणे का होईना, इंग्रजीतून करून दिल्यामुळे आपणांस त्यांच्या माहितीचा उपयोग करून घेणे शक्य होत आहे. दत्तोपासनेच्या आंध्रमधील प्रवेशाची पार्श्वभूमी स्पष्ट करताना प्रा. राव लिहितात :

"हा संप्रदाय संपूर्णपणे अद्वैती असून, तो महाराष्ट्रात उगम पावला आहे. या संप्रदायाचे मुख्य ठाणे मात्र आंध्र प्रदेशाच्या राजधानीपासून—हैदराबादपासून २१५

---

1. 'Works relating to Dattatreya cult in Telugu Literature' : N. Venkata Rao ('Essays in Philosophy' presented to Dr. T. M. P. Mahadevan, Madras. 1962 Pp. 464–475).

अनुक्रमणिका

मैल अंतरावर, तेलंगणातील ( विशालांध्र ) अदिलाबाद जिल्ह्यातील माहूर हे आहे. माहूरमध्ये दत्तात्रेयाचे मंदिर आहे आणि तेथे महंतांच्या व्यवस्थेखाली वर्षातून तीन वेळा होणाऱ्या यात्रोत्सवात जवळ जवळ पन्नास हजार यात्रिकांची गर्दी लोटते.

माहूर हे स्थान ज्या अदिलाबाद जिल्ह्यात मोडते, तो जिल्हा आंध्र-महाराष्ट्राच्या सीमेवरील आहे. त्यामुळे या उभय प्रदेशांच्या सांस्कृतिक आणि ऐतिहासिक अनुबंधात माहूरची भौगोलिक स्थिती वैशिष्ट्यपूर्ण आहे. तेलगू साहित्यात मराठी भाषा[1] आणि माहूर यांच्याविषयीचे उल्लेख बाराव्या शतकापासून मिळतात. ”

हैदराबाद राज्य अस्तित्वात असताना माहूर हे दत्तोपासनेचे आदिकेंद्र अदिलाबाद डिस्ट्रिक्टमध्ये मोडत होते, हे खरे ; परंतु आज ते नांदेड जिल्ह्यातील किनवट तालुक्यात मोडत असून, तेथील वातावरण सर्वांशाने मराठी आहे. प्रा. राव प्रादेशिक अभिमानामुळे माहूरचा समावेश ‘ विशालांध्रा ’त करीत आहेत, असे दिसते.

## दासोपंतांची तेलगू शिष्यपरंपरा —

आंध्रमधील दत्तसंप्रदायाचे मराठीतील मूळ सांगताना प्रा. रावांनी लिहिले आहे : “ माहूर येथील दत्तमंदिराच्या प्रमुखाला ‘ दत्तात्रेय योगी ’ असे म्हणतात. या दत्तात्रेय योग्यांपैकी तेलगू साहित्याशी संबद्ध असा दत्तात्रेय योगी इ. स. १५५० च्या सुमारास होऊन गेला...... या दत्तात्रेय योग्याने दास गोसावी नामक आपल्या शिष्यास दत्तसंप्रदायाचे तत्त्वज्ञान मराठी भाषेतून शिकविले. दास गोसाव्याने ते तत्त्वज्ञान ‘ वेदान्तव्यवहारसारसंग्रह ’ या ग्रंथात ग्रथित केले. त्याने या ग्रंथातील ज्ञान गोपालभट्ट आणि सर्वदेव या आपल्या तेलगू शिष्यांना तेलगूतून दिले. दास गोसाव्याच्या या शिष्यद्वयाने ‘ वेदान्तव्यवहारसारसंग्रहा ’चे तेलगू रूपांतर केले. ”

दत्तात्रेय योगी आणि त्याचा शिष्य दास गोसावी हे तेलगूतील दत्तोपासनेचे आदिगुरु होत, अशी प्रा. राव यांनी पुरविलेली माहिती आहे. दत्तात्रेय योगी ही कोणी मानवी व्यक्ती होती, हा प्रा. राव यांचा समज यथार्थ दिसत नाही. दत्तोपासनेच्या क्षेत्रात दत्तात्रेय देवता ही जशी उपास्य आहे, तशीच प्रबोधकही ( गुरुस्वरूपही ) आहे, हे अभ्यासकास परिचित आहे. प्रा राव यांनी उल्लेखिलेले दास गोसावी म्हणजे सुप्रसिद्ध मराठी दत्तोपासक दासोपंत हे होत, यात मुळीच संशय नाही. प्रा. राव यांनी दासोपंतांच्या तेलगू शिष्यांच्या कालाच्या अनुरोधाने दत्तात्रेयाचा काळ सोळावे शतक असा कल्पिलेला दिसतो. दासोपंतांचा काळ श. १४७३–१५३७ असा आहे, तो प्रा. रावांच्या माहितीशी पूर्णपणे जुळतो. दासोपंत हे श. १४८९ च्या सुमारास वयाच्या सोळाव्या वर्षी घर सोडून निघाले ते माहुरास आले. तेथे एक तपाहून अधिक काळ त्यांनी तपश्चर्या केली. तेथेच त्यांना दत्तसाक्षात्कार झाला आणि दत्तात्रेयाच्या आदेशानेच त्यांनी माहूर सोडले. दासोपंतांचे मूलस्थान बिदरकडचे नारायणपेठ आणि त्यांच्या प्रदीर्घ तपाचे स्थान, माहूर आंध्रच्या सीमेवरच असल्यामुळे त्यांची शिष्यशाखा तिकडे असणे सर्वथा संभवनीय आहे. सिद्धावस्थेनंतर त्यांना ‘ दासोपंत गोसावी ’ असेच म्हणत. आज त्यांच्या वंशजांचे उपनाम ‘ गोसावी ’ असेच प्रचलित आहे. यातील पंत हे खास मराठी आदरसूचक पद वगळले, तर दास गोसावी असेच त्यांचे पारमार्थिक नाव त्यांच्या तेलगू शिष्यशाखेत नोंदले जाणे शक्य दिसते. दासोपंतांच्या नावावर ‘ वेदान्तव्यवहारसारसंग्रह ’ या नावाचा ग्रंथ मराठी वाङ्मयाच्या इतिहासात नोंदलेला नाही. देववरातील कागदपत्र पाहून त्यांच्या ग्रंथांची जी यादी कै. देवांनी केलेली आहे, तीतही प्रस्तुत ग्रंथाचे नाव समाविष्ट नाही. कदाचित आंबेजोगाईस येऊन स्थिर होण्यापूर्वी प्रस्तुत ग्रंथाची रचना झालेली असावी. पुष्कळ भारतीय बौद्धसाहित्य जसे आज केवळ तिबेटी आणि चिनी अनुवादाच्या रूपानेच अस्तित्वात आहे, तशीच दासोपंतांच्या प्रस्तुत कृतीची कहाणी दिसते. या ग्रंथाचे तेलगू रूपांतर मद्रास येथील गव्हर्मेंट ओरिएन्टल मॅन्युस्क्रिप्ट

---

१. पालकुरिकी सोमनाथ ( ११८०–१२४० ) या प्रसिद्ध वीरशैव ग्रंथकाराच्या ‘ पंडिताराध्य-चरित्रा ’त ( पर्वत प्रकरण, पृ. ५०९ ) मराठी उतारा आढळतो. ( टीप प्रा. राव यांची ).

लायब्ररीमध्ये आहे[1]. दासोपंतांना प्राप्त झालेला परमबोध प्रथम ज्या कृतीत ग्रथित झाला आणि ज्या कृतीने महाराष्ट्राबाहेर दत्तोपासनेची धारा प्रवाहित केली, ती कृती पुनश्च मराठीत अनुवादित होणे, महाराष्ट्राच्या सांस्कृतिक इतिहासाच्या अभ्यासाच्या दृष्टीने, आवश्यक आहे.

**परमानंदतीर्थ आणि त्यांची परंपरा —**

प्रा. राव यांनी आंध्रमधील दत्तसंप्रदायाच्या तीन-परंपरा नोंदविल्या आहेत. त्यांपैकी पहिली दासोपंतांची. तिचा विचार आपण केलाच आहे. दुसरी परंपरा पुढीलप्रमाणे आहे :




या परंपरेतील आदिनाम हे दत्तात्रेय देवतेचे आहे. परंतु प्रा. राव यांच्या समजुतीप्रमाणे हे नाव एका मराठी साधूचे असल्यामुळे, त्यांनी परमानंद तीर्थांचे गुरुत्वही महाराष्ट्राकडेच दिले आहे. परमानंदतीर्थांच्या अनेक ग्रंथांचा त्यांनी स्थूल परिचय दिलेला आहे; परंतु त्यांपैकी एकाही ग्रंथाचा रचनाकाल त्यांनी दिलेला नाही. त्यामुळे परमानंदतीर्थ हे दासोपंत कालीनच होते की काय याचा निर्णय करता येणे कठीण आहे. परमानंदतीर्थांचे निवासस्थान चंपकारण्यक्षेत्र ( मन्नारगुडी ) हे होते. त्यांचे वाङ्मय चार विभागांत वर्गीकृत करता येते :

१. शतक, २. द्विपद, ३. यक्षगान, ४. वचन. या चार विभागांतील कृतींचा स्थूल परिचय पुढीलप्रमाणे :

**१. शतके :** परमानंदतीर्थांनी तीन शतक–काव्ये रचली आहेत. 'सम्पगिमन्नशतकमु' हे मन्नारगुडीच्या मन्नारुदेवावर लिहिलेले असून, त्याची बैठक अद्वैत वेदान्ताचीच आहे. दुसरे 'शिवमुकुन्दपरमानन्दशतकमु' हे हरिहराद्वैताचे तत्त्व स्पष्ट केले आहे. तिसरे 'दत्तात्रेयशतकमु' हे शतक दत्तात्रेयस्तुतिपर आहे.

**२. द्विपदकाव्ये :** 'अनुभवदर्पणमु' आणि 'शिव-ज्ञानमंजरी' ही दोन द्विपदपद्धतीची काव्ये असून, कवीने ती दोन्ही दत्तात्रेयालाच अर्पण केली आहेत. पहिल्यात वेदान्तानुभव ग्रथित असून, दुसऱ्यात अद्वैतज्ञानाची मांडणी आहे.

**३. यक्षगान :** 'यक्षगाना'सारख्या अलौकिक माध्यमातून तत्त्वज्ञान मांडण्याचा पहिला प्रयत्न परमानंदतीर्थांनी आपल्या 'मुक्तिकान्तापरिणयमु' या कृतीत केला आहे. या कृतीवर 'प्रबोधचंद्रोदया'चा प्रभाव आहे. या कृतीत पुरुष आणि मुक्ती यांच्या परिणयाचे तात्त्विक वर्णन आहे.

**४. वचन :** 'दत्तात्रेयद्वात्रिंशती' हे ३२ श्लोकांचे दत्तस्तोत्र आहे.

---

१. Descriptive catalogue of Telugu Manuscripts, Vedanta No. 2593. ( ऋण प्रा. राव यांची )

परमानंदतीर्थांनी तीन गद्यग्रंथ लिहिले आहेत. त्यांतील पहिला विद्यारण्ययतींच्या 'वेदान्तवार्तिका'च्या आधारे रचलेला आहे. त्याचे नाव 'वेदान्तवार्तिकमु' किंवा 'उपदेशक्रममु' असे आहे. हा ग्रंथ तामीळमध्येही अनुवादित झाला आहे. दुसरा 'ब्रह्मविद्यासुधार्णवमु' हा परमानंदतीर्थांचा सर्वश्रेष्ठ प्रचंड ग्रंथ आहे. यात अद्वैत-वेदान्ताचे विस्तृत विवरण आहे.

**विवेकचिन्तामणि : तेलगू → कानडी → मराठी**

परमानंदतीर्थांची परमार्थप्रेरणा महाराष्ट्रातील आहे की नाही हे निश्चित नसले, तरी त्यांच्या एका ग्रंथाचा मराठीशी संबंध पोहोचतो, तो ग्रंथ म्हणजे 'विवेक-चिंतामणि' होय. या वेदान्तपर ग्रंथाचे वेदान्त-सिद्धान्त, शिव-सिद्धान्त व ब्रह्माण्ड-प्रपंचभुवनकोश-रचना-विचित्र सिद्धान्त असे तीन परिच्छेद आहेत. या ग्रंथाची दोन हस्तलिखिते तंजावरच्या सरस्वती-महाल-ग्रंथालयात (क्र. ७५०, ७५१) आहेत. "हा ग्रंथ निजगुणशिवयोगी यांनी तेलगूतून कानडीत अनुवादित केला आहे." अशी टीप प्रा. रावांनी दिली आहे. ही टीप आपल्या दृष्टीने फार महत्त्वाची आहे. कारण निजगुणशिवयोगींच्या 'विवेकचिंतामणी'चे मराठी रूपान्तर एकनाथकालीन लिंगायत मराठी संत शांतलिंगस्वामी यांनी केले आहे. 'विवेकचिंतामणि' ही निजगुणशिवयोगी यांची स्वतंत्र रचना आहे, अशी कानडी पंडितांची आजवरची धारणा आहे. निजगुणांच्या प्रस्तुत ग्रंथाचे मूळ तेलगूत आहे, याची कानडी पंडितांनाही कल्पना नसावी. प्रा. पंडित आवळीवर यांनी मराठी 'विवेकचिंतामणी'चे साक्षेपी संपादन केले असून, त्याचे प्रकाशन नुकतेच पुणे विद्यापीठ व कर्नाटक विद्यापीठ यांच्या संयुक्त प्रकाशन-योजनेतून झाले आहे. म्हणजे, 'विवेकचिंतामणि' हा ग्रंथ तेलगू→कानडी→मराठी या क्रमाने अनेक भाषांतून प्रसृत झालेला दिसतो. शांतलिंग आणि निजगुण-शिवयोगी या लिंगायत ग्रंथकारांच्या अद्वैती पिंडाची घडण परमानंदतीर्थांच्या विचारधारेने केली असेल, तर हा तेलगूतील अद्वैती ग्रंथकार मराठी व कानडी पंडितांच्या जिज्ञासेचा विषय अवश्य बनला पाहिजे.

परमानंदतीर्थांच्या शिष्यपरंपरेतील सदानंदयोगी ('सदानंदयोगिशतक'), चल्लसुरय ('विवेकन विजयमु'), ईश्वरपाणिभट्ट ('परतत्त्वरसायनम्'), मल्लण ('तत्त्वचंद्रोदयमु', 'रामस्तवराजमु', 'मुक्ति-कान्ताप्रियशतकमु'), योगानन्द ('गुरुशिष्यसंवादम्'), कम्भम्पति नरप्पा ('गुरुगीतासारमु') या सर्वांनी तेलगूत ग्रंथरचना केली आहे.

**एकनाथांची तेलगू शिष्यपरंपरा —**

प्रा. राव यांनी नोंदविलेली तिसरी परंपरा महाराष्ट्राच्या दृष्टीने महत्त्वाची आहे. ती परंपरा अशी :

दत्तात्रेय – जनार्दन – एकोजनार्दन – नरहरिमहेश–नागोजीराम – कोनेरुगुरु – महादेवगुरु – परशरामपन्तुल लिंगमूर्ती गुरुमूर्ती.

या परंपरेतील पहिली तीन नावे "दत्त जनार्दन एकनाथ" या घोषाने आपणांस एकत्रित परिचित आहेत. 'एकोजनार्दन' हे 'एकाजनार्दना'चेच रूप दिसते. गुरुनाममुद्रेसह आढळणारे 'एको शिवराम' हे मराठी नाव अभ्यासकांना परिचित आहेच. म्हणजे 'एको' या रूपाबद्दल फारशी शंका येण्याचेही कारण उरत नाही. नरहरिमहेश ही दोन वेगळी नावे तर नसतील ना? निंबराजांचे गुरु नरहरी हे नाथांचेच शिष्य, तेच हे असतील, तर नरहरी हे मराठीच ठरतील. आणि महेश हे नरहरिशिष्याचे नाव मानावे लागेल. पुढचे नागोजीराव हेही मराठी वळणाचेच नाव वाटते. शेवटची तीन नावे मात्र तेलगू दिसतात. या परंपरेतील शेवटचे परशुराम पंतुल लिंगमूर्ती गुरुमूर्ती एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धात होऊन गेले. यांचे 'सीतारामांजनेय-संवादमु', 'मनशतक' व 'सीतापट' हे ग्रंथ प्रा. रावांनी निर्देशिले आहेत. 'तेलुगू और उसका साहित्य' या पुस्तकात (पृ. ७२-७३) श्री. हनुमच्छास्त्री 'अयाचित' यांनी या ग्रंथकाराविषयी लिहिले आहे :

"हे नियोगी ब्राह्मण होते. यांच्या पित्याचे नाव राममंत्री आणि मातेचे नाव तिम्मांबा. हे महादेवयोगींचे शिष्य होते. यांचे निवासस्थान वरंगलातील मट्टेवाडा हे होते. **मट्टेवाड्यात यांचे वंशज आजही विद्यमान आहेत.** हे महान तत्त्वदर्शी कवी भागवताचा प्रणेता पोतन्ना याचे अवतार समजले जातात. यांनी 'सीतारामां-जनेयसंवादमु' ही आपली अमरकृती आपले गुरू महादेव यांच्या चरणी अर्पिली आहे ...... गूढातिगूढ वेदान्त विषय यांनी सुलभ दृष्टान्तांनी सुगम आणि भावुकतेने हृदयंगम बनविला आहे. या ग्रंथाच्या पहिल्या आश्वासात 'तारकयोग', दुसऱ्या आश्वासात 'सांख्य योग' आणि तिसऱ्या आश्वासात 'अमनस्कयोग' विवारिला आहे. यांचे पुत्र राममूर्ती यांनीही 'शुकचरित्रमु' नाम एक वेदान्तपर काव्य रचले आहे."

प्रा. राव यांनी जनार्दनांच्या नावावर 'जीवप्रबोधमु' नामक पाच अध्यायांचा तेलगू ग्रंथ नोंदविला आहे. मराठीत जनार्दन स्वामींचा ग्रंथ उपलब्ध नाही. म. म. पोतदारांना पैठण येथे सापडलेल्या पंचीकरणावरील त्रुटित पण प्राचीन ग्रंथात जनार्दन अशी कर्तृनाममुद्रा आहे, त्यावरून तो ग्रंथ जनार्दन स्वामींचाच आहे असे म्हनले जाते.[१] 'जीवप्रबोधमु' या तेलगू ग्रंथाचे हस्तलिखित आणि प्रस्तुत मराठी त्रुटित ग्रंथाचा अवशिष्ट भाग यांची तुलना करून या बाबतीत निर्णय करणे शक्य आहे. अंतर्बाह्य पुराव्यांनी जर हा तेलगू ग्रंथ मुळात जनार्दनस्वामींचाच ठरला, तर त्याचे मराठी रूपांतर झाले पाहिजे.

## 'विवेकसिंधू'चे तेलगू अनुवाद —

प्रा. राव यांनी नोंदविलेली आणखी महत्त्वाची माहिती म्हणजे 'विवेकसिंधू'चे तेलगू अनुवाद झाले आहेत, ही होय. 'विवेकसिंधू'च्या गद्य अनुवादाच्या आधारे वेंगिनाटी कोंडय्या नामक ग्रंथकाराने पाच विभागांचा आणि पंधरा प्रकरणांचा काव्यग्रंथ रचला. या ग्रंथात वेदान्त तत्त्वज्ञानाच्या सर्व अंगाचे विवेचन असून, काव्यदृष्ट्याही हा ग्रंथ उत्तम आहे.

प्रा. राव यांनी वेंगिनाटी कोंडय्याचे चरित्र, परंपरा व काळ यासंबंधी काहीच माहिती दिलेली नाही. तसेच कोंडय्याची कृती ज्या गद्य अनुवादावर आधारलेली आहे, तो गद्य अनुवाद कोणी व केव्हा केला, त्याचाही निर्देश केला नाही. त्यामुळे 'विवेकसिंधू'चा तेलगूंतील प्रवेश कोणत्या परंपरेच्या माध्यमातून झाला, त्याचा निर्णय करणे कठीण आहे. प्रा. कृ. पां. कुलकर्णी यांनी 'विवेकसिंधू'च्या संपादनाच्या वेळी ज्या पोथ्या पाहिल्या होत्या, त्यांत चिक्लिकेन येथील ग्रंथालयात त्यांना एक पोथी आढळली होती, हे प्रस्तुत संदर्भात ध्यानी घ्यावयास हवे.

## संशोधनाचे नवे दालन

प्रा. राव यांचा प्रस्तुत लेख संशोधनाचे नवेच दालन उघडणारा आहे प्राचीन मराठी साहित्य आणि संस्कृती यांच्या संशोधन क्षेत्रात प्रस्तुत लेखाचे विशेष महत्त्व जाणवल्यामुळे या लेखातील माहितीचा सर्व अभ्यासकांसाठी परिचय घडविणे मला अत्यावश्यक वाटले. ही माहिती आपल्या दृष्टीने किती आणि कशी महत्त्वाची आहे, याचे स्थूल दिग्दर्शनही केले आहे. प्रा. राव यांनी व्यक्तींचे व ग्रंथांचे काल दिलेले नसल्यामुळे, काही कल्पना मनात येऊनही, मांडता येत नाहीत. तसेच, मूळ हस्तलिखितांच्या परिचयावाचून निश्चित निर्णय करता येणार नाहीत. त्यासाठी खास परिश्रम घ्यावयास हवेत. प्रा. रावांशी मी पत्रव्यवहार सुरू केला आहे. त्यातून जे काही निष्पन्न होईल, ते यथावकाश पाहूच.

---

१. भा. इ. सं. मं. त्रैमासिक, वर्ष १२, अंक २, पृ ५९– ६२.

× ×

प्रा. सूर्यकान्त खाण्डेकर

# आधुनिक मराठी काव्यातील वर्षा ऋतू

वर्षाऋतू हा कवींना नेहमीच स्फूर्ती देणारा ऋतू ! मेघांचा गर्दरंगी केशकलाप धारण करून वर्षा रुमझुम पावलांनी अवतरते. तिच्या केवळ स्पर्शाने वसुंधरेची कळी उमलू लागते. ओल्या वस्त्राने प्रवेश करणारी वर्षावधू पाहिल्या-वर नवे चैतन्य, नवा उत्साह प्राप्त होतो. आर्द्र मोहकतेने नटणाऱ्या वर्षाराणीला पाहून कविप्रतिभेला बहर येऊ लागतो. आधुनिक मराठी कवींना एकच सृष्टिघटना त्यांच्या भिन्न व्यक्तिमत्त्वामुळे कशी भिन्न दिसते, हे पाहताना रसिक दृष्टीला एका वेगळ्याच आनंदाचा प्रत्यय येतो. आपल्याकडील स्त्रीगीतांमध्ये पावसाची अत्यंत मनोवेधक वर्णने आहेत. या वर्णनांतून वात्सल्य भरून राहिले आहे.

मेघ गडगडे – कडाडते वीज,
कुशीमध्ये नीज – तान्हे बाळा !
पाऊस थांबेना – पाखरे गारठली –
आईच्या पदराखाली – तान्हे बाळ !

कविवर्य चंद्रशेखरांनी आपल्या घनाभिनंदन या कवितेत पाऊस नसल्यामुळे सृष्टीला येणारे दैन्य व तो आल्यावर नवे स्थित्यंतर कसे घडेल याचे मनोहारी वर्णन केले आहे.

अहे आला आला ! नवजलद हा अंबरपथी
वसोनी वायूच्या अतिचपल वेगोयुतरथी !

असे मेघाचे स्वागतपर वर्णन ते प्रारंभी करतात. आकाशात आपले सैन्य जमवून 'खळ दुष्काळा'सह मेघाने घनघोर संग्राम मांडला आहे. 'नभोमध्यप्रांती' गडबड उडवून दिली, प्रचंड मार्तंडाला घेरून त्याचे तेजहरण केले, हे जरी खरे असले तरी मेघवर्षाव न झाल्यामुळे पृथ्वीला दैन्य प्राप्त झाले, क्षुधेने, तृष्णेने लोक व्याकुळ झाले, सरिता आटून गेल्या, कड्यांवरून उड्या टाकणारे दुधेरी जलप्रवाह दिसेनासे झाले, मेघ-वर्षावात चिंब होणारे पक्षी, इरले घेऊन काम करणारे शेतकरी, हिरवळीत स्वैर चरणारी गाईगुरे यांचे दर्शन घडण्याची चिन्हे दिसेनात म्हणून शेवटी कवी मेघाला आवर्जून विनवतो—

करी अमृतवृष्टि तू लवकरी धरित्रीवरी
तुझ्याविण कुणी नसे इतर जो अम्हा उद्धरी !

ग्रीष्माच्या उग्र तापाने वृक्षवेली विवर्ण होतात. प्रखर तापाने जीवन नकोसे होऊन जाते. शुष्क पृथ्वीवर वाहणाऱ्या सरितांचे ओघ कृश होतात व अशा समयास ग्रीष्माच्या दाहकतेला शांत करीत 'सजल श्याम घन' गर्जू लागतात. मृगाचे पहिले वहिले तुषार येतात. सारी सृष्टी चैतन्याने संजीवित होते. भकास झालेली राने, उदास-वाणे डोंगर कृतज्ञ होऊन मेघांच्या ललकाऱ्या ऐकू लागतात. कवी कुसुमाग्रजांची सालंकृत प्रतिभा गाऊ लागते –

जळक्या पिवळ्या माळावरती
पुलकित गंधित झाली माती
बिजे तृणांची गर्भामधुनी देत नवा हुंकार
आता जीवनमय संसार !

पहिल्या पावसामुळे सृष्टी आणि मनुष्य यांना होणाऱ्या आनंदाचे रम्य चित्र ग. दि. माडगूळकरांच्या 'मृग' या कवितेत पहावयास मिळते. त्यांच्या कवितेत झाडा-झुडुपांत भरारणारा रानवारा, वाऱ्यासारखा धावणारा खोंड, मृगाचे टपोरे थेंब पंखावर झेलणारे अवखळ बालकासारखे पक्षी, गावदेवीचा भिजून चिंब झालेला कळस, साचलेल्या पाण्यात नाचणारी बालके – या सर्वांचे सुंदर वर्णन आहे. मृगाच्या थेंबाची आईच्या दुधाशी व शिवाराची भुकेजलेल्या बालकाशी तुलना करून एक काव्यमय परिणाम त्यांनी साधला आहे.

माउलीच्या दुग्धापरी, आले मृगाचे तुषार
भुकेलेल्या तान्ह्यासम, तोंड पसरी शिवार !

विजेचे नर्तन, मेघांचे गर्जन व विशाल समृद्ध शेते संगे घेऊन येणाऱ्या 'अन्नपूर्णा' वर्षादेवीचे निकुंबांनी मुक्तकंठाने स्वागत केले आहे. हे स्वागत करताना वर्षेच्या उपेक्षेला आपण कवीच कारणीभूत झालो आहोत याचीही त्यांना अनुतापयुक्त जाणीव झालेली दिसते. वर्षेचे संजीवक पाचूचे वैभव, तिच्या रूपातून लाभणारी जीवनकलेची प्रतीती याबरोबरच तिच्या

अमृत धारांमुळे पृथ्वीला उदंड समृद्धी प्राप्त होणार आहे, असा आशावाद त्यांनी व्यक्त केला आहे.

वर्षाकाळात पर्वतावरून कोसळणारे अनेक पाझर पाहून कवी यशवंतांचे काव्यमय अंतःकरण उचंबळून येते आणि मग ते गाऊ लागतात –

**कोसळती हे अनेक पाझर कडेकपारींतुनी**
**की अवतरती धुर्जटीचिया जटेतुनी स्वर्धुनी !**

उत्प्रेक्षांचा साज लेवून येणारे हे सारेच पाझर आकर्षक आहेत.

मेघांचे आगमन, पाऊस आणि त्यानंतर सृष्टीला प्राप्त झालेली प्रसन्नता यांच्या दर्शनाने कवीला केव्हा आपल्या विषम मनःस्थितीची दुःखद जाणीव होते तर कधी आपल्या विपरीत परिस्थितीचा त्याला विषाद वाटतो. ह. स. गोखले आपल्या "पागोळ्या" या कवितेत म्हणतात–

**पागोळ्या पडती झराझर किती**
**या पांढऱ्या गोजिऱ्या**
**गेहाच्या निटिलावरी विलसल्या**
**मुंडावळ्या साजिऱ्या**
**आम्ही दीन दरिद्रतेसह जिथे**
**संकोचुनि राहतो**
**त्या गेहावरुनी प्रवाह रजता**
**आता तुझा वाहतो**

बाहेरच्या सृष्टीला आलेली शीतलता पाहून पुष्कळदा कविमनाला आपल्या अंतरंगांतील आगीची धग अधिकच जाणवते. शांता शेळके व्यथित होऊन म्हणतात.––

**जोराने नुकतीच ही सडसडा येऊन गेली सर**
**गेले पांगुनि मेघ धूसर दिसे आकाश**
**आता निळे...**
**माझ्याही हृदयात मेघ असले येती कधी दाटुनी**
**ऐसी गोड प्रसन्नता परि तिथे येई न का मागुनी?**

कवी गिरीशांना वर्षाकाळातील सुंदर हिरव्या माळाचे प्रसन्न व हसरे दर्शन झाले तरी शेतकऱ्यांच्या दुःखाची, त्यांच्या दारिद्र्याची तीव्र जाणीव होताना दिसते. वर्षाधारात सारी सृष्टी निवली, शांत झाली पण शेतकरी ?

**शेतकऱ्यांच्या पोटामधला**
**निवेल कधि पण जाळ ?**

अशा प्रकारे कविमनातील दुःख-विषादांच्या छटांनाही लाभलेले हे काव्यस्वरूप उल्लेखनीय वाटते.



वर्षेचे वर्णन करता करता कविमनात उमटलेल्या अनेक विचारतरंगांचे घडणारे हे दर्शन पाहून आपल्या वृत्ती सुखावतात.

आधुनिक मराठी कवितेतील पावसाळी सृष्टीची काही जिवंत बोलकी चित्रे अतीव हृद्य आहेत. बालकवींच्या 'पाऊस' या छोट्या कवितेत पावसाच्या एका लहानशा सरीचे चित्रात्मक वर्णन आहे.

**थबथबली ओथंबुनि खाली आली**
**जलदाली मज दिसली सायंकाळी !**

या कवितेत सायंकाळी क्षितिजावर टेकलेल्या जलार्द्र आणि चित्रविचित्र रंगांच्या मेघांचे वर्णन आहे. आजुबाजूला कोणी नाही असे पाहून वारा हळूच त्या जलदेवतेच्या अनेक रंगी कोठारात प्रवेश करतो आणि त्या कोठारातली जलबिंदूंची सुंदर मोत्ये पृथ्वीवर हलुवारपणे ओतून देतो. मग जलमोत्यांची बरसात होते तीही हलुवारच. हे सारेच वातावरण कोमल आहे. पावसाच्या या सरीचा शब्दमय प्रत्यय घेताना मेघातल्या रंगांशी व बालकवींच्या शब्दकलेतल्या सुभग सौंदर्याशी एकरूप झाल्यासारखे वाटते.

'जलद भरुनि आले' ही कवी बा. भ. बोरकर यांची कविता म्हणजे वर्षाकाळातील एका सायंकाळचे शब्दचित्र आहे. तथापि केवळ सायंकाळ झाल्याचे सांगावे एवढाच कवीचा हेतू नाही. सायंकाळच्या निमित्ताने निसर्गात जी रमणीय दृश्ये पाहावयास मिळतात त्यांना या कवितेत कवीने मूर्तस्वरूप दिले आहे. मावळता सूर्य, तांबडीलाल झालेली पश्चिम दिशा, पद्मरागवृष्टीने न्हालेले माडाचे उंच वृक्ष, हसणाऱ्या धुंद दिशा, नदीच्या काठावरील हिरवळ, भरारणारे पांढरे शुभ्र पक्षी, 'जलवल्यात चमकणारे मीन', गवत विसरुन आकाशावर स्थिरदृष्टीने पाहणारी गाईगुरे, आकाशातून कोसळलेली पावसाची सर आणि त्या टपटपत्या जलबिंदूंनी भिजलेल्या मातीचा वास––या सर्व वर्णनांचा एक संकलित परिणाम आपल्या मनावर होतो व या कवितेत चित्रित केलेली सायंकाळ आपण डोळ्यांनी प्रत्यक्ष पाहत आहोत असे वाटू लागते. पावसामुळे सृष्टीला लाभलेल्या समाधानाचे व शांतीचे वर्णन करताना बोरकर म्हणतात —

**टप टप टप पडति थेंब**
**मनिवनिचे विझति डोंब**
**वत्सल ये वास, भूमि आशीर्वच बोले !**





पावसाळी सृष्टीच्या प्रारंभकाळातली ही सारीच वर्णने चित्रमय आहेत. बहुतेक सर्वच कवितांत मातीच्या उन्मादक सुवासाचे, तिला प्राप्त झालेल्या नवीन हिरव्या रूपाचे आल्हादक वर्णन आहे. कविमनाच्या रसिक सौंदर्यदृष्टीचरोबरच तृप्त भाववृत्तीचाही येथे मधुर आविष्कार झालेला दिसतो—

**चर चरातिल हिरवी माया**
**बघतो, टिपतो, घेतो चुंबन**
**चिंब जाहल्या वसुंधरेचे**
**रूप मनोहर घेतो प्राशुन**

मृगाकडून आपण आषाढ–श्रावणातल्या पावसाळी जगाकडे वळलो की हे सृष्टीचे रूप अधिकच गहिरे होते, रंगही अधिक गर्द होऊ लागतात. आषाढ–घनाच्या फुलकोपातून गर्भ रेशमी वीज, निखळू लागते. मेघांची वृष्टी होऊ लागते. फुलाफुलांचे वैभव घेऊन श्रावण येतो. सोनचाफ्याच्या फुलाफुलांवर सोनेरी रंग नाचू लागतात. पारिजातकाच्या माणिकमोत्यांच्या बरसातीतून श्रावणाचे हसू फुलू लागते. क्षणात येणारा आणि थांबणारा पाऊस, अश्रूंतून हास्य उमलावे त्याप्रमाणे पावसात पडणारे ऊन, ढगाढगात चाललेली रंगपंचमी असा हा श्रावणाचा बहर. 'रंगाचे गुच्छ' घेऊन येणारा व 'ऊनपावसाचे पक्षी' आपल्या ओंजळीतून आणणारा हा श्रावण! कविवर्य बा. सी. मर्ढेकर यांनी केलेले आषाढ–श्रावणाचे वर्णन वैशिष्ट्यपूर्ण आहे. काळ्या ढेकळांचा कळ्यांत भरलेला गंध, ओल्या कौलारांतून लाली हुंगणारे मेघ, ओल्या पानांतल्या रेषा वाचणारे ओले पक्षी, पोपटी रंगाची नक्षी दाखविणारे रान या सर्वांचे वर्णन करून मर्ढेकर म्हणतात—

**ओशाळला येथे यम, वीज ओशाळली थोडी**
**धावणाऱ्या क्षणालाही आली ओलसर गोडी**
**मनी तापलेल्या तारा, जरा निवतात संथ**
**येतो आषाढ श्रावण, निवतात दिशापंथ**

बालकवींची 'श्रावणमास' ही कविता श्रावणाचे सारे वातावरणच आपल्या डोळ्यांपुढे उभे करते.

**श्रावणमासी हर्ष मानसी हिरवळ दाटे चोहिकडे**
**क्षणात येते सरसर शिरवे क्षणात फिरुनी ऊन पडे**

श्रावण महिन्यात दिसणारी हिरवळ, आणि सौंदर्य-दर्शनाने कवीच्या मनात दाटलेली हर्षाची हिरवळ या दोहोंचे दर्शन येथे घडते. एखादी सर येते न येते तोच ऊन पडते. त्या वेळी आकाशात इंद्रधनुष्याचा दुहेरी गोफ पाहून जणू कोणीतरी आकाशास तोरणच बांधले आहे की काय असे वाटते. ढगांवर अनेक प्रकारचे रंग दिसू लागतात. त्या वेळी आकाशात संचार करणारी बलाक-माला तर 'कल्पसुमांची माळ'च वाटते. किंवा धरेवर तिच्या रूपाने ग्रहगोल तर उतरले नाहीत ना असे वाटते. वृक्षवेलींना बहर येतो, सुंदर बाला फुले वेचतात-स्त्रिया प्रसन्न वदनाने देवदर्शनास जातात. त्यांच्या चेहऱ्या-वर श्रावण महिन्याचे गीतच लिहिलेले असते. श्रावणाचे इतके सुंदर आणि चित्रात्मक वर्णन इतरत्र क्वचितच वाचावयास मिळते. बालकवींनी लावण्यराज श्रावणास अमर करून टाकले आहे.

वर्षा आणि प्रणयभावना यांचे अगदी जवळचे नाते आहे. इंद्रधनूची माला हातांत घेऊन येणाऱ्या वर्षेच्या आगमनाने सुखी जोडप्यातसुद्धा एक मधुर आकुलता निर्माण होते. इंद्रनीलमण्याला लाजविणारा, पर्वताला आलिंगन देणारा निळासावळा मेघ पाहिल्यावर कवि-कुलगुरूचे अंतःकरण उचंबळून आले आणि विरही भावनेचे कातर चित्र त्याने रेखाटले. सर्व ऋतूंत 'वर्षर्तूच मला पसंत' असे म्हणणाऱ्या नायकाच्या विरही भावनेचे रम्य चित्र माधव जूलियनांनी 'विरहतरंगा'त रेखाटले तेही वर्षेच्या पार्श्वभूमीवर अधिक उठून दिसते. वर्षेच्या सुंदर नवरूपाने ज्याच्या हृदयात प्रेमाची गोड भावना झंकारली नाही, असा कुणी तरी असेल काय? वर्षासुंदरीच्या बाहेर वाजणाऱ्या झिमझिम पावलांचा नाद आणि घरात जीव-सखीच्या पायांतील पैंजणाचा होणारा रिमझिम असा नाद – या नादब्रह्मात देहभान विसरणारा प्रेमिक कवि-वर्य चिंधडे यांच्या कवितेत पहावयास मिळतो –

**सकाळपासुन आज सखी हा**
**पाउस करतो झिमझिम झिमझिम**
**आणि आत पायांतिल तुझिया**
**पैंजण करिती रिमझिम रिमझिम!**

वर्षागमनी ढगावर ढग ओथंबून आले आहेत त्यामुळे अंधारून आले आहे. उन्मादक शीत वारा भरारतो आहे, धरणी सुगंधित झाली आहे. वेळू वनांत मयूरांचा टाहो ऐकू येत आहे, मेघांचा मंद्र घोष होत आहे, सरितापृष्ठा-वर लाख लाख तरंग उमटले आहेत, अशा वेळी सखीच्या नेत्रांत कोणत्या तरी आर्द्र स्मृतीच्या मेघांनी गर्दी केली आहे. शरच्चंद्र मुक्तिबोध यांच्या 'वर्षागम' या कवितेतील प्रेमिक म्हणतो –

तुझ्या विशालशा नेत्री डंवरले नील घन
कोणत्या ग आर्द्र स्मृती पुसटती डोकावून?

ना. घ. देशपांडे यांच्या 'पावसाळा' या कवितेत पावसाळी सृष्टीबरोबरच प्रेमिकाच्या जीवनातील साफल्याचे आणि प्रसन्नतेचे हृदयंगम वर्णन आहे. पावसाळा सुरू झाला, भोवतीची रानेवने पावसाने चिंब झाली, पानापानांतून थेंबांच्या सरी नाचू लागल्या, दूरशा शेतांत पिकांची लावणी चालू झाली. पावसाचे पाणी पिऊन त्यावर पोसलेल्या पिकांतून धान्य आपल्या घरी यायचे तेव्हा येवो पण त्या आधीच आपल्या घरात आलेले प्रीतीचे पीक पाहून आणि त्या प्रेमसाफल्यात सखीची वर्षणारी पावसाळी लोचने पाहून आनंदाने गाणाऱ्या प्रेमिकाचे चित्र देशपांडे यांनी फारच बहारदारपणे चितारले आहे.

यायचे येवो कधींही धान्य शेतीचे घरी
हे बघा आधीच आले पीक प्रीतीचे घरी!

प्रियकराने आपणांस एकटेच टाकून जाऊ नये म्हणून विनविणारी आणि श्रावणातल्या 'त्या राती'ची शपथ घालणारी नायिका माडगूळकरांनी 'शपथ' या कवितेत रंगवली आहे. श्रावणातली पावसाची धारा व तीबरोबर झिम्मा फुगडी खेळणारा वारा आणि प्रियकरासमवेत तृप्तीच्या आसवांत रममाण होणारी नायिका यांचे उन्मादक आणि प्रत्ययकारी वर्णन या कवितेत आहे. शेवटी तृप्तता पावलेली नायिका विनवते –

नको पेटवू विरहाने हा सौख्याचा बंगला
श्रावणातल्या त्या रातीची शपथ घालिते तुला

शेतात रोप-लावणीचे काम चालू असताना जिवलगाची मार्गप्रतीक्षा करणारी आणि त्याची भेट होताच लज्जेने थरथरणारी नायिका मायदेवांनी 'इरलेवाली' या कवितेत रंगवली आहे तर माळराने भिजवून टाकणाऱ्या व पारिजातकाची दैना करणाऱ्या पावसामुळे अनिलांची नायिका निराश झाली आहे. प्रियकराच्या विरहाने एक प्रकारची हळवी उदासीनता तिच्या मनाला व्यापूना राहते व मग ती भावाकुलतेने साद घालते –

जिवलग कोठे बाई – पडे अडकून
नच पडे चैन
बाई या पावसानं – लावियली झिमझीम

प्रिय व्यक्तीच्या स्मृतीने वर्षाकाळात झुरणारी आणि एकाकी जीवन कंठणारी नायिका इंदिरा संतांच्या 'झंझावात' या कवितेत पहावयास मिळते. कुंद गारठा, कौलावरती झिमझिमणारा नाजुक पाऊस यांचे तरल वर्णन या कवितेत आहे. वर्षेच्या मधुर गाण्यात तन्मय होऊन नायिका भूतकाळ आठवू लागते. तिला आठवते- पाझरणारी घागर घेऊन लाजत उभी असणारी गौळण धरणी आपण न्याहाळली होती, उनी कोट अंगाशी लपेटून पावसाची मजा पहात, चहाची चव घेत, सैगलचे गाणे ऐकत, सिगरेटच्या वलयांतून वितरणारा सुकुमार दर्प अनुभवीत आपण वर्षेच्या सुखसहवासात काही क्षण अमर केले होते. पण आज? सुखदुःखात साथ करणारी ती व्यक्तीच तिला सोडून गेली आहे. आर्त व्याकुळतेने, त्या चिरविरहाने नायिकेचे मन रडत आहे. या स्मृति-स्वप्नातून ती दचकून उठते अन् तिला वाटू लागते –

हा पिसाटापरी धावत वारा ओला
खळ दुःशासन की झोंबतसे अंगाला
भयभीत बिचारी गुरेपाखरे पळती
त्या पाचोळ्याची कुणास ठावे नियती ...
... ते पहात तांडव उभी राहते येथ
दडपून मनातिल मनात झंझावात!

आजच्या नवकवींनाही वर्षेचे विशेष आकर्षण आहे. सदानंद रेगे यांच्या कवितेत वर्षाकालातील ढगाळलेल्या सृष्टीला आगळेच स्थान आहे. आकाश भरून आले, पागोळ्या झरू लागल्या, रस्त्यात पाणीच पाणी झाले, त्यात रस्त्यावरील दीपांच्या प्रकाशाची टिंबे दिसू लागली की रेग्यांच्या भावाकुल प्रतिभेला आवाहन मिळते. शब्दार्थांच्या कलात्मक संवादितातून एका वेगळ्याच प्रतिमासृष्टीला ते समूर्त करतात. 'पाऊसपक्षा'चे रेग्यांनी काढलेले नाजुक रेखाचित्र असेच वेधक आहे.

रेगे यांच्याप्रमाणेच मंगेश पाडगावकरांनीही वर्षेचे सूक्ष्म तरल सौंदर्य मधुरतेने व अर्थपूर्ण रीतीने शब्दांकित केले आहे. त्यांच्या कवितेत बालकवीप्रमाणेच निसर्ग हा खऱ्या-खुऱ्या अर्थाने सजीव होतो. निसर्गचित्रे रेखाटताना ते शब्दांची जुळणी अशा रीतीने करतात की सौंदर्य सहज रीतीने भावस्वरूप होते. निसर्गाच्या रंगाच्या, रूपाच्या व गंधाच्या विविध छटांतून लपलेले सौंदर्य ते चित्ररूप करतात. पाडगावकरांच्या वर्षावर्णनात एक प्रकारचा ताजेपणा आहे.

रिमझिम रिमझिम ये सरिवर सर
गिरिदरि सागर स्वप्निल निळसर
निळ्या लयींतुन आजकालचे
हसले क्षितिज उदास!

अणुयुगातील मानव निसर्गावर प्रेम करीतच आहे. पण त्याच्या या प्रेमात एक नवी वैज्ञानिक व आर्थिक

दृष्टीही येऊ लागली आहे. याचे प्रत्यंतर आजच्या नव-काव्यात आपणांस येते. उदाहरणार्थ कोयनेवरील कविता.

— अशी ही पावसाळी सृष्टी! मराठी कवींनी प्रथमतः ती निव्वळ चित्ररूप केली. नंतर ती चित्रे अधिक बोलकी झाली. त्यांचा कविमनाशी संबंध येऊ लागला आणि कविमनाचा विश्वजीवनातील बदलत्या संघर्षांशी जसा अधिक संबंध येऊ लागला तसा पावसाळी वातावरणाच्या अभिव्यक्तीतही फरक दिसू लागला. वसंताला ऋतुराज म्हणतात हे जर खरे असेल तर या सुंदर 'वर्षर्तु'ला आपण ऋतुसम्राटच म्हटले पाहिजे. होय ना! ★

श्रीपाद शंकर नवरे

# ग्रंथमालाकार : प्रो. विष्णु गोविंद विजापूरकर

**महाराष्ट्रातील निरनिराळ्या सार्वजनिक क्षेत्रांत कर्तृत्व गाजविणाऱ्या कितीतरी पुरुषांची जन्म-शताब्दी साजरी करण्याचा काळ सध्या आलेला आहे. प्रो. विष्णु गोविंद विजापूरकर यांच्या शताब्दीचे १९६३ हे वर्ष.** ते कोल्हापुरात जन्मले आणि वाढले. कोल्हापूरच्या राजाराम महाविद्यालयात त्यांनी १८९० पासून १९०४ पर्यंत संस्कृतच्या अध्यापनाचे काम केले. पण विजापूरकरांना महाराष्ट्र ओळखीत आलेला आहे, तो मुख्यतः राष्ट्रीय शिक्षणाचे आद्य पुरस्कर्ते म्हणून. राजाराम कॉलेजातील विद्यार्थ्यांनी प्रिलिमिनरी परीक्षेचे कागद स्वदेशी असावेत अशी मागणी केली. विजापूरकरांच्या एकंदर राष्ट्रीय प्रवृत्तीवरून विद्यार्थ्यांच्या या मागणीमागे विजापूरकरांची चिथावणी असली पाहिजे असे गृहीत धरून चौकशी न करता, कोल्हापूर संस्थानने १९०५ साली विजापूरकरांना प्राध्यापकपदावरून बडतर्फ केले. त्यानंतर विजापूरकरांनी आपल्या मनात घोळणाऱ्या राष्ट्रीय शिक्षणाच्या कल्पनेला मूर्तस्वरूप देण्यासाठी ता. १ जून १९०६ रोजी 'समर्थ विद्यालय' नावाची शाळा कोल्हापुरासच काढली आणि सुमारे दीड वर्षाने पुण्याजवळ तळेगाव दाभाडे येथे तिचे स्थलांतर केले. ता. १० जून १९१० रोजी ब्रिटिश सरकारने समितीच्या कायद्यान्वये ती बंद करायला लावली!

अण्णांना साहित्यिक किंवा साहित्यसेवक मर्यादित अर्थाने म्हणता आले तरी मुख्यतः त्यांनी मराठी भाषेच्या सेवेला फार मोठा हातभार लावलेला आहे हे नाकारता येणार नाही. 'मातृभाषेतून शिक्षण' या मुख्य तत्त्वावर त्यांच्या राष्ट्रीय शिक्षणाची कल्पना उभारलेली होती.

**प्रधानत्व पावे जिथे आंग्लभाषा।**
**जिथे मेळवी अर्धचंद्र स्वभाषा॥**
**.........................................**
**स्वभाषेतुनी शिक्षणा दीधल्याने।**
**कसे ज्ञान होते कळे पाहिल्याने॥**

इ० श्लोकांतून त्यांनी आपल्या राष्ट्रीय शिक्षणाच्या कल्पना प्रकट केलेल्या आहेत. शिक्षणात किंवा राज्यकारभारात मातृभाषांना कसलेच स्थान नव्हते, असा तो पारतंत्र्याचा काळ होता. उच्च शिक्षणाचे संपूर्ण माध्यम म्हणून मातृभाषांचे स्थान अजूनही प्रस्थापित झालेले नसले तरी शिक्षणात, विशेषतः प्रादेशिक विद्यापीठात, आणि राज्यकारभारात, मातृभाषांना मानाचे स्थान मिळत चालले म्हणजे भाषांची अभिवृद्धी सर्वांगांनी किती झपाट्याने होत जाते त्याचा प्रत्यक्ष अनुभव गेल्या १०–१५ वर्षांत आपण उत्तरोत्तर घेत आलेलो आहोत. मातृभाषेच्या शिक्षणावर व माध्यमावर अण्णा इतका जोर का देत होते त्याचे कारण आज प्रत्यक्ष अनुभवाने समजणे सोपे झाले आहे.

१९०२ साली हिंदुस्थान सरकारने नेमलेल्या युनिव्हर्सिटी कमिशनसंबंधी 'ग्रंथमाले'मध्ये संपादकीय विचार प्रदर्शित करताना विजापूरकरांनी तीन महत्त्वाच्या सूचना केलेल्या होत्या : (१) विद्यापीठाच्या विद्यार्थ्यांत आश्रमसंकर न व्हावा, म्हणजे सर्व विद्यार्थी ब्रह्मचर्याश्रम पाळणारे असावे. गृहस्थाश्रमी विद्यार्थ्यांकडून व्हावे तसे विद्यार्जन होत नाही. (२) विद्यापीठे जनसंमर्दापासून दूर असावी. (३) अध्ययनाध्यापनाची भाषा देशी असावी.

मराठी वाङ्मयाच्या अभिवृद्धीसाठी चाललेल्या प्रयत्नांच्या प्राथमिक अवस्थेमध्ये अन्य भाषांतील, विशेषतः इंग्रजी आणि संस्कृत भाषांतील, ज्ञान मराठीमध्ये आणण्यावर मोठमोठ्या लेखकांचे देखील लक्ष केंद्रित झालेले होते हे सर्वांना माहीत आहे. या प्रयत्नात विजापूरकरांचा वाटा फार मोठा आहे. "हिंदुस्थान देशास कधीतरी चांगले दिवस येणार असतील तर ते येथील लोक अज्ञानांत राहून खचित येणार नाहीत. त्यांच्यात सत्य ज्ञानाचा प्रसार होऊन त्यांची वेडगळ समजुतीपासून सुटका झाली पाहिजे." हे 'लोकहितवादी' प्रभृतींचे सूत्र हाती घेऊन अण्णांनी, एकीकडे संस्कृतच्या अध्यापनाचे काम चालू असतानाच, १८९४

अनुक्रमणिका

साली त्याच हेतूच्या सिद्धीसाठी 'ग्रंथमाला' काढली. व ती अव्याहत बारा वर्षे चालविली. या कामी सात वर्षे त्यांना कोल्हापूरचा राजाश्रयही मिळाला होता. (कोल्हापूर दरबार 'ग्रंथमाले'च्या १०० प्रती विकत घेऊन त्या संस्थानातील प्रमुख शिक्षकांना वाटीत असे.). संशय पिशाचिकेने पछाडलेल्या कोल्हापूर दरबारने नंतर आपला हात एकदम आखडून घेतल्यावरही पाच वर्षे अण्णांची ही भाषासेवा आणि ज्ञानोपासना चालूच राहिली.

'ग्रंथमाला' मासिक सुरू करताना अण्णांच्या डोळ्यांसमोर चिपळूणकरांची 'निबंधमाला' होती हे अगदी निर्विवाद होय. फरक इतकाच की पत्रव्यवहार सोडला तर निबंधमालेतील बहुतेक लिखाण स्वतः संपादकांचे, म्हणजे विष्णुशास्त्र्यांचे, होते. ग्रंथमालेचे द्वार तिच्या नावाप्रमाणे सर्व लेखकांना खुले होते. किंबहुना "बहूनामाप्यसाराणां समवायो हि दुष्करः। तृणैरावेष्ट्यते रज्जुर्यया नागोऽपि बध्यते॥" या ग्रंथमालेच्या प्रत्येक अंकाच्या मुखपृष्ठावर मुद्रित केलेल्या श्लोकाला अनुलक्षून नवशिक्षित पदवीधर लेखकांचा 'समवाय' निर्माण करणे, हा हेतू विजापूरकरांच्या डोळ्यांसमोर स्पष्ट होता; "आमचा कटाक्ष पदवीधर मंडळीवर विशेष आहे. त्यांच्या शिक्षणाचा फायदा लोकांस मिळाला पाहिजे. त्यांच्यावर लोकांचा हक्क आहे...प्रत्येकाने आपले काहीतरी गंभीर वाचन दिवसाचे एक तासभर का होईना ठेविले पाहिजे व फार नाही तरी वर्षाच्या काठी एक दोन निबंध–सुमारे ३०–४० पृष्ठे–लिहिली पाहिजेत. अशानेच मोठे मोठे ग्रंथ लिहिण्याची स्फूर्ती होईल" असे अण्णा लिहितात. यात उल्लेखिलेल्या 'गंभीर वाचना' वर त्यांचा विशेष कटाक्ष होता, हेही ध्यानात ठेवणे जरूर आहे—"प्रथमपासूनच आमच्या मासिकाचे धोरण ते मनोरंजक किंवा हृदयंगम करण्याचे ठेविले नाही. कल्पित गोष्टी, काव्ये कादंबऱ्या, नाटके, चुटके, वगैरे करमणूक व शिक्षण या जोडीची जोड वाचकांस ग्रंथमालेच्या द्वारे व्हावयाची नाही. गंभीरपणे विचार करण्याजोगे लेख यावेत अशी योजना जाणूनबुजून केलेली आहे.....कोणत्याही राष्ट्राचा उत्कर्ष व्हावयाचा असल्यास त्या राष्ट्रात विद्याव्यासंगी व विचारशील लोकांची संख्या अधिक झाली पाहिजे."

'गंभीर' विषयांना वाहिलेल्या मासिकांची आर्थिक दुर्दशा आजही जेथे पदोपदी अनुभवाला येते तेथे साठ वर्षापूर्वी तिचे उग्र दर्शन किती पटींनी होत असेल त्याची कल्पना करणे अवघड नाही. वार्षिक सहा रुपये वर्गणीमध्ये दरमहा १७२ पृष्ठे देणाऱ्या या मासिकाची ग्राहक संख्या आठ वर्षांनी देखील ६९० पलीकडे कधीच जाऊ शकली नाही. त्यातून कोल्हापूर दरबार घेत असलेल्या १०० प्रती एकदम कमी झाल्यावर आधीच्या उल्हासात फाल्गुन मास साजरा करण्याची पाळी यावी यात आश्चर्य कसले? जाहिरातींचे उत्पन्न शून्यावर कधीच चढले नाही. लेखकांना मोबदला म्हणून दरसाल बाजूस काढून ठेवण्यात येणाऱ्या १२०० रु. पैकी 'एक कवडी देखील' त्यांच्या पदरात पडण्याचा योग कधी आला नाही. उलट स्वतः विजापूरकरांचा अत्यंत मर्यादित खिसा मात्र उत्तरोत्तर रिता होत चालला. तरीही—

स्वदेश–स्वधर्म–स्वभाषादिकांचा।
जगी मान व्हावा असा हेतु साचा॥

हा आपण मनात योजलेला हेतू अल्पांशाने का होईना सिद्धीस गेला, याबद्दल समारोपाच्या लेखात त्यांनी समाधान व्यक्त केले आहे!

पुढे प्रसिद्धीस आलेल्या कित्येक मराठी लेखकांनी आपल्या साहित्यसेवेचा ओनामा विजापूरकरांच्या ग्रंथमालेतून गिरविलेला आहे, किंवा विजापूरकरांनी त्यांना लेखणी घेण्यास उद्युक्त केले, असे म्हटले तरी चालेल. म्हणून ग्रंथमालेच्या जमेच्या बाजूचा विचार करताना 'नवीन लेखकांना खेचून बाहेर आणून उत्तेजन देणे' ही महत्त्वाची बाब हिशोबात घेणे जरूर आहे. एका तपाच्या आयुर्मर्यादेत 'ग्रंथमालेतून' सुमारे २५ हजार पृष्ठांचा मजकूर प्रसिद्ध झाला. अंकाच्या प्रारंभी 'सार संग्रह' शीर्षकाखाली प्रचलित विषयावर संपादकीय स्फुटे चालू राजकारण वगळून शैक्षणिक, आर्थिक, सामाजिक, राजनैतिक, वाङ्मयीन विषयांचा त्यांत निर्भीडपणे परामर्श घेण्यात येत असे. नवीन ग्रंथांचा स्वतः संपादकांकडून किंवा बाहेरच्या लेखकांकडून परिचय करून देण्यात येत असे. पण त्याला 'परीक्षण' असे न म्हणता 'निरीक्षण' असे म्हणण्यात येत असे. गंभीरपणाला कधी कधी कळत किंवा नकळत विनोदी स्वरूप आल्याचेही दाखले आहेत. 'केरळ कोकिळ' मासिकाचे संपादक श्री. कृष्णाजी नारायण आठल्ये यांनी स्वामी विवेकानंदांच्या काही व्याख्यानांचे इंग्रजीतून मराठीमध्ये भाषांतर करून त्याची पुस्तके विकली. मूळ न समजल्यामुळे हे भाषांतर अत्यंत गचाळ झालेले होते. पण तसे सरळ न म्हणता 'सेशन जज्ज ग्रंथमालाकार आणि मालेचे

इंग्रजी जाणणारे वाचक यांच्या ज्यूरीसमोर' फिर्यादी 'मराठी वाङ्मया'ने 'केरळ कोकिळ'चे एडिटर व जनार्दन महादेव गुर्जर (प्रकाशक) यांच्यावर (१) सदोष विचारवध करणे व (२) ठकबाजी करणे या दोन आरोपांवरून खटला भरला त्याच्या साद्यंत सुनावणीचे वृत्त ग्रंथमालेत आलेले आहे. मूळ विचारांचा गचाळ भाषांतराने विपर्यास केला हा 'सदोष विचारवध' व लेखकाला इंग्रजी बेताबाताचे येत असताना ती पुस्तके त्याने विक्रीस ठेवली ही वाचकांशी त्याने केलेली ठकबाजी!! अशी वाईट पुस्तके बाजारात खपू लागली तर पुस्तकांवरील लोकांचा विश्वास उडून चांगल्या लेखकांची चांगली पुस्तकें देखील बाजारात खपेनाशी होतील, असे फिर्यादी 'मराठी वाङ्मया'ने गुन्ह्याचे गंभीर स्वरूप कोर्टाला पटवून दिले. अर्थात साक्षीपुरावा सादर करताना गचाळ व विपर्यस्त भाषांतराचे पुष्कळ नमुने फिर्यादीतर्फे कोर्टापुढे सादर करण्यात आले. शेवटी दोन्ही आरोपींना गुन्हेगार ठरविण्यात जज्ज आणि ज्यूरी यांचे एकमत झाले हे सांगायला नकोच! पण असले विनोदी लिखाण म्हणजे अगदी दुर्मिळ अपवाद!

ग्रंथमालेमध्ये सर्वच 'ग्रंथ' येत असे समजण्याचे कारण नाही, एक आणा किंमतीच्या लहान लहान पुस्तिकेमध्ये सामावतील अशा दीर्घ लेखापासून अडीच-तीन रुपयांपर्यंत ग्रंथांची प्रकरणशः प्रसिद्धी झाल्या. नंतर "ग्रंथमाला मासिक पुस्तकात छापलेले प्रकरण" या एकाच छापाखाली त्या लेखांची किंवा प्रकरणांची स्वतंत्र पुस्तके छापण्यात येत. यांपैकी आपणांस रुचतील व पचतील अशा विषयांची स्वतंत्र पुस्तके प्रसिद्ध होणारच आहेत; ती झाल्यावर तीच विकत घेऊ; सर्व लोढणे गळ्यात कशाला!" अशा विचारानेही ग्रंथ-मालेचा ग्राहक वर्ग विशिष्ट मर्यादेपलीकडे गेला नसावा. ग्रंथमालेतील लेखांची स्वतंत्र पुस्तके व्हावयाची असल्या-मुळे प्रत्येक अंकातील पृष्ठांचे क्रमांक स्वतंत्र पुस्तकाचा हेतू मनात ठेवून निरनिराळे देण्यात येत असत. भाषांतर, रूपांतर आधारभूत ग्रंथांवरून सारभूत विवेचन, संकलन अशा विविध नमुन्यांच्या लेखमाला ग्रंथ-मालेत येऊन गेलेल्या आहेत. 'शाहू' शब्दासारख्या काही शब्दांच्या व्युत्पत्तीची लांबलचक चिकित्सा येऊन गेलेली आहे. इतिहाससंशोधक विश्वनाथ काशीनाथ राजवाडे यांच्या 'मराठ्यांच्या इतिहासाची साधने' या मालेचे चार खंड ग्रंथमालेतूनच प्रथम क्रमशः प्रसिद्ध झाले. ऐतिहासिक चर्चा, शास्त्रीय टीपा आणि उतारे विज्ञानाचे चमत्कार, आर्यांचे मूलस्थान, कलियुगातील क्षत्रिय-वैश्यांचे अस्तित्व, विद्यारण्य आणि ज्ञानेश्वर यांच्या वेदान्तावरील मतांची तुलना, इंग्रजी कायदा आणि राजनीती, पाश्चात्त्य राष्ट्रांची सामाजिक उत्क्रांती, स्त्रियांचे उच्च शिक्षण आणि संततीचा नाश, युरोपीय इतिहासाचे इतिवृत्त, बालोद्यान शिक्षण पद्धती, प्रशि-याचा अभ्युदय, एडमंड बर्क, ग्लॅडस्टन, रोजबेरी, इ० आंग्ल राजनीतिज्ञांचे सविस्तर परिचय, मोडकळीस आलेली खेडी व ती सुसंपन्न करण्याचे प्रयत्न, चलन पद्धती, पैसा आणि विनिमयाची साधने, प्रवासवर्णने, वऱ्हाडातील कापूस, कीटकसृष्टी, दुष्काळ, ज्योतिः-शास्त्र, मानवाश्रित प्राणी, गृहस्थाश्रम, शेती, बागाईत, हिंदुधर्मशास्त्र, इंग्लंडचा इतिहास, महाराष्ट्राचा इतिहास, आमची घरे, हक्सलेचे निबंध, स्पेन्सरचे तत्त्वज्ञान, विवेकानंदांची व्याख्याने, व्यापारी शिक्षण, संस्कृत भाषेची विचिकित्सा, मराठी भाषेचे स्वरूप, जगातील क्रांतिकारक लढाया, वेद, वेदान्त, रामायण, महा-भारत, महाराष्ट्र धर्म, रामदास, दासोपंत, वामन पंडित, वाचन, धम्मपद, असे एक की दोन, शेकडो विषय, नवीन चिकित्सक पद्धतीने लिहिलेले, ग्रंथमालेत विस्ताराने आलेले आहेत, त्यांवर प्रसंगोपात्त चर्चा झालेली आहे. सरदार माधवराव किबे, नारायण कृष्ण आगाशे, ना. गो. चापेकर, जनार्दन सखाराम करंदीकर, गणेश कृष्ण आगाशे, केशव रामचंद्र छापखाने, गोपाळ रामचंद्र तांबे, बाळशास्त्री हुपरीकर, यादव शंकर वावीकर, नरहर बाळकृष्ण जोशी, शिवराम हरी गोखले, हरी रामचंद्र पिटके, सखाराम गणेश देऊसकर, त्र्यंबक गुरुनाथ काळे, नारायण रंगनाथ आलेकर, रामचंद्र विनायक टिकेकर (धनुर्धारी), नारायण लक्ष्मण फडके, गणेश बळवंत मोडक, बाळकृष्ण नारायण देव, रावजी रामचंद्र काळे इ० चालू शतकाच्या प्रारंभी उदयास आलेल्या लेखकांचे पहिले सर्व लिखाण विजापूरकरांच्या ग्रंथमालेतून प्रसिद्ध झालेले आहे. न्याय० रानडे यांच्या 'मराठ्यांच्या सत्तेचा उत्कर्ष'या सुप्रसिद्ध इंग्रजी ग्रंथाचे मराठी भाषांतर याच मालेतून प्रसिद्ध झाले. विसुभाऊ राजवाडे आणि अण्णासाहेब विजापूरकर यांच्या स्वभावात व दुसऱ्याशी वागण्याच्या पद्धतीत जमीन-अस्मानाइतके अंतर असले तरी दोघांचा स्वदेशाभिमान आणि स्वभाषाभिमान अत्यंत कडकडीत असल्यामुळे

कोल्हापुरात एकदा त्यांचा जमलेला स्नेह शेवट-पर्यंत कायम राहिला, 'समर्थ विद्यालय' बंद झाल्यावर दोघांनी तळेगावास एकत्र राहून एकमेकांची सुखदुःखे भोगली !

ग्रंथमालेच्या वरील एकंदर वर्णनावरून विजापूर-करांच्या साहित्यसेवेची चांगली कल्पना येईल. याखेरीज विजापूरकरांनी श्रीसमर्थ नावाचे साप्ताहिक १८९८ पासून नऊ वर्षे आणि 'विश्ववृत्त' नावाचे दुसरे मासिक एप्रिल १९०६ पासून १९०९ मध्ये राजद्रोहाचा खटला होऊन ते बंद पडेपर्यंत चालविले.' विश्ववृत्ता 'चे संपादक म्हणून श्री. वामन मल्हार जोशी हे प्रत्यक्ष काम पहात होते. पण पं. सातवळेकर यांच्या एका लेखावरून या मासिकावर राजद्रोहाचा खटला होऊन त्यात संपादक वामनराव जोशी व मुद्रक-प्रकाशक विजापूरकर या दोघांना कारावासाची शिक्षा झाली ! १९११ च्या अखेरीस प्रो. विजापूरकर साबरमतीच्या तुरुंगातून, बाहेर पडल्यावर सरकारने बंद केलेल्या 'समर्थ विद्यालया'च्या पुनरुज्जीवनाच्या खटपटीला लागले आणि त्यांची साहित्यसेवा एकदा मागे पडली ती कायमची ! 'आधारः सर्व चेष्टानां राष्ट्रीयं लोक-शिक्षणम्' असा त्यांच्या मनाचा पक्का निश्चय झालेला असल्यामुळे त्यापुढे इतर सर्व कार्ये ते गौण समजत.

# साहित्य-समीक्षा

## डॉ. शं. दा. पेंडसे गौरव-ग्रंथ

डॉ. पेंडसे यांच्या अध्ययन-अध्यापनाच्या क्षेत्रातील तपाचा गौरव करण्यासाठी त्यांच्या चाहत्यांनी आणि विद्यार्थ्यांनी प्रातिनिधिक स्वरूपात त्यांना अर्पण केलेली ज्ञान-पुष्पे प्रस्तुत ग्रंथात ग्रथित केली आहेत. डॉ. पेंडसे हे मराठी संतसाहित्याचे आणि महाराष्ट्राच्या सांस्कृतिक इतिहासाचे साक्षेपी अभ्यासक आहेत. याचमुळे प्रस्तुत गौरव-ग्रंथात प्राधान्याने 'संत-साहित्य-संस्कृति-मंथन' करण्यात आले आहे.

या ग्रंथाचे दोन भाग आहेत. दुसऱ्या भागात **प्रा. दे. द. वाडेकर** यांनी आपल्या तपस्वी मित्राचा – **डॉ. पेंडसे यांचा जिव्हाळ्याने परिचय** घडविला आहे आणि स्वतः **डॉ. पेंडसे** यांनी '**राष्ट्रीय शिक्षण आणि स्वराज्य**' या विषयाचे धावते विवेचन केले आहे. विदर्भातील राष्ट्रीय शिक्षणाच्या चळवळीत डॉ. पेंडसे यांचा साक्षात संबंध असल्यामुळे त्यांचा हा निबंध प्रत्ययकारी झाला आहे. ग्रंथाच्या आद्यन्ती अनुक्रमे डॉ. पेंडसे यांचा जीवनपट आणि त्यांच्या आजवरच्या लेखनाचा आलेख सादर केला आहे.

ग्रंथाचा मुख्य भाग 'संतसाहित्य-संस्कृति-मंथन' हा आहे. या भागात एकूण १२ निबंध समाविष्ट आहेत.हे सर्व निबंध त्या त्या क्षेत्रातील अधिकारी अभ्यासकांनी लिहिलेले आहेत. हे सर्व निबंध विचारप्रवर्तक आहेत. परंतु यांतील काही निबंध वादविषय बनणारे आहेत. '**महाराष्ट्रीय संस्कृतीचे आगळेपण**' विशद करणारा **श्री. ना. गो. चापेकरांचा** पहिलाच निबंध विवाद्य विधानांनी व्यापलेला आहे. नानासाहेबांसारख्या ज्ञान तपस्व्याच्या लेखणीतून इतका विस्कळित, तर्कदुष्ट्या अप्रातिष्ठित आणि परस्परविसंगत विधानांनी भरलेला निबंध उतरावा, याचे सखेदाश्चर्य वाटते. "मला अध्य-क्षांनी संस्कृतीवर लिहिण्यास आज्ञा केली आहे. पण संस्कृतीचा जेथे पूर्ण लोप झाला आहे, तेथे मी काय लिहिणार?" हे त्यांचे विधान पाहता वर्तमानकाली संस्कृती लुप्त झाली आहे, असे त्यांचे मत असावेसे वाटते. परंतु "ऐहिक शास्त्रांचा विचार आमच्या मनाला शिवला नाही," असे आपल्या सांस्कृतिक मागासलेपणाचे निदान त्यांनी याच लेखात अन्यत्र केले आहे. महाराष्ट्रीय संस्कृतीच्या धारेचा विचार सातवाहन काळापासून करावयास हवा. तसे न करता, संतांच्या उदयकाळापासून किंबहुना केवळ संतांच्याच संदर्भात मराठी संस्कृती जोखण्याचा प्रयत्न लेखकाने केला आहे. भौतिक क्षेत्रा-तील आमच्या मागासलेपणाला संत जबाबदार आहेत, हा राजवाड्यांचा आक्षेप श्री. चापेकरांना यथार्थ वाटतो.

संपादक : डॉ. अ. ना. देशपांडे, सुविचार प्रकाशन मंडळ, नागपूर व पुणे. पृष्ठे : ८ + १९२. मूल्य : दहा रुपये.

परंतु संतांच्या उदयापूर्वी भारत आणि महाराष्ट्र भौतिक क्षेत्रात कसा आणि कितपत प्रगत होता, याची प्रमाणे देण्याचे ते टाळतात. सारी दक्षिण इस्लामच्या आक्रमणात पराभूत झाली, ती संतांमुळेच, हे सिद्ध करण्याची जबाबदारी लेखकाने पाळावयास हवी होती. खरे, त्यांचे हे निरपवाद प्रामाणिक मत आहे, असे धरून चालायलाही जागा नाही. कारण वर्तमान स्थितीतील काही वैगुण्यांनी विषण्ण होऊन लेखकाने पूर्वीच्या काळातील 'अहंभावाचा पूर्ण निरास' करण्याच्या ध्येयाचा गौरव गायिला आहे. 'सर्व काही देवासाठी करावयाचे' ही जीवनदृष्टी लेखकाला, ऐतिहासिक संदर्भात का होईना, स्पृहणीय वाटते. तसेच, लेखकाने आपली मराठी अस्मितेची भावना पुष्ट करण्यासाठी स्वतःच निंदिलेल्या गोष्टींचा दुसरीकडे गौरवाने वापर केला आहे. 'महाराष्ट्राचे आगळेपण सूचित करणाऱ्या कित्येक चालीं'चा निर्देश करताना श्री. चापेकर लिहितात : "कीर्तनसंस्था येथेच जन्मास आली व येथेच तिचा अनुपमेय असा परिपोष झाला !" ऐतिहासिक दृष्टया हे विधान अतिव्याप्त तर आहेच, परंतु लेखकाच्या भूमिकेशी विसंगत आहे. कारण लेखकाला आक्षेपार्ह वाटणाऱ्या प्रपंचविन्मुखतेचा प्रचार कीर्तन-संस्थेने अव्याहत केला आहे. याच नमुन्याची आणखी काही विधाने पहा : "शिवाजीने पीरांना इनामे दिली आहेत. त्याचा निजावयाच्या खोलीचा रक्षक मुसल्मान होता. ह्यावरून रामदासांप्रमाणे शिवाजीचे अंतःकरण मुसलमानांच्या जुल्माने तळमळत होते, असे दिसत नाही. ... मुसलमान हा सदासर्वकाळ मुसलमानच राहणार, तो हिंदूंशी समरस कधीच होणार नाही, अशी रामदासांची दृढ समजूत असावी." मराठ्यांच्या इतिहासाचे प्राथमिक ज्ञान असणाराही ही विधाने मान्य करणार नाही. शिवाजी हिंदुधर्माचा अभिमानी होता; परंतु तो त्याहूनही व्यापक न्यायाचा पुरस्कर्ता होता. केवळ धर्माने हिंदू असणाऱ्या दुष्टांची त्याने हिंदू म्हणून गय केली नाही आणि केवळ जन्माने मुसलमान आहे म्हणून सज्जन मुसलमानाला त्याने वध्य मानले नाही. त्याच्या तलवारीला चंद्रराव मोरे-बाजी घोरपडे आणि अफजलखान-शाहस्तेखान हे सारखेच वध्य होते. रामदासांची भूमिकाही अशीच होती. त्यांच्या शिष्यांत आणि संबंधी जनांत मुसल्मानांचा समावेश होता, हे ऐतिहासिक सत्य आहे. पाश्चात्त्यांनी भारतात चालविलेल्या राजकीय उपद्व्यापाची चौकशी "शिवाजी पासून तो नाना फडणिसांपर्यंत एकानेही केली नाही," या विधानात शिवाजीचा समावेश करताना लेखकाने असेच इतिहासाचे अज्ञान प्रदर्शित केले आहे. शिवाजीची पत्रे, कृती आणि 'आज्ञापत्रा' सारखा शिवनीतीवरचा ग्रंथ यांची साक्ष श्री. चापेकरांच्या विरुद्ध जाते..

समर्थ रामदास आणि त्यांची रामोपासना यांचे वैशिष्ट्य विशद करताना, श्री. चापेकरांनी वारकरी संत व त्यांची विठ्ठलोपासना यांना गौणत्व देऊन राजवाडे संप्रदायाचा अनुकार केला आहे. "रामदासांचे सर्व काही औरच होते. प्रचलित असलेला विठ्ठल संप्रदाय सोडून त्यांनी रामाची उपासना सुरू केली. उत्तरेकडील रामाचे दक्षिणेत महत्त्व वाढविले. विठोबाच्या उपासनेला कोणतीच पार्श्वभूमी नव्हती. तो एका अर्थाने खरा निर्गुण देव होता. त्याच्यामागे परंपरा नाही. रामोपासनेची ह्याच्या अगदी उलट स्थिती. रामचंद्राला इतिहास होता. रामाचा त्याग वा त्याची कर्तव्यबुद्धी अपूर्व होती. सीतेभोवतीही पावित्र्याची प्रभा झळकत होती. रखुमाईच्या ठिकाणी तसे काहीच नव्हते. सीतारामांचे तेज झगझगीत होते. शिवाय या उपासनेने उत्तर-दक्षिण यांचा हृद्य संगम होणारा होता... विठोबा मिळमिळीत, तर राम प्रखर तेजस्वी !"

श्री. चापेकरांच्या वरील विधानात अशाच मूलभूत गफलती आहेत. रामोपासना प्रथम महाराष्ट्रात समर्थांनी प्रचलित केली, हा समज अनैतिहासिक आहे. समर्थपूर्व काळात रामचरित्राचे उद्गायन करणारे प्रभावी वाङ्मय निर्माण झालेले होते. प्रत्यक्ष समर्थांची रामचरित्राविषयक विशेष धारणा नाथांच्या भावार्थ रामायणाने पोसलेली आहे, हे आता निरपवादपणे सिद्ध झालेले आहे. दुसरे असे की, समर्थांनी रामोपासनेचा स्वीकार केला, तोच मुळी हेतुपूर्वक रामचरित्राचे विठ्ठलापेक्षा वैशिष्ट्य लक्षात घेऊन, ही समजूतही निराधार आहे. समर्थांना रामोपासना लाभली, ती पैतृक वारशाने – त्यांच्या घरातूनच. तसेच, विठ्ठल हा कृष्णस्वरूपाशी ऐकात्म्य पावल्याने कृष्णावताराची सर्व परंपरा विठ्ठलामागेही उभी होती. कृष्णचरित्रातही उत्तर-दक्षिण यांचा हृद्य संगम होणारा होता. रामचंद्राला परंपरा मूळचीच होती; विठ्ठलाच्या बाबतीत कृष्णचरित्राची प्रतिष्ठा अल्पकाळात दृढमूल करण्याचा चमत्कार विठ्ठलाच्या उपासकांनी केलेला आहे.

खरे म्हणजे ही तुलनाच व्यर्थ आहे – भ्रान्त दृष्टीचा तो प्रसव ठरतो. प्रत्यक्ष समर्थांच्या काळात या भेदाचा

गंधही नव्हता. 'साधु दिसती वेगळाले। तरी ते स्वरूपीं मिळाले॥' अशी समर्थांची भूमिका होती.

श्री. चापेकरांसारख्या अतिरेकी समर्थाभिमान्यांच्या विवेचनाची प्रतिक्रिया श्री. बहिरटांसारख्यांच्या लेखनात दुसऱ्या टोकाला जाते. **'मराठी संतांचा मायावाद'** या लेखांत **श्री. बहिरटांनी**, मराठी संत हे चिद्विलासवादी होते, हे प्रतिपादून रामदासांना संतमंडळातून बाजूला काढले आहे. त्यांच्या मते, "मराठी संतांच्यापैकी रामदासांची भूमिका ज्ञानेशादी भागवतधर्मी संतांच्याहून थोडी वेगळी आहे. रामदास हे परंपरेच्या वेदान्तास चिकटलेले आहेत. त्यांनी अजातवाद, मायावाद याचे तात्त्विक रूप मान्य केलेले आहे. त्यामुळे त्यांची धार्मिक शिकवणूक भागवतधर्मी संतांपेक्षा संकुचित आहे. त्यांच्या वाङ्मयात क्षुद्रदेवता पूजन, तपश्चर्या, पुरश्चरणे, गुरुच्या बाबतीत विशिष्ट जातीस मान ठेवणे, इत्यादी गोष्टींचा पुरस्कार केलेला आढळतो. भागवतधर्मी संतांनी या गोष्टींचा निषेध केला आहे. ज्ञानेश्वर, एकनाथ या श्रेष्ठ संतांविषयी आदराच्या उल्लेखांचा रामदासांच्या वाङ्मयात अभाव आहे. भागवतधर्मी संतांची राजकीय कामगिरी नैतिक भूमिका तयार करण्याची होती. रामदासांनी त्या बाबतीत प्रत्यक्ष बरीच कामगिरी केली. पण ज्या धर्मरक्षणास्तव केली, तो धर्म मात्र संकुचित स्वरूपाचा होता. यापेक्षा भागवतधर्मी संतांची धार्मिक कामगिरी अधिक उदार, चिरस्थायी व सार्वकालीन महत्त्वाची आहे."

श्री. बहिरटांचे हे मत पूर्वग्रहदूषित आहे. रामदास हे भागवतधर्माच्या चतुर्विध संप्रदायांपैकी स्वरूपसंप्रदायान्तर्गत होते. त्यांनी पंढरी आणि पांडुरंग यांचा महिमा वारकऱ्यांच्या उत्कटतेने गायिला आहे; एवढेच नव्हे, तर पांडुरंगाच्या स्वरूपातही परमात्म्याचा साक्षात्कार अनुभवला आहे, ही गोष्ट नेहमी दृष्टीआड केली जाते. वारकरी संत आणि समर्थ रामदास यांच्या भक्तिविषयक विचारधारेतील भेदाचा बाऊ अकारण केला जातो. समर्थांच्या घडणीत प्रख्यात वारकरी संत एकनाथ यांच्या प्रभावाचा फार मोठा वाटा आहे, हे विसरता येणार नाही. वारकरी संत पुरोगामी आणि समर्थ प्रतिगामी हे ज्या पद्धतीने सिद्ध केले जाते, त्या पद्धतीने ज्ञानेश्वरांसकट सर्व संतांना प्रतिगामी ठरविणे त्यांच्या वाङ्मयातील उल्लेखांच्या आधारे केव्हाही शक्य आहे. 'संत संत सब एक है!' हेच खरे.

श्री. चापेकर आणि श्री. बहिरट यांच्या समर्थविषयक अतिरेकी मतांच्या दोन टोकांत तोल निर्माण करणारा लेख **डॉ. शं. गो. तुळपुळे** यांचा आहे. "ज्ञानेश्वरांनी स्फूर्तिवादाच्या बीजरूपाने सांगितलेला कर्मयोग व ज्ञानेश्वरीच्या रूपाने निर्मिलेला साहित्यादर्श, नामदेवांनी दूरवर जाऊन लावलेले ज्ञानदीप, एकनाथांनी दाखविलेली समन्वयपंथ आणि तुकारामात दिसून येणारी व भक्तांचा प्राणच अशी अंतर्मुख वृत्ती, या सर्वांचा परमोच्च संगम एक रामदासातच आढळतो. पूर्वी होऊन गेलेल्या या चार श्रेष्ठांची कर्तृत्वे आपणामध्ये सामावून घेऊन रामदासांनी त्यावर स्वतःच्या स्वतंत्र अशा कर्तृत्वाचा जो ध्वज फडकावला त्यास तर इतिहासात तोड नाही." अशा शब्दात त्यांनी वारकरी संत व रामदास यांचा समन्वयसंबंध व समर्थांचे वैशिष्ट्य विशद केले आहे. मराठी भक्तिपरंपरेतील युगातील सत्त्वांशांचा समन्वय करून शिवाय युगसापेक्ष कर्तृत्व दाखविणाऱ्या समर्थांच्या बाबतीत **'दास झालासे कळस!'** असा घोष त्यांना करावासा वाटतो. डॉ. तुळपुळे यांच्या विवेचनाचा सर्वच तपशील मान्य होईल, असे नाही. हे तपशिलातील काही मतभेदाचे भाग आणि काहीशी अभिनिवेशाची छाया वजा केली, तर अनाग्रही चिंतकांना त्यांचे म्हणणे विचारार्ह वाटल्यावाचून राहणार नाही.

डॉ. वि. भि. कोलते यांनी **'मराठी संत आणि महानुभाव पंथ'** या लेखात एक जुना वादविषय नव्याने उपस्थित केला आहे. मराठी संतांच्या वाङ्मयात महानुभाव पंथाविरुद्ध जी वचने आढळतात, त्यांची पाहणी करून त्यांनी असा निष्कर्ष काढला आहे की, "मराठी संतांनी महानुभावांना लावलेली दूषणे बरीचशी बाह्य वेषावर आधारलेली आहेत. तात्त्विक दूषणे प्रामाणिक मतभेदावर, तर त्यांतील काही गैरसमजावर आधारलेली आहेत...एकनिष्ठ विठ्ठलभक्तीमुळे इतर दैवतांविषयी आणि त्यांच्या उपासनापंथांविषयी सर्वच मराठी संतांनी सामान्यतः अमान्यता दर्शविलेली आहे. असे करताना अनेकदा अमंगळ शब्दप्रयोगही करण्याला त्यांनी कमी केलेले नाही. एका दृष्टीने आमच्या मराठी संतांच्या ठिकाणी ही असहिष्णुताच दिसून येते, असे म्हटले तर ते चुकीचे होईल काय?...अशा स्थितीत मराठी संतांनी विठ्ठलपंथाव्यतिरिक्त इतर पंथांविषयी आणि त्यांच्याबरोबर महानुभावांविषयी जे उद्गार काढलेले आहेत, ते सावधानतेने पारखून घेतले पाहिजेत आणि मगच त्यावर विश्वास ठेवला पाहिजे. तुलनात्मक दृष्टीने पाहिले,

अनुक्रमणिका

तर एकनाथ – तुकारामादिकांसारख्या मराठी संतांनी महानुभावांविषयी अनुदार उद्‌गार काढलेले आहेत असे मानले, तरी कोणत्याही महानुभाव कवीने किंवा महंताने वारकऱ्यांविषयीच काय, पण इतर कोणत्याही पंथीयांविषयी तसे उद्‌गार काढलेले नाहीत, हे लक्षांत घेण्यासारखे आहे. त्यांनी तसे केले असते, तरी ते क्षम्य ठरले असते; परंतु त्यांनी तसे केलेले नाही, यांतच त्यांचे महानुभावत्व दिसून येत नाही काय?"

डॉ. कोलते हे महानुभाव पंथाचे एकान्तिक समर्थक आहेत–नव्हे, आपली प्रामाणिक चिकित्साप्रवणता दाबून टाकून महानुभाव पंथाचे पंथीय दृष्टिकोनातून समर्थन करण्याचे व्रत त्यांनी हेतुतःच पत्करले आहे. त्यामुळे त्यांना 'विठ्ठल देवता म्हणजे एका दरोडेखोराचे मरणोत्तर दैवतीकरण आहे' असा अभद्र खुलासा चक्रधरांच्या तोंडी घालणारी 'विठ्ठलवीरकथन' ही लीळाचरित्रातील लीळा त्यांना दडपून ठेवावीशी वाटते. या लीळेतून महानुभावांच्या कोणत्या महानुभावत्वाचा प्रत्यय घडतो, ते डॉ. कोलतेच जाणोत.

मराठी संतांची वृत्ती अन्य देवतांच्या उपासकांविषयी कधीच असहिष्णू नव्हती. संप्रदाय वा देवता यांच्या भेदांवरून त्यांनी रणे माजविली आहेत. वारकरी संप्रदायाचे धुरीण ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ, तुकाराम हे अनुक्रमे नाथ, वारकरी, दत्त व चैतन्य असे वेगवेगळ्या संप्रदायांतील होते. नाथांच्या शिष्यपरिवारात नाथ, वारकरी, दत्त, आनंद अशा विविध धारा आहेत. वडवाळसिद्ध नागनाथांच्या शिष्यांत लिंगायत, भागवत हे सुखाने नांदतात. शांतलिंगांसारख्या लिंगायतांच्या परंपरेत जयरामस्वामींची कृष्णभक्ती विसंगत ठरत नाही हरिभाऊ भोंडवे यांची गुरुपरंपरा रामदासी असून ते पंढरीचे वारकरी म्हणून गाजतात. मराठी भक्तिधारेच्या उदार, समन्वयशील आणि सहिष्णुस्वरूपाची अशी शेकडो उदाहरणे देता येतील.

असे असूनही महानुभाव पंथ निंद्य आणि उपेक्षित ठरला, ही घटना गंभीरपणे विचार करण्यासारखी आहे. शेख महंमदासारखा मुक्तचिंतक महानुभाव पंथाविषयी जे उद्‌गार काढतो, त्यावरून महानुभाव पंथाच्या ऱ्हासाची कारणे बौद्ध संघाच्या ऱ्हासाशी जुळणारी आहेत, असे स्पष्ट दिसते.

**श्री० अप्रबुद्ध** यांनी **ज्ञानेश्वरांच्या मायावादाची** तात्त्विक चिकित्सा करून असा निष्कर्ष काढला आहे की, "शंकराचार्यांचा आणि ज्ञानेश्वरांचा मायावाद हा एकच आहे आणि जेथे कोठे त्याच्याशी विसंगत असे काही वाटत असेल, तेथे ते 'खडे मांडूनिया शिकविला साधनमार्ग' या न्यायानेच आले आहे, असेच मानावे लागते." अर्थात श्री. बहिरटांना ही भूमिका मान्य नाही. **महाराष्ट्रीय संतांच्या भागवतधर्माचे** निरीक्षण करून **श्री. बाळशास्त्री हरदास** यांनी प्रतिपादिले आहे की, "महाराष्ट्रात संतांनी प्रवर्तित केलेला भागवतधर्म अवैदिक नसून शुद्ध वैदिक आहे...वैदिक प्रणाली व वैदिक तत्त्वज्ञान यांचे पुनरुज्जीवन घडवून आणणे हेच संतांच्या भागवतधर्माचे साध्य होते." **डॉ. ग. त्र्यं. देशपांडे** यांनी **शांकर वेदान्त आणि शिवाद्वय-दर्शन** ग्रंथांतील काही साम्यांची चर्चा केली आहे. **प्रा. श्री. ना. बनहट्टी** यांनी **'मराठी स्त्रीगीतांतील भक्तिभावा'**चा आस्वादक परिचय घडवून, मराठी संतांचा लोकमानसावर पडलेला प्रभाव कशा प्रकारचा आहे, याचे दर्शन घडविले आहे.

उरलेल्या चार निबंधांपैकी **प्रा. द. ल. अडोणी** यांचा निबंध **'ज्ञानेश्वरीतील शब्दार्थ विचारा'**-विषयीचा आहे. शब्द आणि त्याचा अर्थ यांविषयी ज्ञानेश्वराची धारणा काय होती, याची ज्ञानेश्वरीतील प्रत्यक्षाप्रत्यक्ष उल्लेखांच्या आधाराने विस्तृत चर्चा प्रा. अडोणी यांनी केली आहे. त्यांचा हा प्रयत्न अभिनव आहे. **प्रा. कृ. पां. कुलकर्णी** यांनी **मराठी भाषेचे आद्य पद्धियंते'** या लेखात मुकुंदराजांचा पंडिती भाषाबंध, चक्रधरांचा ग्रामीण भाषाबंध आणि ज्ञानेश्वरांचा नागर भाषाबंद यांचे आगळेपण विशद केले आहे. उरलेले दोन निबंध भाषाशास्त्रीय आहेत. **प्रा. सुरेश डोळके** यांनी **'नागपुरी मराठी'**चा भाषाशास्त्रीय अभ्यास मांडला असून मराठीच्या एका उपेक्षित बोलीच्या शास्त्रीय अभ्यासाला चालना दिली आहे; तर **डॉ. वि. बा. प्रभुदेसाई** यांनी **'मराठी भाषा व गोमंतकी बोली'** या लेखात, 'मराठी व कोकणी यांचे नाते भाषा व बोलीचे आहे,' असा साधार सिद्धान्त मांडला आहे.

—एकंदरीत, अनेक विद्वानांच्या अभ्यासपूर्ण लेखांनी सजलेला हा गौरव-ग्रंथ म्हणजे संपादकांनी म्हटल्याप्रमाणे 'वादप्रिय विद्वानांना अगत्यपूर्वक दिलेली विचाररूप पक्वान्नांची उत्कृष्ट मेजवानीच आहे,' यात संशय नाही. असा हा विवेचक आणि विचारप्रेरक ग्रंथ प्रसिद्ध केल्याबद्दल डॉ. पेंडसे-सत्कार-समितीस मनःपूर्वक धन्यवाद.

**– रामचंद्र चिंतामण ढेरे**

---

# ' मराठी व्याकरण '

डॉ. प्र. न. जोशी यांचे ' मराठी व्याकरण ' एस्. एस्. सी. झाल्यानंतर मराठीचा विशेष अभ्यास करणाऱ्या प्रौढ विद्यार्थ्यांसाठी लिहिलेले आहे. यामध्ये मराठीच्या व्याकरणाचे विवेचन करून मराठीची व्याकरण-परंपरा, वृत्तविचार, अलंकारविचार व मराठीचे नवे शुद्धलेखन यांचा समावेश केला आहे. तसेच विद्यार्थ्यांच्या दृष्टीने उपयुक्त प्रश्नावली व प्रमुख संदर्भ ग्रंथांची यादीही शेवटी दिलेली आहे.

या पुस्तकात वर्णविचार, शब्दविचार व वाक्यविचार या व्याकरणाच्या तीन प्रमुख अंगांची चर्चा विस्ताराने केली आहे. प्रस्तुत व्याकरण अगदी अलीकडच्या काळातील असूनही डॉ. जोशी यांनी फक्त जुन्या व्याकरणांच्या आधाराने ते लिहिले आहे. व्याकरणावर निघणाऱ्या प्रत्येक नवीन पुस्तकात तोपर्यंतच्या काळात भाषेत दिसून येत असलेल्या नवीन नवीन बदलांची नोंद अपेक्षित असते. परंतु ही अपेक्षा येथे पूर्ण होत नाही व यामुळे मराठीची वर्णसंख्या अजूनही ४८ च मांडली, गेलेली दिसते.

वर्णविचारात शब्द, वर्ण, अक्षर इत्यादींच्या व्याख्या दिलेल्या आहेत. सोपेपणासाठी स्थूलाकडून सूक्ष्माकडे जाण्याच्या प्रयत्नात येथे ' अक्षरा'ची व्याख्या दोन वेळा केलेली आहे. पृ. ७ वर ' दोन–तीन वर्ण एकत्र येऊन अक्षरे बनतात ' असे विधान आहे तर पृ. ८ वर ' वर्ण ' शब्द मर्यादित करून, ' कोणत्याही स्वरास अथवा स्वरयुक्त व्यंजनास अक्षर म्हणतात. ' असे डॉ. जोशी सांगतात. अशा प्रकारे एकाच गोष्टीच्या दोन व्याख्या देणे व्याकरणात संमत ठरत नाही. तसेच ज्यांना अस्तित्वच नाही त्यांना अस्तित्व आहे अशी कल्पना करून नंतर त्या गोष्टी अस्तित्वात नाहीत असे म्हणणे व्याकरणात योग्य ठरत नाही. परंतु ' संस्कृत वा मराठी व्याकरणात दीर्घ ऌ नाही. (पृ. ९) ' अशा सारखी विधाने या पुस्तकात सापडतात. वर्णमालेची व्यवस्था लक्षात राहण्यासाठी दिलेली कोष्टके उपयुक्त आहेत मात्र त्यानंतर दिलेले संधिप्रकरण एक प्रकारचे असमाधान निर्माण करते. आपल्या व्याकरणातील संधिप्रकारांचे गौणत्व मराठीच्या दृष्टीने किती आहे याची जाणीव स्वतः दामले यांनी व्यक्त केली आहे तिचाच फायदा घेऊन, दामले यांच्याच व्याकरणावर बहुतांशी आधारित अशा या पुस्तकात, हे प्रकरण मराठीस उपयुक्त संधिप्रकारच देऊन लिहिले जाणे आवश्यक होते.

शब्द–विकारामध्ये शब्दांचे वर्गीकरण, विकरण, शब्दसाधना यांचा समावेश केला आहे. हे करताना, पृ. २५ वर, ' प्रत्यय लागताना शब्दांचे जे बदललेले रूप असते त्यास सामान्यरूप म्हणतात. ' अशी सामान्य-रूपाची व्याख्या दिली आहे. डॉ. जोशी यांच्या व्याकरणातील इतर भागांकडे पाहिले असता नामाला अगर सर्वनामाला प्रत्यय लागण्यापूर्वी नामाचे अगर सर्वनामाचे जे रूप होते त्यास सामान्यरूप म्हणतात अशी रूढ व्याख्या बदलून ' सामान्यरूप ' या शब्दाच्या अर्थाची व्याप्ती वाढवायची असेल असे वाटत नाही. क्रियाविशेषणांच्या बाबतीत दामले यांनी त्यांच्या अविकारीपणाबद्दल घेतलेली शंका उचलून धरून, क्रियाविशेषणांचे अविकारित्व काढले असते तर हा बदल अधिक स्वागतार्ह झाला असता. शब्दांच्या वर्गांचे वर्णन दामले यांच्या वर्गीकरणाच्या वर्णनाशी बहुतांशी मिळते असल्याने दामल्यांच्या व्याकरणावरील केली जाणारी टीका याही व्याकरणाला लागू पडेल. आजची प्रमाणभूत मराठी लक्षात घेता वर्तमानकाळाच्या ' असल्ये ' मधील ' ल्ये ' व भूतकाळाच्या ' असल्ये ' मधील ' ल्ये ', यासारख्या प्रत्ययांची नोंद अनावश्यक आहे.

पृ. ११५ वर डॉ. जोशी यांनी विरामचिन्हांना प्राप्त झालेले महत्त्व आधुनिक काळातील गद्याच्या प्रसारामुळे आहे असे म्हटले आहे. परंतु विरामचिन्हे मराठीत आणताना मराठी–इंग्रजी पंडितांचे आपापसात

---

लेखक – **डॉ. प्र. न. जोशी**. प्रकाशक – सौ. सुलोचना लिमये, व्हीनस बुक स्टॉल, पुणे २. मूल्य ५ रुपये : पृ. १९५ : ऑगस्ट १९६३.

किती वाद झाले यांची आठवण केल्यास विरामचिन्हांच्या महत्त्वपूर्ण स्थानाला गद्याचा प्रसार हे कारण नसून दुसरीच कारणे आहेत हे स्पष्ट होईल.

प्रस्तुत पुस्तकातील 'व्याकरण हे मुख्यतः शब्दांचे शास्त्र आहे' (पृ. ८), 'व्याकरण हे मुख्यतः बोलभाषेचे असते.' (पृ. ११) इत्यादी विधाने भाषाशास्त्रा-संबंधीच्या आजच्या कल्पना लक्षात घेता अशास्त्रीय वाटतात. पृ. १० वरील क्ष् = क् + ष् + अ (यातील क्ष ऐवजी क्ष्) व (ज्ञ = ज् + ञ् + अ याऐवजी) ज्ञ = ञ+अ हे मुद्रणदोष गंभीर आहेत.

दामले यांचे भलेमोठे, प्रसंगी अनुपलब्ध व्याकरण वाचण्यापेक्षा चटकन लक्षात राहण्यास उपयुक्त, परीक्षार्थीसाठीच योग्य असे हे व्याकरण आहे. या पुस्तकाने मराठी व्याकरणात एक भर पडली असली तरी आजच्या प्रमाणभूत मराठीच्या व्याकरणाची उणीव अजून शिल्लकच आहे.

– सौ. सुहासिनी लद्दू



# स्मितचित्रें

'स्मितचित्रे' हा श्री. राजाराम हुमणे यांच्या २१ विनोदी लेखांचा संग्रह असून, त्याला चित्रकार बाळ ठाकरे यांनी समयोचित व्यंगचित्रांची जोड दिली आहे. वृत्तपत्रव्यवसायात काही वर्षे काम केल्यानंतर ते आता महाराष्ट्र राज्य सरकारचे सांस्कृतिक कार्यक्रमाचे प्रमुख अधिकारी आहेत. अतिरेकी गोष्टींचा उपहास करावयाचा व त्यांचे विडंबन करून विनोद निर्मितीने समाजातील दोषांवर प्रकाश पाडण्याचे सांस्कृतिक कार्य काही अंशी अशा लेखांनी होते, असे म्हणण्यास प्रत्यवाय नाही. अशा वेळी काही व्यक्तिदोषांवर टीका करावी लागते. त्या टीकेमुळे लोकांच्या भावना दुखावल्या जाऊ नयेत म्हणून श्री. हुमणे यांनी आपल्या लेखात दोषांवर जे टोमणे मारले आहेत, त्यांचे शरसंधान स्वतःवरच केले आहे. कडवटपणा टाळण्यासाठी ही युक्ती जरी बरी वाटली, तरी सर्व ठिकाणी वावरणारा मी म्हणजे श्री. हुमणे नव्हेत हे रसिक व सुज्ञ वाचक जाणू शकतो, इतकेच काय पण श्री. हुमण्यांना कोणती व्यक्ती अभिप्रेत आहे, तेही जाणू शकतो. तसे म्हणावे तर त्यांनी आपल्या लेखात काही प्रसिद्ध व्यक्तींचा व्यंगचित्रां-सह उल्लेख केला आहे. का हाही एक स्मिता (हास्य)-चाच प्रकार समजावयाचा !

स्मितचित्रांचे प्रयोजन स्मित अर्थातच मंद व मार्मिक हास्य उत्पन्न करण्याचे आहे. श्री. हुमणे यांच्या काही लेखात जसे हे सामर्थ्य आढळते, तसेच त्यांचे काही लेख खळखळून हसविणारेही आहेत.

"परमेश्वरालाही विनोद समजत नाही" या त्यांच्या प्रथमारंभीच्या आत्मनिवेदनात त्यानी स्वतःची भूमिका स्पष्ट केली आहे. हे लेख दुष्टाव्याने लिहिलेले नाहीत आणि यांमुळे कोणाही सुसंस्कृत वाचकाला अवघडल्यासारखे वाटणार नाही अशा प्रकारचे शिफारसपत्र प्रत्येक रसिक वाचक खात्रीने देईल. श्री हुमणे यांनी एका सामान्य मध्यमवर्गीय नागरिकाची भूमिका घेऊन, त्याचे विचार, त्याच्या भावना मोठ्या मार्मिकपणे मांडून त्यातील दोषावर मिस्किलपणे टीका केली आहे, त्यामुळे लेखांतून डोकावणारा 'मी' स्वतःच आहे काय असा संभ्रम वाचकास पडल्यास नवल नाही. ज्याला पुष्कळ मुले आहेत त्याची समजूत त्या 'धनाच्या पेट्या' आहेत अशी करणे, जगात नाव कमावण्याची महत्त्वाकांक्षा मनात बाळगून निरनिराळ्या अवस्थांतून जाणे ("महत्त्वाकांक्षी मी") आपले नशीब केव्हा तरी उचकटेल या आशेने "भविष्याच्या पोटात शिरणे"; "गुलाबी चहाचे कोडे उकलण्याचा प्रयत्न करणे"; "ओळखीच्या चेहऱ्या"वरील विस्मृतीचा बुरखा हळुवार हाताने काढण्याचा प्रयत्न करणे, "उलटी अंबारी यात वर्णन केल्याप्रमाणे तेच तेच भिकारी पुन्हा भेटणे, इत्यादी अनुभव सामान्य माणसासही येत असतात. "माझी एकसष्टी"; "महाराष्ट्रीय मिष्टान्न"; "महाराष्ट्राचा कोणकोणाहे" "आधी होता वाघ्या" या लेखात अतिरेकी प्रसिद्धिभिक्षुकता, संशोधन खटाटोप, who's who सारख्या फुटकळ चरित्रग्रंथांचा फोल्पणा; आणि

अनुक्रमणिका

सेवानिवृत्तांची सेवाप्रवृत्ती यांचे मोठ्या मार्मिकतेने विडंबन केले आहे.

"नादलुब्धाचा कबुलीजबाब", "खाँसाहेब खंदे अलिखाँचा झाला", आणि "मैफल" या तीन लेखांत श्री. हुमणे यांची चुरचुरीत वर्णनशैली जशी प्रतीत होते, तसेच त्यांच्या संगीतविषयक ज्ञानाचीही साक्ष पटते. "हरिमुरारीची अंतरिक्षातील भरारी" हा लेख सर्वांत प्रदीर्घ असून माहितीपूर्ण आहे. विमानाच्या प्रवासात प्रथम निघालेल्या सामान्य मध्यमवर्गीय प्रवाशाचे अनुभव श्री. हुमणे यांनी सूक्ष्म निरीक्षणाने मोठ्या हृद्य तऱ्हेने मांडले आहेत. हा लेख विशेष वाचनीय झाला आहे.

सूक्ष्मनिरीक्षणयुक्त संकलनशक्ती, निरनिराळ्या अर्थाच्या अनुरूपयुक्त शब्दांची योजना आणि सुटसुटीत बोलकी भाषा ह्या विशेष गुणांमुळे हा विनोदी लेखसंग्रह आल्हाददायक झाला आहे. याबद्दल श्री. हुमणे यांचे अभिनंदन करणे योग्य ठरेल. रुग्णाइतास तर हा संग्रह खात्रीनेच काही काळ विरंगुळा देऊन, स्वतःचे दुःख विसरून हसावयास लावील.

– न. का. घारपुरे

---

# खर्डेघाशी

'खर्डेघाशी' हा प्रा. मं. वि. राजाध्यक्षांच्या तेरा ललित लेखांचा पहिलाच संग्रह प्रसिद्ध झाला आहे. सन १९४४ ते १९५४ या दहा वर्षांच्या काळात 'अभिरुची', 'केसरी', 'मौज', 'दीपावली', 'वसुधा' इत्यादी नियतकालिकांतून राजाध्यक्षांनी जे ललित लेखन केले त्यांतील निवडक लेखांचा समावेश या पुस्तकात करण्यात आला आहे. श्री. पु. ल. देशपांडे यांची रसोद्ग्राही, खेळकर आणि मार्मिक प्रस्तावना या पुस्तकाला लाभली आहे.

मराठीतील विनोदी वाङ्मयाची परंपरा अभ्यासताना कोल्हटकर, गडकरी, कॅ. लिमये, अत्रे, ताम्हणकर, चिं. वि. जोशी, पु. ल. देशपांडे अशी काही प्रमुख नावे उच्चारली जातात. या नामावलीत आजवर राजाध्यक्षांचे नाव घेतले जात नव्हते. त्यांनी विनोदपर स्फुट लेखन केले होते खरे; पण साहित्याच्या दरबारात स्थिरपद होण्यासाठी 'ग्रंथकार' हे बिरुद छातीवर रुळलेच पाहिजे या संकेताची पूर्ती त्यांच्या हातून झाली नव्हती. आता त्यांनी केलेली ही 'खर्डेघाशी' एवढी वळणदार आणि दमदार आहे की, या एकाच पुस्तकामुळे त्यांना साहित्य-सृष्टीत स्वतंत्र स्थान लाभेल—लाभावे.

'खर्डेघाशी'मधील राजाध्यक्षांचे ललितलेखन विनोदपर असले, तरी विनोदाच्या जुन्या रुळलेल्या वाटेवऱ्या लिखाणाच्या खुणा सापडणार नाहीत. राजाध्यक्षांचे लेखन एवढे पृथगात्म आहे की, त्यातून त्यांनी स्वतःची अशी एक नवी चाकोरी पाडली आहे. विनोदाच्या कोणत्याही संप्रदायातले ते शिष्य नाहीत, कुणाच्याच झेंड्याखाली ते उभे नाहीत; कुटल्याही विनोद–मल्लाच्या आखाड्याचा रंग त्यांच्या अंगाला लागलेला नाही वानगीदाखल एकच मुद्दा सांगितला तरी पुरेल. साहित्य-क्षेत्रातील भोळ्याभाबड्या जीवांचा बावळटपणा आणि संधिसाधू प्राण्याचा बनेलपणा यांचे चित्रण या संग्रहाती बहुसंख्य लेखांतून केलेले आढळते. 'पुस्तकांची दुःखे' 'साहित्याची धुळाक्षरे', 'इतकी रद्दी पुरे झाली', 'स्मरणशक्तीचा बळी', 'बेची गोष्ट लिहिते', 'प्रस्तावना कशी लिहावी?' आणि 'अभिनव काव्य-बोध' हे सारे लेख खोडकर, खट्याळ आणि खेळकर विनोदाने रसरसलेले आहेत. या साहित्यविषयक लेखां-पैकी एकाही लेखावर कोल्हटकरांच्या 'साहित्यपरिषदेच्या तयारी'ची अंशमात्रही छाया पडलेली नाही, एवढी त्यातील विनोददृष्टी स्वायत्त आहे.

---

**खर्डेघाशी :** लेखक : प्रा. मंगेश विठ्ठल राजाध्यक्ष, प्रकाशक : श्री. वा. पु. भागवत, मौज प्रकाशन गृह, खटाववाडी, मुंबई ४. पहिली आवृत्ती : जून १९६३ पृष्ठे १५०, मूल्य पाच रुपये.

अनुक्रमणिका

आपल्या आवतीभोवतीच्या लब्धप्रतिष्ठित व्यक्तींची चिंगे राजाध्यक्षांनी कुशलतेने उघडी केली आहेत. हे व्यक्तिदर्शन काही ठिकाणी एवढे पारदर्शक आहे की, ती ती माणसे, नाव न घेताही आपल्याला ओळखता येतात. पुस्तकांमुळे विद्वान निपजतात हा गौरव; पण 'पुस्तकांतून पुस्तके' निपजविणारे बहुप्रसव लेखक कोणते हे आपल्याही ध्यानात येते. 'पुस्तकावर रंगी-बेरंगी चिताडकाम' करणारे, 'ओळीओळीखाली बटबटीत रेघा' मारणारे साहित्यिक-वाचक तुमच्या आमच्या ओळखीचे वाटतात. अशा वाचकांमुळे "छापील मजकुराइतकेच त्या हस्तलिखित गिचमिडीचे ओझे पुस्तकाला वागवावे लागते." राजाध्यक्षांनी वर्णिलेले 'प. पू. आबाजी' पाहिले की, असे काही ओळखीचे तोंडवळे डोळ्यांसमोर उभे राहतात; कारण स्वराज्याच्या गेल्या काही वर्षांत 'पूज्यां'ची संख्या, फार वाढली आहे.' प. पू. आबाजींची पत्रे, त्यांचा आहार आणि त्यांची 'साधनशुचिता' पाहिली की, पु. ल. देशपांड्यांच्या 'आचार्यां'ची आठवण होते. "वसंतसेना म्हणजे प्रेमाचे प्रतीक. ती गणिका; पण तिचे अंकगणित केवढे विशाल! शूद्रकाने ते आदर्श दिले." अशा 'उदात्त' आशयानी 'परिप्लुत' असलेली प. पू. आबाजींची पत्रे वाचताना जीव हसून बेजार होतो. धोंड्यावरचा शेंदूर हलक्या हाताने खरवडून काढावा तो राजाध्यक्षांनीच!

'स्मरणशक्तीचा बळी' हा लेख म्हणजे या संग्रहातली 'सिक्सर'च होय. 'डॉ. वासुदेव गणपती साळुंके' यांच्या अचाट स्मरणशक्तीच्या 'भयानक इंद्रिया'चे बहारदार वर्णन राजाध्यक्षांनी केले आहे. डॉ. साळुंके यांना एकदा स्मरणशक्तीची 'उबळ' आली की, "शब्दाला शब्द चिकटून वाहू लागे. मध्ये श्वासाला शिरकाव नाही!" त्यांच्या व्याख्यानानंतर कित्येक दिवस-पर्यंत सभागृहात त्यांचा आवाज घुमत होता. शब्दांची गर्दी ओसरेना. शेवटी सगळी खिडक्यादारे उघडून टाकली तेव्हा दिवाणखाना निःशब्द झाला. कोणी त्यांच्या पाठांतराचे कौतुक केले, तर कोणी भारल्यागत त्यांच्या फुप्फुसाचे!

आजच्या साहित्य सृष्टीतील सोंगेढोंगे आणि सांस्कृतिक जीवनातील चिंगे राजाध्यक्षांनी खट्याळपणाने उघडी केली आहते. त्यांची ही 'चिंगचित्रे' वाचताना त्यांच्या प्रसन्न शैलीचा पानोपानी प्रत्यय येतो. 'खर्डेवाशी' वाचताना राजाध्यक्षांच्या निर्मत्सर, निरहंकारी आणि निकोप व्यक्तिमत्त्वाचे पदोपदी दर्शन घडते. सुजाण श्रद्धा आणि सूक्ष्म विनोदवृत्ती यांचीच पावती 'खर्डेवाशी'तून मिळते.

— हे. वि. इनामदार.

## 'पूर्वस्मृति'

एक यशस्वी लघुनिबंधकार म्हणून मराठी वाचकांना माहीत असलेले कै. गोविंद रामचंद्र दोडके यांचा हा पहिलाच कथासंग्रह आहे. 'कशास निंदास्तुति, चिंता— गाणे माझे मजकारिता!' अशा अंतर्मुख वृत्तीने 'स्वान्तः सुखाय' लेखन करणारे कै. दोडके यांनी वेळोवेळी लिहिलेल्या कथा या पुस्तकात संग्रहित करण्यात आल्या आहेत. खऱ्या साधकाप्रमाणे ते 'आत्मक्रीडः, आत्मरतिः' अशा वृत्तीने जीवन जगले आणि प्रसिद्धि-पराङ्मुख राहूनच त्यांनी जगाचा निरोप घेतला.

दिवाकर कृष्णांपासून गंगाधर गाडगीळांपर्यंत उत्क्रांत होत गेलेल्या मराठी कथेच्या वाटचालीतील एक विशेष वळण दोडके यांच्या कथेत आढळते. रोजच्याच जीवनातल्या साध्यासुध्या घटना-प्रसंगातून व्यक्तित्वाचे जे हृदयंगम विशेष त्यांना जाणवतात तेच त्यांनी

'पूर्वस्मृति' (कथासंग्रह) लेखक: गो. रा. दोडके. प्रकाशक: श्री. श्यामकांत बनहट्टी, सुविचार प्रकाशन मंडळ, ४६१/१० सदाशिव, पुणे २.
प्रथमावृत्ती: ऑक्टोबर १९६२: पृष्ठे १४०: मूल्य चार रुपये.

अनुक्रमणिका

आपल्या कथेत परिणामकारकतेने मांडले आहेत. या संग्रहातली 'पूर्वस्मृति' ही पहिलीच कथा या दृष्टीने उल्लेखनीय आहे. आपल्या सुखी संसारात रमलेल्या इंदूला आपले बालपण आठवते. इंदूची दृष्टी अधू असल्याने तिने चष्मा वापरला पाहिजे हे तिच्या शिक्षकांना समजले, तेव्हा त्यांनी तिला अपत्य भावाने स्वखर्चाने चष्मा आणून दिला होता. इंदूला या प्रसंगाची आता आठवण होते ती शेजारच्या छोट्या वसुधेच्या एका अडचणीमुळे. घरच्या गरिबीमुळे वसुधेला शाळा सोडावी लागणार आहे हे समजल्यावर आपल्या पतीला सांगून इंदू तिला मदत करते या वेळी तिला आपल्या मास्तरांचे पुढील शब्द आठवतात :

'एखाद्याची गरज कळली नि अशा वेळेला आपल्यावर येऊन गेलेल्या प्रसंगाची आठवण होऊन आपण त्याच्यासाठी काही करू शकलो तर कुणी कुणाचा ऋणी नाही."

दोडके यांनी कथासृष्टी अशाच अबोल पण उत्कट जिव्हाळ्याने चित्र भिजली आहे; माणुसकीच्या गहिवराने ती स्निग्ध-सुंदर झाली आहे. त्यांच्या वृत्तीतील सहृदयता पानोपानी प्रगट झाली आहे. "तिनं स्वेटर जमिनीवर टेवला. मान टाकून दिलेल्या नाजुक प्राण्यासारखा ता तिला वाटला." (पृ. ४). "घळ्याळाच्या जगातील आसवं डोळ्यांत होती; ओघळलेल्या आसवांच्या स्मृतिरेखा गालांवर होत्या." (पृ. ११). "त्याच्या गालावरील नाजुक भावनांच्या रेषा पुसून गेलेल्या होत्या. जगानं हिडिसफिडीस केलं तर हृदय हातात धोंडा घेऊन उभं राहतं." (पृ. १२८).

चपखल अलंकारांनी वर्ण्य विषय रंगविणे हे दोडके यांच्या शैलीचे आणखी एक बलस्थान आहे. "एखाद्या भिंतीवर तरुचा भरीव पर्णभार वाकावा त्याप्रमाणे तिच्या कानांवर केशांची रचना झाली होती." (पृ. १३९) या शब्दांत एका पानवालीचे वर्णन ते करतात; आणि त्यातून अभिप्रेत परिणाम साधला जातो.

'पिसाळलेले कुत्रे', 'टोपी' आणि 'संशय' या कथा सुमार आहेत. या संग्रहात त्यांना स्थान दिले नसते तर बरे झाले असते. काही वेळा दोडके यांची कथा अडखळते, अधेमधेच ती संपल्यासारखी वाटते; पण भावलावण्य हे तिचे पृथगात्म वैशिष्ट्य आहे; त्यातच तिचे खरे बळ सामावलेले आहे.

**हे. वि. इनामदार.**



# नेत्रपल्लवी

श्री. उमाकांत ठोमरे यांचा हा सहावा लघुकथासंग्रह. मराठी ललित साहित्याच्या क्षेत्रात श्री. ठोमरे यांनी गेल्या एक तपात बहुविध आणि बहुमोल अशी कामगिरी केली आहे. "वीणा" मासिकासारख्या उच्च कक्षेच्या नियतकालिकाचे कुशल संपादन, परकीय भाषेतील कथा-कादंबऱ्यांचा मराठीत अनुवाद, आकाशवाणीवरील नाट्यभाषिते, छद्मी परंतु Burlesque वजा न वाटणारे विनोदी लेख आणि लघुकथालेखन ही त्यांची संसिद्धी आहे. १९४९ मध्ये 'सुखदुःख' हा त्यांच्या कथांचा संग्रह प्रसिद्ध झाल्यानंतर त्यांनी बरेच लेखन केले आहे. "कानफाट्या" हा रूपांतरित विनोदी कथांचा त्यांचा संग्रह मूळ इंग्रजी कथांवरून लिहिला गेला असला तरी त्यांना मराठी पेहेराव चढविताना त्यांनी आपल्या समाजनिरीक्षण शक्तीचा आणि स्वतंत्र प्रतिभेचा उपयोग केला आहे.

ठोमरे यांचे कथालेखन जसे सांप्रदायिक नाही तसे नव्या लघुकथा प्रकारातही मोडण्यासारखे नाही. कथालेखनात लेखक आपापल्या प्रतिभेप्रमाणे नाना प्रकार निर्माण करू शकतो. अशा प्रकारांची उत्कृष्टता किंवा निकृष्टता अजमावण्याचा निर्णायक दंडक असू शकत नाही. कथा साधली आहे किंवा फसली आहे हे अखेरीस जो तो वाचक त्याच्या मनावर होणाऱ्या तिच्या प्रतिक्रिये-

लेखक — **उमाकांत ठोमरे,** प्रकाशक — पुं. ना. देशमुख, नागविदर्भ प्रकाशन, अमरावती. पृष्ठे : १२०, मूल्य : ४ रुपये.

वरच ठरवीत असतो. एखाद्या कथेत कथानक किंवा तदन्तर्गत घटना प्रमुख असतात तर दुसरीत एखादा मानवी, स्वभाव-विशेष केन्द्रस्थानी असतो. एखादी कथा छायाचित्रासारखी नुसती तपशील टिपणारी असेल तर दुसरीत काही सामाजिक प्रवृत्तींचा अथवा प्रेरक-शक्तींचा व्यापार असतो. प्रतीकात्मक कथांचा एक नवा प्रकार काही यशस्वी लेखकांनी रूढ करू घातला आहे. परंतु अशा कथा अद्यापि चलनी नाणे बनल्या नाहीत. मराठीतील मानसशास्त्रीय कथांचे परिवर्तन — वस्तुतः अधःपतन आज फ्रॉईडच्या Labido भोवती घोटाळत पडले आहे आणि अशा कथांच्या विरुद्ध महाराष्ट्रात हळूहळू सामर्थ्यवान अशी प्रतिक्रियाही निर्माण होऊ लागली आहे. सामाजिक आशयाऐवजी व्यक्तिभोवती गुंफलेल्या लघुकथाच मराठीत मोठ्या प्रमाणात लिहिल्या जात आहेत. ही घटना आमच्या लेखकांच्या सामाजिक जागृतीची पातळी कोठवर उंचावली आहे त्याचे गमक आहे. व्यक्तिकेंद्र झालेल्या कथांतूनही त्यांतील मुख्य व्यक्तिजालाच्या मध्यभागी बसून त्यावर सार्वभौमत्व गाजविणाऱ्या तन्तुनाभाप्रमाणे प्रखर प्रभावी दाखविण्या-ऐवजी परिस्थितीच्या प्रवाहात प्रतिहत झाल्याप्रमाणे दाखविण्यावरच आमचे लेखक अधिक भर देताना आढळतात. जीवनातील दुबळेपणावरच शोकान्त कथांचे यश अवलंबून असते असे या लेखकांचे तत्त्वज्ञान असावे असे वाटते. अनेक वेळा या लघुकथातील नायक किंवा नायिका म्हणजेच केन्द्रव्यक्ती मखरात मढवून बसवलेल्या न्हाणवलीसारखी हास्यास्पद वाटते. नायक जोरदार दाखवायचा असेल तर तो पर-पत्नीचे अपहरण करणारा मुंडेछाट पैरण पेहरून आखाड्यात उतरणारा, तमाशाच्या फडातून कोल्हाटणीला बेछूट उचलून नेणारा किंवा फार तर मिशांचे आकडे वळवून मराठे-शाहीची पगडी घालणारा पेशवाई-कालीन फाकडा दाखविला की या लेखकांना 'इत्यलम्' होऊ लागते. नायिका जोरदार दाखवायची असली तरी त्याचेही तंत्र आता ठरल्यासारखेच झाले आहे. स्वतः विवाहित असूनही नवऱ्याला चकवा देऊन भलत्यालाच भुरळ घालणारी नायिका सर्वांत प्रभावी. ती फारच लडिवाळ, खेळकर दाखवायची असेल तर चौपाटीवर ती भेळ खात बसणार, सी. सी. आय्. स्टेडियमवर क्रिकेट मॅच बघणार किंवा आपल्या घरी आपल्या प्रीतमला बोलावून बिर्याणी खायला घालणार. सामान्य माणसाचे जीवन वाढत्या महागाईने पराकाष्ठेचे दुरापास्त झाले असताना, मध्यम-वर्गीय कुटुंबातील हजारो कन्यका, बापाच्या अपुऱ्या पगारात थोडीशी भर घालण्याकरिता वर्षानुवर्षे वाढत्या वयाकडे दुर्लक्ष करून नोकरी-चाकरीत गुंतून पडलेल्या दोन्ही डोळ्यांना दिसत असताना आमच्या या क्रांतदर्शी लेखकांना या बिर्याणी-बहादुर मराठी बेगमा कोठे आढळल्या हा यक्ष प्रश्नच आहे. ग्रामीण म्हणून समजल्या जाणाऱ्या लघुकथांचा प्रकारही बहुंशी असाच बेगडी होऊ पहात आहे. मानवी जातीय (Sexual) भावनांचे सारे प्रकार शिळे झाल्यामुळे अनेक लेखक आता कुत्री, काळविटे आणि माजावर आलेल्या म्हशी यांच्या गर्भाशयात डोकावू लागले आहेत. मराठी लघुकथेच्या दुरवस्थेची ही दुश्चिन्हेच समजली पाहिजेत.

सुदैवाने श्री. ठोमरे यांच्या या नेत्रपल्लवीत "दुसरी सावली" ही निकृष्ट कथा व 'वत्सला' ही आक्षेपार्ह कथा सोडली तर असा उद्वेगजनक प्रकार सहसा आढळत नाही. त्यांच्या कथांचे स्वरूप तसे सोज्ज्वळ आहे आणि "ऋणानुबंध, नवोढा, त्याचे जग बदलले, झाकली मूठ, आनंदी गेली, दोस्त बाबू पुर्नाळे!" इत्यादी कथांत तर माणुसकीचा ओलावा व गृहस्थी वातावरणाची प्रसन्नता आहे.

कथा रंगविण्यासाठी श्री. ठोमरे एक विशिष्ट तन्त्र अवलंबितात. चित्रफलकावर नदी प्रामुख्याने दाखवायची असेल तर अनेक कलावंत पार्श्वभूमीसाठी आकाश, डोंगर-दऱ्या, झाडेझुडुपे गडद रंगाने सुरवात करीत करीत नदीपर्यंत अस्फुट करीत आणतात व पुन्हा नदीला गडद रंगाने उठाव देतात. 'ऋणानुबंध' या पहिल्याच कथेत ब्राह्मण जातीच्या शाळकरी मुलाचा, त्याच्याच वर्गातील साळी जातीच्या व्यंकण्णाशी जडलेला स्नेहभाव दाखविताना श्री. ठोमरे यांनी या दोन्ही समाजातील आचार-विचारांची आणि राहणीची भिन्नता गडद रंगाने दाखवून अखेरीस दादा आणि बबनभाऊ यांच्या प्रेमळ, प्रांजळ आणि उदार स्वभावातील साम्याचे सौम्य रंग रेखाटलेले आहेत. बेकार झालेला बबनभाऊ दादांच्या साहाय्याने विणकराचा धंदा सुरू करतो आणि मोठेपणी व्यापार-धंद्यात यश मिळविल्यानंतरही दादांचा मुलगा व आपला धाकटा भाऊ व्यंकण्णा याचा लहानपणीचा मित्र बाळ याची आठवण ठेवून बाळच्या मुलीला भरजरी साडी भेट म्हणून द्यायला त्याच्या घरी

जातो. हा घरगुती प्रसंगच पण श्री. ठोमरे यांच्या लेखणीने परिणामकारक रीतीने रंगविला आहे. 'नवोढा' आणि 'झाकली मूठ' या कथाही अशाच कौटुंबिक वातावरणातील आहेत. 'झाकली मूठ' ही एक आकर्षक कथा आहे. लोकलगाड्यांत हल्ली टोळी-टोळीने अनेक उतारू 'रमी' खेळत बसतात व त्यावर थोडे पैसेही मजेखातर लावतात. रमी न खेळणारा पण अशा कंपूत बसणाऱ्या दामले नावाच्या कारकुनाची ही कथा आहे. या कथेतील लोकलगाड्यांत चालणाऱ्या रमीच्या डावांचे वर्णन मोठे प्रत्ययकारी वाटते. कमल दामलेला जबरदस्तीने पोलीसठाण्यावर गुन्ह्याची वर्दी देण्यासाठी नेतो तो प्रसंग वर्णिताना निर्माण केलेला विनोद ही श्री. ठोमरे यांची एक विशिष्ट लकब आहे. 'रेती पाठवून द्या' हीही अशाच गंभीर प्रसंगातून विनोद निर्माण करणारी कथा आहे.

यशस्वी लघुकथेला तात्त्विक आशय नित्य असावाच लागतो असे नाही. अर्थात अशा कथा चटकदार असल्या तरी त्यामुळे त्या लेखकाचे स्थान उंचावू शकत नाहीत हे सत्य होय. प्रस्तुत संग्रहातील "त्याचे जग बदलले," "मेंढी......मेंढी...मेंढी" आणि "क्षमा! क्षमा!" या कथा उल्लेखनीय होत.

"क्षमा! क्षमा!" ही एक आशयघन कथा. तिचा विषय रंगवायला कठीण. पण श्री. ठोमरे यांनी आपल्या कुशल शैलीने ती एक बहारदार कथा करून सोडली आहे.

एका रात्रीत श्रीमंत होण्याची स्वप्ने पाहणाऱ्या वामनरावाचा, आयुष्यातल्या हारजितीने विद्ध होताच, मनाचा समतोल कसा ढळतो व त्या परगतीत त्याचे स्वतःचे जीवन त्याला शून्यवत वाटू लागते एवढेच नव्हे तर मानवी प्राणांचे मोलही त्याच्या लेखी कसे शून्यवत होते याचे सूक्ष्म, स्पंदनमय दर्शन करविणारी श्री. ठोमरे यांची "मेंढी...मेंढी...मेंढी" ही कथाही नेत्रपल्लवीला यशाचा पालव देणारी एक कथा आहे. मध्यमवर्गीय माणूस आर्थिक घसरगुंडीला लागला की त्याच्या आयुष्यात त्या साऱ्या परंपरा कशा तुटतात आणि व्यक्तिमत्त्वाची राखरांगोळी होऊन न कल्पिलेल्या कृतीही त्याच्या हातून कशा घडतात ते नाट्यतंत्राचा अवलंब न करिता श्री. ठोमरे यांनी मोठ्या कुशलतेने रंगविले आहे.

"क्षमा! क्षमा!!", "मेंढी...मेंढी...मेंढी" या कथांतील गती श्री. ठोमरे कायम ठेवतील, 'वत्सला' कथेतील धोकेबाज व अनिष्ट वळणापासून स्वतःला वाचवतील आणि व्यक्तिजीवनावर सामाजिक प्रवृत्तींच्या प्रचंड आघातांची दिशा व मर्म ओळखतील तर ते एक यशस्वी कथालेखक म्हणून पुढे येऊ शकतील.

ही सिद्धी बाह्यतंत्राची उपासना करूनच प्राप्त होत नाही. त्यासाठी चिंतनाचा आणि जाणिवेचा टप्पा वाढवावा लागतो. बहिर्गोल काचेतून सूर्याचे किरण असे एका बिंदूवर सम्मीलित केले असता त्यातून एक दाहक शक्ती निर्माण करता येते. तसेच व्यक्तीचे दर्शन सामाजिक किरणांच्या एकीभूत शलाकेतून करावे लागते. ते करू शकणारा कलावंतच 'श्रेष्ठ' या पदवीला पोहोचू शकेल.

**खंडेराव सुळे**



# अत्रे आणि रंगभूमी —

श्री. गोमकाळे यांनी लिहिलेले "अत्रे आणि मराठी रंगभूमी" हे पुस्तक नुकतेच प्रसिद्ध झाले आहे. श्री. गोमकाळे हे एक समतोल समालोचक या नात्याने मराठी वाचकांना परिचित आहेत. या प्रस्तुत ग्रंथात त्यांनी अत्रे यांची सुखात्मक व गंभीर नाटके अशी विभागणी करून त्यांचे समालोचन केले आहे. त्यांच्या मत अत्रे यांनी एक नवीन प्रथा, एक नवीन विचार नाट्यविषय साहित्यात आणला, ही गोष्ट अमान्य होण्यासारखी नाही.

या समालोचक ग्रंथाची आठ प्रकरणे असून त्यात केलेले विवेचन हे तुलनात्मक आहे, व श्री. गोमकाळे हे न्यायाधीश असल्याने जाणीवेने समतोलपणा राखून

गुणदोषांचे माप घातले आहे. पहिल्या प्रकरणात श्री. अत्रे यांनी कोणत्या नाट्यविश्वात पदार्पण केले याचे वर्णन केलेले आहे. अत्रे हे साहित्याच्या या क्षेत्रात श्री. गडकरी यांचा गंडा बांधूनच प्रवेश करते झाले. नाट्याच्या यशाची जर प्रायोगिक यश ही कसोटी मानली तर, अत्रे यांची नाटके सुरुवातीला त्याच कारणाने यशस्वी झाली, व नंतरच्या काळात अन्य साहित्य क्षेत्रांतील त्यांची लोकप्रियता त्यांच्या नाटकांना यश देत गेली, हे उघड दिसते. "अत्र्यांचे कोणतेही नाटक रंगभूमीवर अयशस्वी झाले नाही" हा श्री. गोमकाळे यांचा अभिप्राय यथार्थ आहे. अत्र्यांच्या नाटकांतील लोकप्रियता ही निरनिराळ्या कसोट्यांवर परीक्षिली असता ती पोकळ नाही, असे दिसून येते. केवळ पिटा-मधील प्रेक्षकांसाठी अगर विदूषकद्वारा काही तरी सांगून काही तरी विनोद उत्पन्न करून लोकप्रियता मिळवा-वयाची, हे तंत्र अत्रे यांनी अंगिकारिले असले तरी अन्य गोष्टी अत्रे यांच्या नाटकात असल्याने विनोदाव्यतिरिक्त काहीतरी बौद्धिक आकर्षण त्यांच्या नाटकांत आहे, हे मान्य करावे लागते. नाटककार हा जीवनाचा भाष्यकार असतो, हे अत्रे नाटक लिहिताना विसरले नाहीत. पहिल्या प्रकरणात अत्रे यांच्या विविध नाटकांचा जन्म-वृत्तान्त दिला आहे. अत्रे यांनी दुःखान्त नाटक लिहून आपल्या टीकाकारांनाही आश्चर्यचकित केले आहे. त्याचबरोबर त्यांची चांगली नाटके चांगल्या रीतीने बसविली गेली म्हणून ती अधिक चांगली झाली, हा तत्कालीन टीकाकारांनी दिलेला अभिप्राय अगदी योग्य वाटतो.

समालोचनाच्या दुसऱ्या प्रकरणात श्री. गोमकाळे यांनी अत्र्यांच्या वाङ्मयीन नाट्यविश्वाचे अवलोकन केले आहे आणि ते समालोचन सूक्ष्मरीतीने केलेले आहे. "नवनाट्याचे जे बाह्य तंत्र समजले जाते ते बहुतांशाने व कटाक्षाने पाळून नाटके गाजविणारांत अत्रे हे पहिले नाटककार आहेत, हा त्यांचा निष्कर्ष अमान्य करता येणार नाही. गोमकाळे म्हणतात त्याप्रमाणे नवनाट्यात वेगळे अगर नवीन असे काही नव्हते. नवे नाटक अगर जुने नाटक हे कोणतेही असले तरी त्यांमध्ये नाट्य आवश्यक असते. जे काही नवनाट्य येत होते, ते भारतातील परिस्थितीतून साहजिक व स्वाभाविकपणे प्रगट झाले नव्हते. त्याची सारी पार्श्वभूमी पाश्चात्त्य होती. आणि या प्रश्नासंबंधी श्री. गोमकाळे यांनी केलेले विवेचन साधार व सुबोध आहे. भारतीय जीवनातून ते नवनाट्य न आल्याकारणाने ते सर्व अनुकरणात्मक होते, आणि त्याचा परिणाम म्हणजे वधूच्या रूपापेक्षा तिच्या भूषणावर तिचे सौंदर्य ठरविण्यासारखे होते. नवतंत्र म्हणजे वास्तववादी नाट्य हाही सिद्धान्त बरोबर नाही, हे श्री. गोमकाळे यांनी स्पष्ट केले आहे. आणि साधनाला साध्य ठरवून नवनाट्याचे पोवाडे गाविले गेले, आणि लोकांनाही त्यातील विशेष गम्य नसल्याकारणाने नव-नाट्याचा बोलबाला झाला. प्रसिद्ध नाटककार शॉ याने "चतुर, चुरचुरीत चर्चात्मक संवाद म्हणजे नाटकाचा आत्मा" अशी विचारसरणी मांडली, आणि त्याचेच प्रत्यंतर मराठीतील नवनाट्यातून दिसून आले. संवाद अगर चर्चा ही महत्त्वाची नसून त्याचा विषय महत्त्वाचा असतो आणि तो विषय प्रभावीपणे परिणाम-कारकपणे नाटकात दिसून आला तरच ते नाटक श्रेष्ठ. तथापि, आमच्याकडील विद्वान यांनी फक्त तंत्रालाच महत्त्व दिले. या साऱ्या प्रकरणात नवतंत्रातील प्रत्येक बाजूचा विचार विस्ताराने श्री. गोमकाळे यांनी केला आहे, हे या पुस्तकाचे अभिजात स्वरूप मी मानतो. नवनाट्य म्हणजे सामान्य व्यक्तीला जे वाटते, ते योग्य शब्दांत, पात्रांच्याद्वारे येणे ही व्याख्या बरोबर वाटते. पाश्चात्त्य नवनाटकांचे आवाहन केवळ भावनेला नव्हते, केवळ बुद्धीला नव्हते, ते व्यक्तीच्या भावनात्मक बुद्धीला जागृत करणारे असे होते, याची पूर्ण नोंद आपल्या-कडील आधुनिक नाटककारांनी घेतलेली नाही. या प्रकरणात श्री. गोमकाळे यांनी इंग्लंड व अन्य पाश्चात्त्य देशांतील नाटककारांच्या कृतीची चर्चा केली असून ती फारच उद्बोधक आहे. आपल्याकडील नाटकांत विश्वात्मकता व सौंदर्य जसे व ज्या प्रमाणात इब्सेनच्या नाटकांत दिसून येते, तसे दिसून येत नाही, ही गोष्ट श्री. गोमकाळे यांनी स्पष्ट केली आहे. केवळ नमुन्याबर-हुकूम मूर्ती निर्माण केल्याने मूर्तीत चैतन्य निर्माण होत नाही, त्यासाठी व्यापक अनुभव व वेचक नाट्यदृष्टी कलाकाराला उपलब्ध हवी असते.

नवनाट्यासंबंधी तंत्र व मंत्र धरून सर्वसाधारण विचार मांडल्यानंतर श्री. अत्रे यांची नाटके खरोखरच नवनाट्य या सदरात पडतात की नाही ? या प्रश्नाचा विचार श्री. गोमकाळे यांनी नंतर केला आहे. आणि

असा अभिप्राय व्यक्त केला आहे की, नाटय अविष्कार नवीन असला तरी, नाटकाचे अंतरंग सनातनी हिंदूंचे होते, त्यांचे अंतरंग सनातनी होते, आणि यशस्वी नाटय अविष्कार त्यांच्याजवळ विशेष प्रतिभा असल्याने ते करू शकले. नवविचाराचे अभिमानी अत्रे आहेत. तथापि, मौलिक नवविचार त्यांना तितके स्फुरले नाहीत, हा गोमकाळे यांचा अभिप्राय सामान्यपणे योग्य दिसतो. "लेखकाच्या मनात जे आत्मवत संस्कार असतात, ज्या निग्रांनी त्यांच्या मनात कायमचे स्थान केलेले असते, त्यांनी त्या व्यक्तीचा मूळ पिंड त्याला नकळतच घडविलेला असतो, कलावंतांची अवलोकन शक्ती मार्मिक असते, वेचक असते, व तिच्या साहाय्याने जीवनातील प्रभावी नाटय तो वेचून घेत असतो, हे खरे. पण त्या नाटयाचा आविष्कार त्या व्यक्तीच्या उपजत पिंडावर अवलंबून असतो, त्या शक्तीवर मात करण्याचे सामर्थ्य त्या कलावंतांत नसते." ही श्री. गोमकाळे यानी प्रतिपादलेली विचारसरणी अगर कारणमीमांसा बरोबर वाटते. आणि याच दृष्टीने त्यांनी अत्र्यांच्या नाटकांचे समालोचन केले आहे. अत्रे हे द्विविध स्वरूपाचे आहेत. गंभीर हा मूळ स्वभाव पण आयुष्यात आलेल्या अनुभवाने त्यांच्या जीवनाने विनोदाचा मुखवटा धारण केला आहे. श्री. कुलकर्णी यांनी म्हटल्याप्रमाणे "अत्रे अभिनव विचाराचे प्रगतीपथावरचे पण त्यांचा पिंड पुराण मनाचा आहे. बोलणे आहे पुढचे पण वागणे आहे मागचे." उपमाच द्यायची झाली तर, पाव खातील, पण पत्रावळीवर ठेवून आणि या त्यांच्या वृत्तीमुळे त्यांनी अनेकांच्या मनात गैरसमज उत्पन्न केले आहेत. खुद्द अत्रे वाङ्मय म्हणजे जीवनाचा अनुभव, कलेचा विकास नव्हे, असे म्हणतात. मनाचा तोल गेला असताना आणि हा त्यांच्या बाबतीत नेहमीचा अनुभव आहे. ते मग संयमाची, संकेताची व अनेक प्रसंगी सद्‌भिरुचीची बंधने सोडून देऊन बोलतात. पण ती त्यांची प्रकृती नाही. ती विकृती आहे. त्यांची प्रकृती गुणांची पूजक आहे. सुवासावर लुब्ध होणाऱ्या भ्रमराची आहे आणि त्यामुळे त्यांच्याबद्दल गुणग्राहकता व्यक्त करणारे अनेक लोक आहेत.

सतत निरीक्षण, सतत आयुष्यात जाणीवेने अनुभव घेणे, यामुळे श्री. अत्रे यांना महाराष्ट्रीय जीवनाचा चांगला परिचय आहे. व अनेक अर्थांनी त्याच्याशी ते समरस झाले आहेत. श्री. गोमकाळे यांनी अत्रे हे अहंकाराला बळी पडले नाहीत, असे लिहिले आहे. अनेकांना हा त्यांचा अभिप्राय मान्य होणार नाही. उलट अत्रे हे सयुक्तिक टीकेला सुद्धा हळवे व नाजूक मनाचे आढळून आले आहेत. आणि टीकाकारांच्यावर झोड उठवताना त्यांची मूठ मखमली मोज्यांनी झाकलेली नसते. उघड उघड ते वाघनखांचा उपयोग करतात. महाराष्ट्रीय जीवनाशी समरस झाल्यामुळे काही पारंपरिक श्रद्धा त्यांच्या जीवनात व नाटकांत आढळून येतात. जीवनातील अन्याय, दंभ, व विसंगती याविरुद्ध विनोद हे प्रभावी हत्यार त्यांनी वापरलेले आहे. तथापि, निर्भेळ आदर्शवाद हा त्यांच्या स्वभावात म्हणून नाटकात आढळून येत नाही. आणि या दृष्टीने श्री. गोमकाळे म्हणतात त्याप्रमाणे भंजनापेक्षा तडजोड करणे त्यांना स्वाभाविक वाटते. अत्रे यांच्या नाटकांवर अनेक पाश्चात्य नाटककारांचा परिणाम झाला आहे, हे उघड आहे. किंबहुना आधुनिक मराठी साहित्य, कथा, कादंबऱ्या, नाटके ह्या सर्व क्षेत्रांत जी निर्मिती झाली आहे तिची प्रेरणा ही इंग्रजी साहित्यातील आहे. तथापि, पाश्चात्त्य नाटककारांचा संपूर्ण आदर्शवाद अत्र्यांना उचलता आला नाही हे श्री. गोमकाळे यांनी स्पष्ट केले आहे. आणि त्यामुळेच खऱ्या अर्थाने अत्रे हे वास्तववादी नवनाटयकार आहेत, असे म्हणता येणार नाही, हे श्री. गोमकाळे यांनी दिलेले मत अनेकांना मान्य होण्यासारखे आहे.

तिसऱ्या प्रकरणात श्री. गोमकाळे यांनी अत्र्यांच्या नाटकांवरील काही ठळक आक्षेपांचा विचार केला आहे. पाश्चात्त्य नाटककारांकडून त्यांनी विचार उसनवार घेतले, पात्रांच्या कल्पना घेतल्या ही गोष्ट उघड आहे. पूर्णपणे स्वतंत्र व ज्याचा अतिताशी संबंध नाही, असे साहित्यात काहीही आढळून येत नाही. नवा वृक्ष सुद्धा जुने बीज लावूनच निर्माण होत असतो. आणि त्यामुळे त्या वृक्षाची छाया अगर सौंदर्य कमी लेखण्याचे कारण नाही. कोणत्या कोणत्या नाटकांत कोणकोणती पात्रे पाश्चात्त्य नाटकांतील कोणत्या पात्रांचे मुखवटे दाखवतात, ह्या सर्वांचा विचार या प्रकरणात केला आहे. सर्वसामान्यपणे घेतलेले आक्षेप व त्याला प्रसंगा-प्रसंगाने अत्रे यांनी दिलेली उत्तरे, ह्या सर्वांना विचार करता

श्री. गोमकाळे यांनी जो अभिप्राय व्यक्त केला आहे, तो सामान्यपणे मान्य होण्यासारखा आहे. मोलीअर या नाटककाराने म्हटले आहे की, "माझ्या कलेची सामग्री मी कोठूनही का आणलेली असेना, ती सामग्री मी स्वतः निर्माण केलेल्या माझ्या कलेच्या मुशीत मी आधी ओततो आणि नंतर तिला मी माझ्या कलेचा सजीव आकार देतो" हेच खरे. कलाकृती ही श्रेष्ठ का कनिष्ठ ? हे ठरविताना समीक्षकाने उच्च आहे की नाही, एवढेच सांगावयाचे आहे, तिला लागलेली साधन-सामुग्री कोणत्या पेठेतून आणली ? का चोर बाजारातून आणली ? याचा विचार करायचा नसतो. ही भूमिका श्री. गोमकाळे यांनी घेतली आहे. ती जरा एकांगी वाटते. सुग्रण गृहिणीला सुद्धा माल चांगला असेल तर, पदार्थ चांगला करता येतो आणि म्हणून हात गोड नसतो, पदार्थ गोड असतात. म्हणून पदार्थ व हात या दोघांमध्ये न्याय देणे जरूर असते, तशी वृत्ती समीक्षकाची असली पाहिजे, असे माझे मत आहे.

चौथ्या प्रकरणात समीक्षणाची दृष्टी, मर्यादा व निकष यासंबंधी सर्वसामान्यपणाने समीक्षकांनी विवेचन केले असून त्याला अनुसरून अत्र्यांच्या नाटकांचे परीक्षण केले आहे. हे सारे प्रकरण साहित्यशास्त्राच्या विद्यार्थ्यांनी अवश्य वाचावे, असे आहे. मूल्यमापनाचे सिद्धान्त सांगताना श्री. गोमकाळे यांनी जे विवेचन केले आहे, ते मौलिक आहे. नाटकाचे चिरंतन सिद्धान्त सांगताना सर्वच सिद्धान्त चिरंतन नसतात, पण निश्चितपणे काही सिद्धान्त चिरंतन व देहाला आत्मा त्याप्रमाणे नाटकात त्याचे स्थान असते. नाटक लोकप्रिय झाले म्हणजे ते उत्कृष्ट ही कसोटी बरोबर नाही. तथापि, प्रेक्षक नसेल तर नाटक नाहीच हेही उघड आहे. "नाटकाचा शिल्पकार" प्रेक्षक हे खरे आहे. त्याचप्रमाणे विश्वात्मकता व देशकालातीत व्यापकत्व ही नाटकात असल्याशिवाय ते आकर्षक होऊ शकत नाही. रसवत्ता येण्यासाठी या गोष्टींची आवश्यकता असते. प्रेक्षक हा व्यक्ती म्हणून येतो, पण त्याचे मन सामूहिक असले म्हणजेच रंगते आणि सामूहिक मन रंगावयाचे तर, नाटकामध्ये विश्वात्मकता हवी. आणि या निरनिराळ्या कसोट्यांवर श्री. गोमकाळे यांनी अत्र्यांच्या नाटकांवर परीक्षण केले आहे. नाटक म्हणजे पहावयाचे हे उघड आहे. म्हणून त्याचा प्रयोग हा महत्त्वाचा भाग आहे. ते जर टिकाऊ व्हावयाचे असेल तर, त्यामध्ये वाङ्मयीन कलाकृती हवी असते. त्यातील वाङ्मयीन भाग असा असला पाहिजे की, नाट्याला त्याने परिणामकारक, भावनोत्कट रसपूर्ण केले पाहिजे, व असे झाले म्हणजे प्रेक्षकांची अभिरुची उंचावते. आणि ती उंचावण्याच्या कामी गंभीरता नाट्यविषयात असली पाहिजे. चौथे प्रकरण वर सांगितल्याप्रमाणे ह्या ग्रंथातील विशेष आकर्षक व अभ्यसनीय भाग झाला आहे.

प्रकरण पाच व सहा यांत अत्र्यांच्या नाटकांचे सुखात्मक व गंभीर असे वर्गीकरण करून अत्र्यांच्या सर्व नाटकांचा निर्भीडपणे अगर जास्तीत जास्त निर्भीडपणे ग्रंथकाराने विचार केला आहे. अत्र्यांच्या नाटकांबद्दल आतापर्यंत अनेक टीकाकारांनी लिहिले आहे. कोणी चांगले, कोणी टीकात्मक. तथापि, श्री. गोमकाळे यांचा अभिप्राय अधिक समतोल वाटतो. अत्र्यांची नाटके सामाजिक प्रश्नांचा विचार करतात, हे उघड आहे. आणि म्हणूनच त्यांची नाटके वादविवादाचा विषय बनतात. त्यांच्या नाटकातील पात्रे पाश्चात्त्य नाटकांतील उसनवारीने आणली आहेत, हा पण एक आक्षेप आहे, त्याचाही परामर्श श्री. गोमकाळे यांनी घेतलेला आहे. मला वाटते, सर्वस्वी नवीन ज्याबद्दल काहीही गतवाङ्मयात उल्लेख नाही, असे लिहिणे आजच्या युगात कठीण आहे. "त्या, त्याच कल्पना परी काव्य रचनेत आहे" हा सिद्धान्त महत्त्वाचा आहे. माझे स्वतःचे मत असे आहे की, श्री. अत्रे यांची नाटके त्या त्या कालात प्रेक्षणीय ठरली, व त्यांचे वाङ्मयीन मूल्य भविष्यकाळ ठरविणार आहे. जे समीक्षण करावयाचे आहे, ते या समीक्षण करणाऱ्या ग्रंथाचे आहे. नाटकांचे समीक्षण करावयाचे हे दुय्यम आहे. नाट्यतंत्र, कथानक, स्वभावचित्रण आणि संवाद ह्या तिन्ही दृष्टींनी अत्र्यांच्या नाटकांचे समीक्षण आजपर्यंत अनेकांनी केले आहे आणि त्यात सर्वत्र समतोल राहिलेला नाही. गुण व दोष दोन्हींच्या बाबतींत बाजू धरून असे काही लिहिलेले नाही. अत्र्यांच्या नाटकांतील संवाद, भाषा, संगीत आणि विनोद ह्या गोष्टींचा विचार श्री. गोमकाळे यांनी सातव्या प्रकरणात स्वतंत्रपणे केला आहे. आणि तेही प्रकरण माझ्या दृष्टीने साहित्यशास्त्राच्या विद्यार्थ्यांनी अभ्यासावे असे आहे. शेवटल्या प्रकरणात अत्र्यांच्या यशापयशाचे श्री. गोमकाळे यांनी मूल्यांकन केलेले आहे. अत्रे ही व्यक्ती उत्कट व अतिरेकी आहे, व हीच गोष्ट त्यांच्या नाटकांत, लेखनात व भाषणांतही अनिवार्यपणे अभिव्यक्त होते. अत्रे हे दोषरहित

अनुक्रमणिका

आहेत, असे अत्रेही म्हणणार नाहीत, किंबहुना निर्दोष अशी व्यक्ती अगर निर्दोष असा साहित्यिक विरळा असतो, आणि ही मानवी भावना मनात ठेवून श्री. गोमकाळे यांनी अत्रे यांच्या नाटकांचे परीक्षण केले आहे. त्यांनी ह्या शास्त्रांतील प्रमेये मांडली आहेत, कसोट्या निदर्शित केल्या आहेत, एका दृष्टीने मानदंड तयार केला आहे. आणि म्हणूनच या ग्रंथाचे महत्त्व आहे. ग्रंथकार हे अभिनंदनास पात्र आहेत.

न. वि. गाडगीळ



# सिनिकच्या कथा

खरे म्हणजे या संग्रहाचे लेखक नावाने अगर टोपण नावाने 'सिनिक' असले तरी ते वृत्तीने सिनिक नाहीत. आणि त्यांनी कथा म्हणून जे काही लिहिले आहे त्या कथा नाहीत! सिनिक म्हणजे अश्रद्ध माणूस. पण स्वतः लेखकांनी प्रस्तावनेत म्हटल्याप्रमाणे त्यांची मानव्यावर श्रद्धा आहे आणि बुद्धिवादावर भक्ती आहे. अर्थातच सिनिक हे नाव केवळ 'विशेष' नावापुरतेच खरे मानायचे. ज्याला कथा हा वाङ्मयप्रकार मानतात त्याची काही वाङ्मयीन वैशिष्ट्यं असतात. त्याच्या रचनेची एक पद्धत असते, काही एक तंत्र असते. या संग्रहातील बहुतेक कथांत त्यांचा बहुतेक अभावच आढळतो. 'रेसचे घोडे' हा तर छोटा स्फुट लेखच आहे. 'तुळजा' हे केवळ शब्दचित्र आहे. इतर कथांत कथेला आवश्यक असा मालमसाला आहे पण वाचकांपुढे आलेल्या पानांत त्याचा तयार पाकप्रकार न वाढता तो मसालाच कच्च्या स्वरूपात वाढण्यात आलेला आहे. एखादा विशिष्ट विचार पुढे मांडण्यासाठीच मुद्दाम ही सामग्री गोळा केलेली स्पष्ट दिसते.

तरीपण या कथा कथा नसल्या तरी खास वाचनीय आहेत, विचारार्ह आहेत. 'विठ्ठल मामा', 'रामस्वामी आणि त्याची बायको', 'गर्दी' या गोष्टी तर विशेष चटकदार वाटतात.

या संग्रहाचे आणखी एक वैशिष्ट्य म्हणजे त्यात आढळून येणारी निजामशाही राज्यातील जीवनाची वैशिष्ट्ये-आणि त्यांचे चारकाचे. तसेच कथेत प्रत्येक जीवन-मूल्याविषयी जे भाष्य येते ते कथेच्या कलात्मक भागास शोभण्यासारखे नसले तरी ते इतके प्रभावी आहे की त्याची प्रशंसा करणे अगत्याचे वाटते.

'मराठवाडा' साप्ताहिकात ठराविक जागेत, ठराविक कालांतराने या सर्व गोष्टी प्रसिद्ध झालेल्या असल्याने त्यांत कथेला आवश्यक असणारा रसपरिपोष आलेला नाही. प्रत्यय पूर्ण परिणामकारक वठण्याला जो थोडा विस्तार लागतो तो न मिळाल्याने लेखनात त्रुटितपणा जाणवतो. पण जीवनाकडे–जीवनमूल्यांकडे पाहण्याची लेखकाची जी सश्रद्ध आणि जिव्हाळ्याची दृष्टी आहे ती खास अभिनंदनीय आणि चालू काळात अधिक स्वागतार्ह आहे.

वा. कृ. गलगली

---

लेखक — 'सिनिक'. प्रकाशक — मराठवाडा साहित्य परिषद, औरंगाबाद. किंमत रु. ३·५०.



# अर्वाचीन मराठीतील खंडकाव्ये

१९५० पर्यंतच्या शतकात खंडकाव्य हा वाङ्मय-प्रकार निर्मितीच्या नव्हे परंतु विवेचनाच्या दृष्टीने दुर्लक्षितच राहिला. अशा उपेक्षित वाङ्मयप्रकाराचा सविस्तर आणि समग्र असा परामर्श घेऊन लेखकाने मराठी टीकावाङ्मयात मोलाची भर टाकली आहे यात संशय नाही.

प्रबंधाच्या पहिल्या भागात खंडकाव्याविषयी तात्त्विक, साहित्यशास्त्रीय विचार, तसेच, खंडकाव्याच्या विशेष प्रवृत्ती, विषय, रचनाप्रकार, पदपद्धती यांच्याद्वारा या वाङ्मयप्रकाराचा झालेला विकास यांची चर्चा केलेली आहे. दुसरा भाग हा इ. स. १८५० ते १९५० या काळात झालेल्या खंडकाव्यांचे पौराणिक, ऐतिहासिक, कल्पनारम्य, सामाजिक असे विषयवारीने, कथाप्रकारा-नुसार वर्गीकरण व अनेक खंडकाव्यांचे सविस्तर समा-लोचन करण्यासाठी योजला आहे. ग्रंथाच्या अखेरीस 'अकथात्मक दीर्घकाव्ये' हे परिशिष्ट आणि ग्रंथनिविष्ट खंडकाव्यांची कालानुक्रमे सूची दिली आहे.

लेखकाने निवेदनात म्हटल्याप्रमाणे "प्रस्तुत प्रबंधाच्या पहिल्या प्रकरणात विस्ताराने खंडकाव्याचा साहित्यशास्त्रीय सात्त्विक विचार" (निवेदन–पृ. ४) केलेला आहे. 'आधुनिक खंडकाव्य' या अनिलांच्या 'भग्नमूर्ती'ला जोडलेल्या लेखाचे खंडन (पृ. १५ ते १७, १९ ते २१, २३, २४) आणि लघुकथा, नाटक, कादंबरी, नाट्यगीत, महाकाव्य, भावगीत या वाङ्मय-प्रकारांचे खंडकाव्याशी तुलनात्मक अध्ययन (पृ. १७, ६, २२, २५, २६) या मंथनातून "खंडकाव्याची व्याख्या करताना आशयाचे आणि आविष्काराचे जे गुणधर्म आहेत त्यांच्या समुच्चयाने करावी; परंतु विषयाची व्याप्ती ठरविताना खंडकाव्याच्या आविष्काराची पद्धती ज्या काव्यांनी स्वीकारली आहे, त्या सर्वांची गणना करावी हाच उत्तम मार्ग होय" (पृ. ३७), असा वेगवेगळा दृष्टिकोन व्याख्या व व्याप्ती यांच्या निश्चितीसाठी स्वीकारला आहे.

वास्तविक व्याख्या व व्याप्ती या गोष्टी अशा अलग करणे शास्त्रशुद्ध चिकित्सेस मान्य नाही. कारण अति-व्याप्ती किंवा अव्याप्ती हे दोष व्याख्येत येऊ नयेत म्हणून प्रथमतः व्याप्ती निश्चित करून मग व्याख्येकडे जावे लागते. विशेषतः वाङ्मयीन मूल्य किंवा वाङ्मयप्रकाराचे निकष ठरवताना निगमनपद्धतीचा ( Inductive Method ) अवलंब आवश्यक असतो आणि प्रचलित वाङ्मयप्रकाराची व्याप्ती निश्चित केल्याखेरीज निगमन-पद्धतीने निर्दोष व्याख्येकडे जाणे अशक्य होते.

व्याख्येसाठी कथामूल्याच्या मंडनापेक्षा विचारमूल्याच्या खंडनाकडे अधिक लक्ष पुरवल्यामुळे की काय या उपेक्षित वाङ्मयप्रकाराची व्याख्या करताना लेखकाने शास्त्रशुद्ध चिकित्सेस आवश्यक अशा निगमनपद्धतीची उपेक्षा केलेली दिसते.

यामुळेच लेखकाच्या खंडकाव्याच्या व्याख्येत अनेक सैल दुवे राहिलेले दिसतात; एवढेच नव्हे तर खंडकाव्याच्या वर्गीकरणावरही या गोष्टीचा जाणवेल इतका परिणाम झालेला दिसतो.

ज्या "पाच धर्मांपैकी कोणताही एक धर्म त्याचे व्यवच्छेदक लक्षण म्हणून सांगता येत नाही" (पृ. ३७), अशा पाच 'विशेष गुणधर्मां'च्या आधारावर लेखकाने स्पष्ट शब्दांत 'व्याख्या' या मथळ्याखाली खंडकाव्याची व्याख्या दिली आहे ती अशीः— "मानवी जीवनाच्या कोणत्याही एका विशिष्ट मर्यादित अंगाचे वस्तुनिष्ठ, रसोत्कट दर्शन घडविणारे पद्यरूप कथाकाव्य म्हणजे खंडकाव्य होय." (पृ. ३८).

यानंतर लगेच 'व्याप्ती' या मथळ्याखाली 'पद्यरचना (पृ. ३८) व 'दीर्घता' (पृ. ४०) हे खंडकाव्याचे बाह्य विशेष आहेत असे सांगून 'कथा' (पृ. ३८–३९) हा आणखी एक विशेष आहे असे म्हटले आहे. या अनुषंगाने 'विलापिका, चिंतनिका, प्रसंगवर्णनपर दीर्घकाव्ये, निसर्गवर्णनपर दीर्घकाव्ये यांना खंडकाव्याच्या पोतडीत कोंबणे म्हणजे खंडकाव्यातील कथामूल्याची अवगणना करण्यासारखे आहे.'; तसेच निश्चित व्याख्या नसल्याने संस्कृतात ही सारीच खंडकाव्ये मानली जात असेही म्हटले आहे. (पृ. ३९)

यावरून एक गोष्ट लक्षात येईल की लेखकाने कथामूल्य हे खंडकाव्याचे व्यवच्छेदक लक्षण आहे असे शब्दाने जरी मानले नाही तरी प्रत्यक्ष विवेचनात,

अनुक्रमणिका

व्याख्येत, वर्गीकरणपद्धती व त्या विवेचनात, आणि परिशिष्टातही ( अकथात्मक दीर्घकाव्ये–पृ. ४४७), तेच प्रधानमूल्य व व्यवच्छेदक लक्षणही मानले आहे. एवढेच नव्हे तर कथामूल्याच्या आधारावरच विश्वनाथाच्या संस्कृत व्याख्येस अतिव्याप्त ठरवून ( पृ. ३८-३९ ) कथामूल्यास शब्दाने केवळ प्राधान्य देणारी पण प्रत्यक्षात व्यवच्छेदक लक्षणाचा मान देणारी अशी व्याख्या केली आहे. यामुळेच लेखकाच्या व्याख्येत अव्याप्तीचा दोष आला. व्याप्ती आणि व्याख्या यांचा भिन्न दृष्टीने विचार केल्याचा आणि निगमनपद्धतीचा प्रत्यक्ष अवलंब न केल्याचा हा परिणाम आहे.

याचरोबरच 'दीर्घता, हा व्याप्तिविषयक विवेचनात उल्लेखिलेला (पृ.-४०) खंडकाव्याचा विशेष व्याख्येत समाविष्ट न केल्याने व्याख्येत उणीव राहिलीच.

सदोष व्याख्येमुळे वर्गीकरणात काही अंशी विसंगती उत्पन्न झाली आहे. खालील उदाहरणांवरून ते लक्षात येईल.

कृष्णशास्त्री चिपळूणकरांनी केलेले कालिदासाच्या मेघदूताचे भाषांतर खंडकाव्य मानले आहे. परंतु मेघदूताइतपतच कथेचा आधार असलेले 'निर्वासित चिनी मुलास' हे काव्य किंवा 'प्रेम आणि जीवन' हे काव्य कथाशून्य चिंतनिका म्हणून खंडकाव्याच्या प्रांतातून हद्दपार केले आहे. — मेघदूतात यक्षाच्या तोंडी अवतरणात प्रथमपुरुषी भाषा आहे तर तशी एखादी व्यक्ती न योजता अनिलांच्या काव्यात कवीच प्रथम पुरुषात कथन करीत आहे. प्रथमपुरुषी वा तृतीयपुरुषी भाषा यावर आत्मनिष्ठा वा वस्तुनिष्ठा अवलंबून नाही हे सर्वमान्यच आहे. शिवाय तिसऱ्या व्यक्तीच्या आयुष्यातील घटना पाहून मनात उद्भवलेले भाव व त्यांतून निर्माण झालेले विचार कवीने कथन करणे म्हणजे आत्मनिष्ठा, असेही वाटत नाही. दुसऱ्याबद्दलचे स्वतःचे विचार, चिंतन हा अलिप्त, तटस्थ मनःस्थितीचा परिपाक आहे तर स्वतःविषयीचे भाव हा आत्मनिष्ठेचा आविष्कार आहे. तसेच अमक्या व्यक्तीच्या मनात चिनी निर्वासित मुलास पाहून असे भाव वा विचार आले असे सुरवातीस सांगून मग कवीने ते सर्व काव्य अवतरणात दिले तर ते वस्तुनिष्ठ ठरेल काय ? असाही प्रश्न आहे. हीच गोष्ट 'प्रेम आणि जीवन' या बाबतची.

याखेरीज मनमोहन यांचे 'युगायुगाचे सहप्रवासी' ( पृ. ४०३ ) हे काव्य देखील 'संज्ञाप्रवाही खंडकाव्य' म्हणून सामाजिक खंडकाव्यात समाविष्ट केले आहे. या काव्यास तरी कथेचा आधार कितपत आहे ? आणि शिवाय कथेचा आधार सारखाच असताना, संज्ञाप्रवाही काव्यास जर लेखक खंडकाव्याच्या वर्गीकरणात जागा देतो तर चिंतनप्रधान, किंवा विचारवाही काव्यास कथेचा आधार असता खंडकाव्यात जागा का नसावी ?

ना. ग. जोशी यांच्या, 'जीवनयोग' या काव्यास लेखक 'चिंतनप्रधान' विलापिका म्हणतो (पृ. ४०४) तर 'विश्वमानव' मधील काहींचा विचारप्रधान चिंतनिका' म्हणून उल्लेख करतो ( पृ. ४०८ ); आणि नव्याच्या आहारी जाताना ते काव्य होते की नाही इकडे कवीचे दुर्लक्ष झाले आहे असा अभिप्राय देतो पण हे सारे सामाजिक खंडकाव्याच्या शीर्षकाखाली. इतकेच नव्हे तर प्रारंभी, पृ. ३४६ वर, चिंतनाला प्राधान्य मिळालेली खंडकाव्ये म्हणून या दोहोंचाही उल्लेख लेखक करतो. म्हणजे काही चिंतनिकांचा दोषदिग्दर्शनासह स्वीकार तर काहींचा गुणप्रशस्तीसहित अस्वीकार असा प्रकार घडला आहे.

या उलट लेखकाने केलेली व्याख्या तंतोतंत लागू असूनही 'बी' कवींच्या 'कमळे'चा समावेश यात नाही. कारण एकच ती दीर्घ नाही ( पृ. ४६१ ) आणि व्याख्या पाहावी तर 'दीर्घता' या विशेषाचा तीत समावेशच नाही. प्रस्तुत व्याख्येप्रमाणे 'कमळे'चा समावेश खंडकाव्यात होणे अवश्य होते.

खंडकाव्याची व्याख्या करण्यापूर्वी त्याची व्याप्ती निश्चित केली असती तर या विसंगती टळल्या असत्या; किंवा व्याख्या करण्याच्या भानगीस न पडता खंडकाव्याचे स्वरूप सांगितले असते तरी हा दोष न येता ; किंवा 'आधुनिक मराठी वाङ्मयाच्या इतिहासात अ. ना. देशपांडे यांनी सहजगत्या केल्याप्रमाणे ( पृ. ५२९ आधु. म. वा. इ. ) कथाप्रधान खंडकाव्ये आणि विचारप्रधान खंडकाव्ये असे स्थूल वर्गीकरण केले असते तरी अशास्त्रीयतेचा दोष टळला असता. परंतु साहित्य-शास्त्रीय तात्त्विक चर्चा करून जी व्याख्या केली जाते व त्यानुसार जे वर्गीकरण होते त्यात शास्त्रशुद्धतेची अपेक्षा जरूर असते.

अनुक्रमणिका

या प्रबंधात आणखी एक गोष्ट नजरेस येते ती अशी की लेखक खंडकाव्यास 'नाट्यगीताचा सेंद्रिय विकासच (Organic growth) होय' असे मानतो (पृ. २२) आणि निवेदनातही 'हा विचार त्यापूर्वी कोणीच सांगितलेला नाही' (निवेदन पृ. ४) असे म्हणतो. परंतु याच्या पुष्ट्यर्थ प्रबंधात फारसे विवेचन नाही. उलट परिशिष्टात अभ्यासविषयाला कोठेतरी मर्यादा असावी म्हणून नाट्यकाव्याचा समावेश विवेचनात करता आला नाही असे सांगतो. स्वतंत्र आणि नवीन विचार प्रथमच मांडला तेव्हा त्याबरोबरच त्याचे सविस्तर, सोदाहरण विवेचन केले असते तर बरे झाले असते.

एरवी प्रबंधातील सर्वच विवेचन सुगम झाले आहे. 'विषयांची अनेकता' (पृ. १४५) यासारखा एखादा संदिग्ध शब्दप्रयोग वगळला तर इतरत्र भाषा निःसंदिग्ध व सहसा समतोल अशीच आहे. परिश्रमपूर्वक माहिती मिळवून, व्यवस्थित संकलन करून, सविस्तर चर्चा करून एका उपेक्षित वाङ्मयप्रकाराची बूज लेखकाने राखली ही गोष्ट निश्चित अभिनंदनीय आहे. मराठी भाषेची ही सेवा केल्याबद्दल लेखकास धन्यवाद !

कुमुदिनी घारपुरे



# चिंतन व चर्चा

'मयूरकाव्यविवेचन' करणाऱ्या, मराठी नाट्य व रंगभूमी या दोहोंची ओळख करून देणाऱ्या, तसेच टिळक, आगरकर, चिपळूणकर यांच्या बौद्धिक जीवनाचा परिचय करून देणाऱ्या 'वाङ्मयविमर्श'कार बनहट्टी'चा 'चिंतन आणि चर्चा' हा आणखी एक नवा लेखसंग्रह ! प्रतिभा, महाराष्ट्र साहित्य पत्रिका, किर्लोस्कर, विहंगम, युगवाणी इ. नियतकालिकांतून व तरुण भारत, केसरी-सारख्या वृत्तपत्रांतून वेळोवेळी प्रसिद्ध झालेल्या लेखांतील निवडक चौदा लेख प्रस्तुत ग्रंथांत संकलित करण्यात आले आहेत. १९३० सालापासून १९६२ पर्यंतच्या दीर्घ कालावधी व्यापणाऱ्या या लेखांतून लेखनस्वरूपाच्या विकासदर्शनाबरोबर प्रकर्षाने जाणवते ती त्यात आढळणारी विषयांची विविधता.

साहित्य हे सामाजिक, राजकीय, धार्मिक, आर्थिक इ. विविधांगी जीवनानुभवातूनच साकार होत असता केवळ साहित्यविषयक प्रश्नांसंबंधीचे लेखन करणाऱ्या लेखकांनाच टीकाकार, समालोचक या उपाधी देण्याचा प्रघात परंपरेने पाडला आहे; त्यामुळे टीकाकार व निबंधकार यांच्या लेखनविषयांच्या मर्यादा जणू निश्चित बनल्यासारख्या झाल्या आहेत. वस्तुतः जीवनातील साहित्यबाह्य विषयांची समीक्षा करणाराही टीकाकाराचीच भूमिका बजावीत असतो. प्रस्तुत ग्रंथ वाचून वाचकांपुढे अशा व्यापक अर्थाच्या टीकाकार बनहट्टींचे चित्र उभे करते. एका विचारवंताच्या गाढ चिंतनशीलतेचा प्रत्यय ते वाचकांना आणून देते.

साहित्यक्षेत्राशी संबंध जोडू शकणारे असे तीन लेख या ग्रंथात आढळतात. त्यातील 'लेखक-प्रकाशक-संबंध' व 'प्रकाशनव्यवसायाचा प्रश्न' या दोन लेखांत 'लेखक' व 'प्रकाशक' या दोन संस्थांचा परस्परान्वय व्यक्त करण्यात आला असला तरी प्रमुख भर आहे तो 'प्रकाशक' या संस्थेचे वास्तव लोकांपुढे सादर करण्यावर ! आपल्या-कडील प्रकाशकांच्या स्थितीचे प्रांजल दर्शन त्यात पाश्चात्य देशातील एतद्विषयक स्थितीशी तुलना करून मांडण्यात आले आहे. लेखकाच्या साक्षेपी ज्ञानाची कल्पना या दोन लेखांप्रमाणेच इतरत्रही येऊ शकते.

'वाङ्मय' या विषयास वाहिलेल्या इंग्लंडमधील 'बुकमन' या सुप्रसिद्ध मासिकावर ४५ वर्षांनंतर १९३५ साली बंद पडण्याची पाळी येते तेव्हा त्याच विषयाशी संलग्न असलेल्या 'लंडन मर्क्युरी' नामक मासिकात ते समाविष्ट केले जाते ह्या वृत्ताच्या निमित्ताने नाणावलेल्या नियतकालिकांना अनुभवाव्या लागणाऱ्या एका कटू सत्या-संबंधी लेखकाने मांडलेले विचार जितके उद्बोधक तितकेच ते मार्गदर्शकही ठरणारे वाटतात.

अनुक्रमणिका

'महाराष्ट्राचे केंद्र', 'महाराष्ट्राचे केंद्र मुबई हेच', व 'भारतापुढील महान प्रश्न – सांस्कृतिक नियोजन' यांसारख्या लेखांच्या प्रेरणा परिस्थितिसापेक्ष विशिष्ट व्यवहारात आढळत असल्याने त्यांना ऐतिहासिक महत्त्व प्राप्त झाले आहे हे खरे असले तरी त्यातूनही मूलगामी विचारसामर्थ्याचाच संस्कार वाचकांच्या मनावर अधिक उमटतो. तात्कालिक महत्त्वाच्या अशा प्रश्नाकडे पाहण्याच्या लेखकाच्या वृत्तीतही पूर्वग्रहदूषिततेच्या अभावाला बुद्धीच्या समतोलाची मनोज्ञ जोड मिळालेली दिसते. अशा लेखात आणखीही एक विशेष जाणवतो तो लेखकाच्या दूरदृष्टीचा!

मुंबई शहर हे महाराष्ट्राचे केंद्र होय या बनहट्टींच्या विचाराने मोठमोठ्या विचारवंतांनाही बसलेल्या धक्क्या-मुळे उद्भवलेल्या वादळी चर्चेने मतभिन्नतेची धूळ उठली. 'वैचारिक नेतृत्वाची अभावलापिका' व 'लेखक-प्रकाशक-संबंध' या लेखातील विचारांनाही चर्चाविषय बनण्याचे भाग्य लाभले. अर्थात चर्चेला उत्तर देण्याच्या निमित्ताने लेखकाने त्या विषयाचा पुनर्विचार व्यक्त केला, परंतु त्यातही वैषम्य व कडवटपणा निर्माण होऊन भाषेला धार चढण्याचा संभव उद्भवला असताही लेखकाच्या विचारा-भिव्यक्तीतील प्रसन्न तर्कशुद्धता अबाधितच राहते. तेव्हा तर त्या विचारसरणीचे अधिकच कौतुक करावेसे वाटते.

साहित्य, समाजव्यवहार यांच्याइतकाच त्यांचा भाषा-विषयक जिव्हाळा उदंड आहे. 'संस्कृत विद्येचे संरक्षण', 'परिभाषानिर्मितीचे कार्य,' भारतापुढील भाषिक प्रश्न' यांसारख्या लेखांत हा जिव्हाळा त्या त्या विषया-संबंधीचा अचूक अभ्यास करून लेखकाने व्यक्त केला आहे.

'वर्तनक्रमातील सुवर्णमध्य', व 'सुखसाधनांचे समायोजन' या दोन लेखांची शीर्षके संस्कृत शब्दांचा पोषाख घालून मिरवीत असल्याने पंडिती थाटाचा आभास निर्माण करीत असली तरी त्या दोन्ही लेखांतून व्यक्त होणारे विचारदर्शन मात्र सुगम तर आहेच पण त्याचबरोबरच ते प्रत्ययकारी असल्याचेही जाणवते.

लेखकाच्या व्यक्तिमत्त्वातील निबंधकाराची—साक्षेपी अभ्यासकाची यथार्थ जाणीव करून देणारा प्रस्तुत लेखसंग्रह सुबुद्ध वाचकांच्या जिज्ञासेचे निश्चितच समाधान करील. सामान्य वाचकांच्या अमाप लोकप्रियतेचे माप पदरी पडणाऱ्या ग्रंथांपेक्षा म्हणूनच अशा ग्रंथांची जात वेगळेपणानेच उमटून दिसते.

**मीना जोशी**

---

**चिंतन व चर्चा** — लेखक प्रा. श्री. ना. बनहट्टी, सुविचार प्रकाशन, पुणे २; ५=००





अनुक्रमणिका



# स्वामी

थोरल्या माधवराव पेशव्यांच्या चरित्रावरील प्रस्तुत कादंबरी अत्यंत लोकप्रिय झाली व समीक्षकांकडून नावाजली गेली. कादंबरीच्या या यशाचे श्रेय श्री. देसाई यांच्या दीर्घ परिश्रमांना आणि चरित्रनायकाबद्दलच्या आदराला व जिव्हाळ्याला द्यावे लागेल. थोरले माधवराव यांना फार थोडे आयुष्य लाभले, तरी त्यांच्या थोर व्यक्तिमत्त्वाचा ठसा त्यांनी आपल्या कर्तृत्वामुळे समकालिनांच्या मनावर उमटविला. त्यामुळे त्यांचे चरित्र कलाकाराला आकर्षक वाटणारे व त्याच्या सामर्थ्याला आव्हान देणारे आहे. श्री. खांडेकरांनी म्हणूनच आपल्या एका संकल्पित कादंबरीला हा विषय निवडला होता, व तरी श्री. देसाई यांना प्रस्तुत कादंबरी लिहिण्यास त्यांनी मोठ्या मनाने उत्तेजन दिले. श्री. देसाई यांनी प्रस्तावनेत म्हटल्याप्रमाणे या कादंबरीच्या पूर्वतयारीसाठी फार कसोशीने सर्व ऐतिहासिक साधनांचा अभ्यास त्यांनी केला व मगच लेखनास प्रारंभ केला. ऐतिहासिक कादंबरी लिहिण्यासाठी किती प्रयासाने पूर्वतयारी करणे जरूर असते याची कल्पना श्री. देसाई यांच्या या कृतीवरून येऊ शकते.

तीन भागांमध्ये ह्या कादंबरीचे कथानक वाटले गेले आहे. वयाच्या सोळाव्या वर्षी ( जुलै १७६१ ) माधवरावांना पेशवाईची वस्त्रे मिळाली. लगेच त्यांनी निजामावर पहिली स्वारी केली व तेव्हापासूनच त्यांचे व राघोबादादांचे वैमनस्यही सुरू झाले. राक्षसभुवनच्या लढाईत ( ऑगस्ट १७६३ ) पेशव्यांचा जय होतो तेथे पहिला भाग संपतो. या १५१ पृष्ठांत माधवराव व राघोबा यांच्यातील वैराचा पूर्वरंग आणि माधवरावांच्या कर्तृत्वाची प्रारंभीची ओळख होते. दुसरा भाग १४१ पृष्ठांचा आहे. यात राघोबांना कैद करण्याची पाळी माधवरावावर येते (जून १७६८) हा प्रसंग मध्यवर्ती मानता येईल. कनकपुरास भोसल्यांशी झालेल्या तहापर्यंत (मार्च १७६९) हा भाग संपतो. चोवीस वर्षांचा माधवराव या सर्व उलाढालीत जो सावधपणा व मुत्सद्देगिरी दाखवितो ती आश्चर्यकारक आहे. तिसरा भाग ११६ पृष्ठांचा असून, या तीन वर्षांच्या काळावर मृत्यूची भीषण छाया पडलेली आहे. माधवराव व रमाबाई यांच्या दांपत्य जीवनाचे चित्र या भागात प्रामुख्याने आले आहे व राघोबाचा फितुर व कैद ( ऑक्टो. १७७२ ) ह्या घटनेला गौणत्व आले आहे. माधवरावांच्या मनात शिवछत्रपतींबद्दल नितांत आदर वसत होता ही गोष्ट प्रथम पृ. २८३ वर व नंतर तिसऱ्या भागात पृष्ठे ३७४–७७ वर लेखकाने मोठ्या कौशल्याने संवादातून गोवलेली आहे. तसेच, दांपत्यप्रेमाचा एक उज्ज्वल आदर्श माधवरावांच्या मनात दृढपणे वसत होता व रमाबाईनाही पतिप्रेम हेच सर्वस्व होते, याची जाणीव करून देणारे सुंदर संवाद या भागात आलेले आहेत.

माधवरावांचे थोर आणि प्रभावी व्यक्तित्व लेखकाने फार स्पष्टपणे साकार केले आहे. मागे शिवछत्रपतींच्या ध्येयाकडे वळून नतमस्तक होणारा हा पेशवा भारताच्या स्वतंत्र साम्राज्याचे स्वप्न पाहतो आणि त्यातच जग जिंकू पाहणाऱ्या इंग्रजांची चाहूल घेऊन भविष्याबद्दल भयचकित होतो. अपयशच आपल्या पदरी आहे ही एक खिन्न जाणीव ठेवूनही दुर्दम्य धीराने लढणारा हा वीरपुरुष आहे असे एक चित्र देसाई उभे करतात; पण त्याला ग्रासणारे दुसरे चित्र ते जास्त प्रभावी करतात. हे दुसरे चित्र म्हणजे रोगाने जर्जर झालेल्या व फितुरीने संत्रस्त झालेल्या पेशव्याचे. हेच करुण चित्र तिसऱ्या भागात ठळक होत जाते व एकंदर कथेवर आपली छाया पसरते. लेखकाने एक फारसी शेर ग्रंथारंभी मुद्दाम दिला आहे व त्याचा अर्थही असाच वैफल्याचा आहे. 'आपण माणसे मागतो त्याच्या नेमके उलटेच दैव घडविते' असा निराशावादी सूर फारशी प्रणयकाव्यांतून नेहमी असतो. तो शेर उद्धृत करण्यात लेखकाला असे म्हणावयाचे दिसते की माधवरावासारख्याचे आयुष्य हे असेच दुःखपर्यवसायी व अपेशी व्हावयाचे. लेखकाच्या या भूमिकेमुळे म्हणा किंवा प्रत्यक्ष घडलेल्या या दुःखद इतिहासामुळे म्हणा ह्या कादंबरीच्या वर्णनात

---

**स्वामी** — लेखक – रणजित देसाई, प्रकाशक – देशमुख आणि कं. पुणे २. पृ. ४१५ मूल्य १२ रु.

धैर्यशौर्यादी भावांना स्थान असून स्थायी परिणाम मात्र कारुण्याचा आणि वैफल्याचा होतो.

ही कादंबरी वाचताना एक असे मात्र मनात येते की आपण एक संवादरूप बखर वाचीत आहोत. कादंबरीच्या शेवटी माधवरावांच्या जीवनातील ३३ प्रसंगांची जंत्री दिलेली आहे. या प्रसंगाच्या अनुषंगाने आणखी प्रसंगांचा तपशील घेऊन त्या त्या प्रसंगाचे शब्दचित्र श्री. देसाई यांनी मोठ्या कसोशीने व कौशल्याने रेखाटले आहे. दरबार, मसलती, रणभूमीवरचे प्रसंग व शनिवारवाडा आणि थेऊर येथील कौटुंबिक घटना यांच्या धावत्या चित्रपटात वाचकाचे लक्ष वेधलेले राहते. पण, असे वाटत राहते की माधवराव, रमाबाई, राघोबा इत्यादी मुख्य पात्रांची स्वभावरेखने सावल्यांसारखी (सिल्हाऊटसारखी) झाली आहेत. काही तरी असमाधान वाटते व ते नेमके का वाटते ते कळत नाही. प्राचीन महाकाव्यांतून, राम, लक्ष्मण, हनुमान, सीता किंवा कौरव-पांडव यांची स्वभावरेखने आपण वाचतो. स्पष्ट, रेखीव अशी ती रेखनें असतात व त्याच अपेक्षेने आपण ती वाचतो. ऐतिहासिक स्त्री-पुरुषांची रेखनें वाचताना आपली अपेक्षा थोडी वेगळी असते. अलौकिक राम, धर्मराजादी पौराणिक व्यक्तींपेक्षा माधवराव, रमाबाई यांच्या स्वभावाला जास्त 'मानवी' संदिग्धपणा व संमिश्रपणा असावा अशी आपण अपेक्षा करतो. त्याऐवजी रेखीवपणा आढळला तर काही तरी असमाधान वाटते.

ऐतिहासिक कादंबरीबद्दल कलावंताची एक 'कोंडी' होती, हे येथे कबूल करायला हवे. इतिहासाचा संदर्भ सोडणे कठीण असते, पण कलावंताला जे रचावयाचे असते ते एक कल्पनाचित्र असते, सत्याभास असतो. सत्याभास आणि सत्य याची सांगड कलाकृतीत असते, परंतु सांगड म्हणजे एकरूपता नव्हे. ऐतिहासिक कादंबरीत मात्र अशी एकरूपता कलावंताला प्राप्त लागते; तो जितका व्यासंगी व सत्याचा शोध घेणारा असेल तितकी ही एकरूपता जास्तच ग्रासणारी ठरते. देसाई हे निरलस सत्यशोध घेणारे आहेत, म्हणून त्यांच्या कादंबरीला संवादरूप बखरीचे रूप आले आहे असे मी म्हटले आहे. ते एका गौरवार्थाने आहे, पण त्यात एक असमाधानही आहे.

ऐतिहासिक कादंबरीचे कथानक इतिहास घडविण्यात निर्णायक स्थानी असलेल्या कर्तबगार नेत्यांच्या भोवती गुंफू नये असा उपदेश स्कॉटने केला होता, व यात उद्देश हाच दिसतो की कादंबरीकाराची कल्पनाशक्ती जखडली जाऊ नये. इतिहासाचा काळ कसोशीने उभा करून त्या काळात सामान्यांचे जीवन जगणाऱ्या व्यक्तीभोवती कथा रंगवावी हा संकेत म्हणूनच उपकारक वाटतो. तो संकेत युरोपीय वाङ्मयात मानला गेला आहेच असे नाही व तेथे मानला गेला असता तरी तो आपण मानावा असेही नाही. पण त्या संकेतामध्ये एका खऱ्या अडचणीच्या निवारणाचा एक सोपा मार्ग आहे. ती अडचण दुसऱ्या मार्गाने निवारण करावयास हरकत नाही; परंतु, 'स्वामी'मध्ये ती निवारण झालेली जाणवत नाही. अर्थात, ऐतिहासिक वाङ्मयाच्या 'सत्य व सत्याभास' यांतील एकरूपतेच्या धोक्याचा हा मुद्दा मांडूनही, 'स्वामी' या कादंबरीच्या थोरवीबद्दल श्री. देसाई यांचे मी अभिनंदन करतो व अशी अपेक्षा करतो की ऐतिहासिक वाङ्मयाच्या निर्मितीसंबंधाचे प्रश्न ते प्रत्यक्ष कलाकृतींच्या रचनेतूनच आपल्याला सोडवून दाखवतील.

दि. के. बेडेकर

---

अनुक्रमणिका

# ' लोकशिक्षणकार ' जांभेकर ( ग्रंथ–परीक्षण व आनुषंगिक विचारप्रदर्शन )

लोकशिक्षणकार श्री. ग. गं. जांभेकर यांच्या वयाला ता. २७–४–१९६३ रोजी पंच्याहत्तरावे वर्ष लागले. या निमित्ताने त्यांचे चहाते व प्रस्तुत ग्रंथाचे ' संग्राहक ' श्री. इनामदार व श्री. सुभेदार यांनी हा ग्रंथ तयार केला, व तो समारंभाने प्रसिद्ध केला ही फार समाधानाची गोष्ट आहे. कारण ग्रंथविषय श्री. गणपतराव जांभेकर यांनी जन्मभर देशसेवेसाठी स्वार्थत्यागपूर्वक व परिस्थितीशी सतत झगडत कष्ट केले आहेत, व या जीवनाची समाजात जाहीरपणे दखल घेतली जावयास हवी होती, व ते या ग्रंथाने झाले आहे.

या ग्रंथात ' संग्राहकांचे निवेदन ' व ' प्रस्तावना ' ( एकूण पृष्ठे १५ ) आणि बासष्ट लेखकांचे गुणग्राहक व आठवणीचे लेख व तीन परिशिष्टे ( एकूण पृष्ठे २२४ ) यांचा अंतर्भाव करण्यात आला आहे.

या ग्रंथाची योजना ' ३-३॥ वर्षांपूर्वी झाली. लेखांची जुळवाजुळव झाल्यानंतर पानशेत-प्रलय झाला, व त्यात या ग्रंथाच्या ज्येष्ठ संग्राहकांचे बिऱ्हाड उध्वस्त झाले. परंतु या ग्रंथाची जमविलेली सामग्री या बिऱ्हाडात नव्हती, दुसरीकडे कोठे (?) सुरक्षित होती, हे बरे झाले. संग्राहकांनी आपल्या निवेदनात, महाराष्ट्र व केंद्रीय शासनांनी जांभेकरांच्या प्रदीर्घ देशसेवेचे; त्यांस त्यांच्या वृद्धावस्थेत शारीरिक, मानसिक व आर्थिक स्वास्थ्य देऊन; योग्य ते चीज करावे ही जी त्या शासनांस आग्रहाची प्रार्थना केली आहे, तीशी आम्ही संपूर्ण सहमत आहो.

प्रस्तावनाकारांनी आपल्या प्रस्तावनेत जांभेकरांच्या कर्तृत्वग्रंथातील चार भागांचे ( राष्ट्रीयशिक्षणकार, लोकशिक्षणकार, बाळशास्त्री–चरित्रकार व शुद्धलेखन-आंदोलनकार ) उत्कृष्ट सिंहावलोकन व समतोल विवेचन केले आहे, व त्यात त्यांच्या गुणविशेषांबरोबरच त्यांच्या गुणेतर विशेषांचीही नोंद केली आहे. डॉ. काका गाडगिळांची ही प्रस्तावना त्यांच्या गुणग्राहक व न्यायप्रवण वृत्तीचीच द्योतक आहे.

या ग्रंथाच्या निर्मात्यांनी ( श्री. इनामदार व श्री. सुभेदार ) स्वतःस या ग्रंथाचे ' संग्राहक ' म्हणविले आहे. परंतु त्यांनी केवळ संग्राहकाचेच काम केले व लेख आले तसे छापले, असे दिसत नाही. कारण त्यांनीच आपल्या ' निवेदना 'त म्हटले आहे की, लेख हाती आल्यानंतर ' मग त्यांतील तपशील तपासणे, काही विधानांचे स्पष्टीकरण करून घेणे, त्यासाठी त्या त्या लेखकांशी पत्रव्यवहार करणे इत्यादी ( म्हणजेच संपादकीय ) काम सुरू झाले. ' ( पृ. ४ ) मग त्यांनी स्वतःला या ग्रंथाचे ' संपादक ' न म्हणविता साक्षेपाने ' संग्राहक ' म्हणविले यातील अर्थ काय ! त्यांनीच उल्लेखिलेली वरील ' संपादकीय ' कामे इतर कोणी (?) केली; व त्यांनी स्वतः केवळ या संपादित लेखांचा फक्त संग्रह केला ? पण तसेही दिसत नाही. कारण त्यांच्या 'निवेदना'त या संपादन-साहाय्यकांचे आभार मानलेले नाहीत. का हे आभार जाहीर रीतीने मानण्यासारखी ' संपादकीय ' परिस्थिती नव्हती ? ते काहीही व कसेही असो, या ग्रंथातील लेखांचे अंतर्गत संपादन बरेच व्यवस्थित व थेट जांभेकरी वळणाचे व साक्षेपाने झालेले दिसते यात शंका नाही ! आणि त्याबद्दल या ग्रंथाच्या ' संग्राहकां 'स अथवा, तेच त्याचे 'संपादक'ही नसल्यास, त्यांच्या अनुल्लिखित संपादकीय सहकाऱ्यास(?) मनःपूर्वक धन्यवाद देणे उचितच होईल. मात्र या संपादनात ग्रंथातील लेखांचे काही सोयिस्कर वर्गीकरण व उल्लेखाच्या सोयीसाठी क्रमांकन केले असते, तर बरे झाले असते असे वाटते. तसेच, ग्रंथातील मुद्रणशुद्धी लोकशिक्षणी कसोटीस सर्वस्वी उतरणारी नाही, व त्याची छपाईही उत्तम प्रतीची नाही, याही गोष्टी लक्षात आल्याशिवाय राहत नाहीत.

अव्वल ग्रंथातील लेखांपैकी पहिला तेवीस पृष्ठांचा जांभेकरचरित्रात्मक प्रदीर्घ लेख श्री. गं. र. भडभडे यांचा आहे. या लेखात लेखकांनी चरित्रनायकाच्या बालपणापासून तो जवळजवळ आजतागायतच्या जीवनातील अनेक लहानमोठ्या घटनांच्या नोंदी केल्या आहेत. या नोंदी इतक्या साक्षेपाने व बारीकसारीक तपशिलानिशी केल्या आहेत की, जणू काय चरित्रनायकानेच त्या

---

**' लोकशिक्षणकार जांभेकर '** – व्यक्तिमत्त्व व कार्य – ( पृ. १६ + २२४ ) – संग्राहक : श्री. न. ल. इनामदार व श्री. ल. मा. सुभेदार – प्रकाशक : डॉ. भा. ना. गुर्जर, १२ नारायण पेठ, पुणे ( २ )–किंमत ७ रुपये.

स्वतःच्या स्मरणातून केल्या असाव्या! आणि त्यांतील भाषाप्रयोगादी विशेष इतके जांभेकरी वळणाचे वाटतात की, हा लेख स्वतः जांभेकरांनीच स्वतःचा तृतीय पुरुषी उल्लेख करून लिहिला असावा असे जांभेकरांच्या विशिष्ट लेखनपद्धतीच्या जाणिक वाचकांस तरी क्षणभर वाटून जावे! प्रस्तावनाकारांनी प्रस्तावनेत म्हटले आहे की, 'लेखकाचे लेख (जांभेकर) इतके दुरुस्त करीत की, न दुरुस्त केलेले म्हणजे लेखकाचे नाव, असे कधी कधी होई!' अर्थात या श्री. भडभडयांच्या लेखाचे मूळ 'लेखन' किंवा त्याचे (अथवा ग्रंथातील इतर लेखांचे) 'संपादन' जांभेकरांनी स्वतःच केल्याचा जाहीर पुरावा काहीच नसल्याने, व श्री. इनामदार व श्री. सुभेदार हे स्वतःस या ग्रंथाचे केवळ 'संग्राहक' म्हणवीत असल्याने, तो लेख श्री. भडभडयांनीच लिहिला असे गृहीत धरलेच पाहिजे. आणि मग त्यातील, एरवी जांभेकरांच्या आत्मचरित्रातल्यासारखा बारीक-सारीक तपशील व अनेक ठिकाणचे जांभेकरी वळणाच्या लेखनाचे सहीसही यशस्वी अनुकरण यांबद्दल त्यांचे विशेष अभिनंदन केले पाहिजे! या लेखात जांभेकरांचे संक्षिप्त पण समग्र चरित्र आले आहे, हा या लेखाचा विशेष होय.

ग्रंथातील इतर लेखांचे स्थूल वर्गीकरण करून पाहिल्यास, ते ग्रंथविषय व्यक्तीचे विद्यार्थिजीवनातील सहकारी व समकालीन, आणि पुढील सार्वजनिक जीवनातील सहकारी, साहाय्यक कर्मचारी, मित्र, व समकालीन गुणज्ञ अशा विविध वर्गांतील व्यक्तींनी लिहिल्याचे आढळेल. बहुतेक सर्वच लेखांतून जांभेकरांच्या त्यागाच्या व कष्टाच्या, निष्ठेच्या व चिकाटीच्या, जबरदस्त उद्योगाच्या व अविचल एकतानतेच्या, जीवनक्रमाचे प्रतिबिंबच पडलेले आहे. (विशिष्ट लेखांचे वेगळे उल्लेख करण्यास येथे अवकाश नाही.) हे सर्वच लेखक जांभेकरांचे चहातेच आहेत, व त्यांतील त्याच्यावर अंशतः काही टीका करणारे लेखकही त्यांचे चहातेच आहेत. परंतु 'गुणग्राहक' म्हणून मागविलेल्या आठवणींच्या या ग्रंथातही काही लेखकांच्या लेखात तरी त्यांच्याविषयी आंतरिक खेदाच्या संस्काराचे जे उन्मेष, प्रत्यक्षाप्रत्यक्ष रीत्या, भावित-अभावितपणे, इच्छया–अनिच्छया, व्यक्त झालेले आढळतात, त्यामुळे वाचकाचे मन थोडे विषण्णच बनते! श्री. ना. गो. चापेकरांसारखे जांभेकरांचे ज्येष्ठ व निकट मित्र, सहकारी व पुरस्कर्ते 'साधनशुचित्वाचा आग्रह गणपतरावांस मानण्यासारखा नाही' असा ज्वलंत उद्गार (पृ. ५९) काढतात! प्रो. श्री. के. क्षीरसागरासारखे एक ज्येष्ठ साहित्यिक व लेखक, जांभेकरांकडे त्यांच्याच विनंतीवरून पाठविलेल्या आपल्या लेखाबरोबर 'लेखकाच्या परवानगीशिवाय एका अक्षराचाही बदल करू नये व हे मान्य नसल्यास लेख परत पाठवावा' असेही (पृ. ११४) त्यांस मुद्दाम लिहितात, आणि त्यानंतर त्यांशी झालेल्या झटापटीच्या संभाषणाची हकिकत सांगतात! आणि म. सा. परिषदेचे कर्मचारी, उदयोन्मुख लेखक व जांभेकरांचे चहाते व आस्थेवाईक मित्र असलेले श्री. म. श्री. दीक्षित 'लोकशिक्षणकारांची ही (शुद्धलेखनविषयक) आस्था कित्येकदा इतक्या पराकोटीला पोचते की म. सा. परिषदेच्या साधारण सभेला श्री. जांभेकरांची उपस्थिती नकोशी होते!' असे (पृ. १३९) लिहितात! आणि प्रो. दे. द. वाडेकरांसारखे त्यांचे चिरपरिचित त्यांच्या चरित्रापासून धडा काय काढतात, तर 'सहकारी स्वरूपाच्या कार्यात सहकाऱ्यांस केवळ साधन म्हणून वापरण्याने (जे जांभेकरांनी आपल्या कार्यात केले असे त्यांच्या, एरवी जांभेकरांच्या कार्याची चहा करणाऱ्या, लेखांतील स्पष्ट मतप्रदर्शन आहे) सहकारी दुरावतात व कार्यहानी होते.' (पृ. ८४) 'गुणज्ञांचे लेख व आठवणी' म्हणून योजिलेल्या या ग्रंथातील जांभेकरांच्या काही चहात्यांचेच हे काही संस्कारोन्मेष वाचून कुणाचे मन व्यथित व विषण्ण होणार नाही? असो.

या ग्रंथातील विविध लेखांत प्रतिबिंबित झालेले, व आता मागील पिढीत समाविष्ट झालेल्या पण विद्यमान असणाऱ्या सुशिक्षित जनतेच्याच स्मरणात असलेले, जांभेकरांचे एकंदर चरित्र समग्रपणे दृष्टीपुढे आणून पाहिल्यास, जांभेकर हे एक स्वार्थत्यागी, संयोजक, कुशल, अखंड उद्योगी, दुर्दम्य चिकाटीचे व कमालीचे जिद्दीचे देशसेवक होत याबद्दल कुणाचीही खात्री पटते. त्यांच्या जीवनात जे (पूर्वोल्लिखित) चार कालखंड होऊन गेले, त्यांतच या प्रस्तुतच्या 'लोकशिक्षणकार जांभेकर'-ग्रंथाच्या संयोजनाचाही पाचवा खंड घालावा की काय असे वाटण्याइतक्या महत्त्वाचा हा ग्रंथ आहे यात शंका नाही. कारण या ग्रंथात, व त्याच्या संयोजनस्वरूपात, प्रत्यक्षाप्रत्यक्ष रीत्या त्यांच्याच संकीर्ण व्यक्तिमत्त्वाचेच व विविध विशेषांचे प्रतिबिंब पडलेले आहे. हा एवढा एकच ग्रंथ वाचला, तरी त्यांच्या चरित्राची व कर्तृत्वाची बरीचशी कल्पना हल्लीच्या पिढीस (की जिने त्यांचे कर्तृत्व प्रत्यक्ष

फारसे पाहिलेले नाही) येईल, व त्यापासून तीस इष्ट तो बोध घेता येईल.

आमच्या स्वतःच्या मते, जांभेकरांच्या चरित्रातील सर्वांत महत्त्वाचा कालखंड म्हणजे त्यांनी केलेल्या 'लोकशिक्षण' मासिकाच्या संपादनाचा काल होय. (इतर कालखंडांसही आपापल्या परीने महत्त्व आहेच; पण ते लोकशिक्षण-कालखंडाच्या महत्त्वापेक्षा थोडे तरी कमीच भरेल असे वाटते.) मराठी मासिकांच्या इतिहासात जांभेकरी 'लोकशिक्षणा'चे महत्त्व व कर्तृत्व काही आगळेच ठरेल असे आम्हांस वाटते. परंतु यासंबंधी विस्तारभयास्तव अधिक लिहिण्यास येथे अवकाश नाही. या बाबतीत या ग्रंथातील प्रो. वाडेकरांच्या लेखात (पृ. ८१), अशा प्रकारच्या विशिष्ट योजनेचे 'दुसरे भारदस्त मासिक महाराष्ट्रात तरी क्वचितच झाले असेल' असे जे मतप्रदर्शन केले आहे त्याशी आम्ही पूर्णपणे सहमत आहो एवढीच नोंद येथे करून समाधान मानणे भाग आहे. किंबहुना, या लेखात जांभेकरांच्या चरित्र व कर्तृत्वाविषयी जे बहुतांशी समतोल म्हणण्यासारखे वर्णन व मापन केले आहे, त्याशीही आम्ही बहुतांशी सहमत आहो असे म्हणण्यासही प्रत्यवाय नाही. 'जांभेकर हे एक आत्मकेंद्री महानुभाव आहेत' असे जे त्या लेखातील एक सूत्रवाक्य आहे त्यातच जांभेकरांचे समग्र व्यक्तिमत्त्व आले आहे, व त्यातच जांभेकरांच्या जीवनातील यशापयशांचे बीज साठविलेले आहे असे आम्हांस वाटते. प्रस्तावनाकारांनी त्या वाक्यातील 'आत्मकेंद्री महानुभाव' या पदवीपदास आपल्या प्रस्तावनेत दुजोराच दिला आहे, व त्यावरूनही त्या सूत्रवाक्याचा स्वतंत्र पडताळा पटतो. जांभेकरांनी आपल्या महानुभाव गुणांनी स्वतःची कर्तृत्वे केली आणि त्या गुणांच्या आत्मकेंद्रित्वामुळे (आत्माभिनिवेशामुळे) अपयशेही घेतली! त्यामुळे मनास अभिमान वाटतो, व विषण्णताही वाटते!

या ग्रंथाच्या संग्राहकांपैकी श्री. इनामदार यांनी आपल्या लेखात जांभेकरांवरील 'सहकाऱ्यांस साधने म्हणून वापरणे' या त्यांच्या ऐकण्यात आलेल्या आक्षेपास बचावाचे उत्तर देण्याचा प्रयत्न (पृ. १६२) केला आहे. हा त्यांचा प्रयत्न बहुशः प्रो. वाडेकरांच्या लेखातील संबद्ध मतप्रदर्शनास (पृ. १०४) अनुलक्षून असावा! त्यांच्या या उत्तरात दोन युक्तिवादाचे मुद्दे दिसतात: (१) जे करणीय आहे 'ते सर्वोत्कृष्टपणे झाले पाहिजे असा जांभेकरांचा कटाक्ष असतो; व (म्हणून) दुसऱ्यालाही ते असेच काटेकोरपणे वागावयास भाग पाडितात.' (२) यात जांभेकरांच्या अहंकाराची झाक (इनामदारांचाच शब्द) मारते असे सहकाऱ्यांस वाटले, तर सहकाऱ्यांनी ते काम स्वबुद्धीच्या बळावर त्यांच्या-इतकेच उत्कृष्टपणे पार पाडणे हाच या जांभेकरांच्या तथाकथित अहंकारावर उतारा होऊ शकेल; आणि जांभेकरांची ही अहंकाराची वृत्ती टिकली असेल, तर हा उतारा त्यांस देणे कुणाला जमले नाही असेच मानावयास पाहिजे. हे दोन्ही युक्तिवादही प्रत्यक्ष जांभेकरांनीच केल्यासारखे भासावे इतके ते जांभेकरी वळणाचे उतरले आहेत! परंतु त्यांत विचारदोष आहेत.

(१) करावयाचे काम सर्वोत्कृष्ट झाले पाहिजे, या जांभेकरांच्या म्हणून सांगितलेल्या तत्त्वाविषयी कोणाचेही दुमत होण्याचा संभव नाही. परंतु मासिकातील लेखन हे काम कुणाचे? केवळ संपादकांचे? की लेखकांचे आणि संपादकांचे? किंबहुना, त्यातील प्राथमिक स्थान लेखकांचे व दुय्यम स्थान संपादकांचे ही वस्तुस्थिती नव्हे काय? मासिक हे लेखकांच्या लेखांनी संपादकाने सजवावयाचे, लेखक-संपादकांच्या संयुक्त सहकार्याचे, काम आहे, हे तर मान्य केले पाहिजे ना? तेव्हा लेखकांचे लेख किती बदलावयाचे, निदान महत्त्वाचे बदल करण्यास खुद्द लेखकांची अनुमती हवी की नको, निदान लेखकांनी ती देण्याचे स्पष्टपणे नाकारल्यानंतरही परस्पर ते बदल करूनही टाकणे व लेखकांस त्याबद्दल हात चोळीत बसावयास लावणे हे कितपत योग्य होईल, इत्यादी अनेक प्रश्न याबाबत उद्भवतात! प्रो. क्षीरसागरांनी आपल्या लेखात (पृ. ११४-१५) त्यांचा व जांभेकरांचा एका केशकर्तनगृहात झालेला जांभेकरी लेख-कर्तनाविषयीचा जो तणातणीचा संवाद दिला आहे तो वाचकांनी या संदर्भात पहावा! (जांभेकर: 'जावडेकर-जोग-पारसनीस प्रभृतींचीही भाषा मी सुधारून घेतो. मग तुमच्या लेखात दुरुस्त्या केल्या यात काहीच विशेष नाही. संपादकाच्या कर्तव्यासंबंधी माझ्या काही ठाम कल्पना आहेत.' क्षीरसागर: 'लेखकाच्या भूमिकेसंबंधी माझ्याही काही ठाम कल्पना आहेत; आणि संपादकीय अधिकाराच्या मर्यादेसंबंधीही काही ठाम कल्पना आहेत.' वगैरे) ही इतकी तणातणी काय दर्शविते? — अथवा डॉ. न. का. घारपुरे यांनी आपल्या लेखात (पृ. १०९-१०), त्यांच्या (घारपुऱ्यांच्या) अनुवादित लघुकथेतील

बहुतेक संपादकीय बदल त्यांनी मान्य करूनही, कथेच्या मथळ्यातील त्यांच्या 'खट्याळ' या शब्दाऐवजी 'ग्राल्य' हा जांभेकरी बदल त्यांनी अमान्यच केला, परंतु जांभेकरांनी शेवटी आपला बदल कायमच केला व छापूनही टाकला, या जांभेकरांच्या 'संपादकीय ग्राल्यपणा'ची (घारपुऱ्यांचे शब्द) जी हकिकत दिली आहे, तीही वाचकांनी अवश्य पहावी! यात खरोखर जांभेकरांनी काय साधले? सार्वत्रिक संस्कृतीकरणाचा जांभेकरांचा वैयक्तिक अभिनिवेश त्यांनी लेखकावर लादण्यानेच काम सर्वोत्कृष्ट होते काय? — तेव्हा करावयाचे काम सर्वोत्कृष्ट व्हावे या जांभेकरांच्या तत्त्वाबद्दल (आणि ते तत्त्व जांभेकरांचेच समजण्याचे कारण नाही!) वाद नसला, तरी त्या तत्त्वाची (स्वतःचे वादविषय अभिनिवेश लेखकांवर त्यांच्याच लेखांच्या बाबतीत लादणारी) जांभेकरी अंमलबजावणी, किंवा त्याबद्दलची जांभेकरी 'भगभग' (प्रस्तावनाकारांचा शब्द), कित्येकदा आक्षेपार्हच होती हे स्पष्टच दिसते.

(२) आता जांभेकरांच्या कोणीही सहकाऱ्यांनी त्यांच्याइतकेच उत्कृष्टपणे काम पार पाडले नाही असा इनामदारांचा समज असल्यास तो त्यांनी सोडून द्यावा. जांभेकरांनी प्रथम काही संपादनकार्य केले, व नंतर स्वतः काही संशोधन-लेखनही केले. संपादनकार्यातील (व त्यांच्या सर्वच कार्यातील) त्यांच्या एकारलेल्या स्वाभिनिविष्ट वृत्तीने त्यांनी मिळविलेला दुरावा वर उल्लेखिलेलाच आहे. खेदाची बाब ही की, ही वृत्ती त्यांनी कह्यात ठेवली असती, तर त्यांच्या कार्याचे सुयश प्रत्यक्षात मिळविलेल्या सुयशाहूनही अधिक भरीव, अधिक भरवोस झाले असते व अधिक कालपर्यंत टिकले असते! आणि जांभेकरांच्या कार्याबद्दलच्या सर्वोत्कृष्टपणाचा इनामदारांचा अभियोग जांभेकरांच्या लेखनकार्यासंबंधीही त्यांस अभिप्रेत असल्यास, तोही टिकत नाही हे त्यांनी लक्षात घ्यावयास हवे. जांभेकरांच्या बाळशास्त्रीविषयक त्रिखंडात्मक ग्रंथांपैकी पहिल्या खंडात जांभेकरांचे स्वतःचे काही लेखन आहे. (दुसऱ्यात व तिसऱ्यात अव्वल ऐतिहासिक सामग्री संग्रहीत केली आहे). या पहिल्या खंडात स्वतःच्या लेखनात जांभेकरांनी पूर्वसूरींवर केलेल्या स्वाभिनिविष्ट व विवेकी समतोल सोडून केलेल्या प्रहारांमुळे त्यासंबंधी पुष्कळ विद्वानांत कलुषित मत आहे, व प्रस्तुत ग्रंथाच्या प्रस्तावनाकारांनीही त्यात समतोल बुद्धी व व्यापक विवेक नाही ही त्यावरील टीका सर्वस्वी चुकीची नाही, असा आपला अभिप्राय नमूद केला आहे, हे इनामदारांना माहीत आहेच. हा जांभेकरी स्वाभिनिवेश व समतोलत्याग या लेखनात नसता, तर त्याचे मोल आहे त्यापेक्षाही कितीतरी वाढले असते!

तेव्हा इनामदारांनी जांभेकरी वळणावरच केलेला जांभेकरांचा बचाव जरा तोकडाच पडतो असे आम्हांस एकंदरीने वाटते; आणि प्रो. वाडेकरांनी उल्लेखिलेला संपादक जांभेकरांचा सहकाऱ्यांसंबंधीचा साधनवादी सिद्धान्तच अधिक खरा वाटतो. जांभेकरांनी लेखकादिकांस स्वाभिनिवेशाचे परिचारी न गणता सहकारी गणून कार्य केले असते, तर त्यांचे 'सर्वोत्कृष्ट' कार्य अधिक उत्कृष्ट व अधिक मान्य झाले असते एवढीच आमची त्याबाबत भावना आहे! असो.

प्रस्तुत ग्रंथात अंतर्भूत केलेल्या तीन परिशिष्टांपैकी पहिल्या परिशिष्टात जांभेकरांच्या लोकशिक्षण-मंडळाच्या विसर्जन-कार्यातील वकील व विसर्जक श्री. श्री. मा. दातार यांचा, त्या मंडळाच्या विसर्जनकार्याच्या पूर्तीबद्दल व त्या मंडळाच्या कार्यातील जांभेकरांच्या नैतिक शुद्धीची ग्वाही देणारा, लेख दिला आहे, हे फार चांगले झाले. कारण त्या योगाने जांभेकरांसंबंधी प्रचलित असलेल्या, व खुद्द जांभेकरांना व त्यांच्या वकिलांना जाणीव असलेल्या, गैरसमजांचे निराकरण होण्याचा मार्ग सुकर होईल. याच परिशिष्टातील दुसरा लेख म्हणजे स्वतः जांभेकरांचे 'देणगीदारांस धन्यवाद' हे पत्रक होय. गतवर्षीच मुंबई विद्यापीठात, जांभेकरांच्याच चिकाटीच्या प्रयत्नांस अखेर यश येऊन, बाळशास्त्री जांभेकरांच्या नावाने गणितविद्यासन स्थापन झाले, या प्रसंगाने त्यांच्या स्वतःच्या बाळशास्त्री-ग्रंथास देणगीरूपाने साहाय्य करणाऱ्या देणगीदारांस धन्यवाद देणारे हे पत्रक आहे. या ग्रंथात स्वतः ग्रंथविषय जांभेकरांचे कांही लिखित, विशेषतः धन्यवाद देणारे लिखित, अंतर्भूत करावयाचे, तर त्या धन्यवादाची म्हणजे आभारप्रदर्शनाची व्याप्ती जांभेकरांच्या बाळशास्त्री-ग्रंथाच्या देणगीदारांपुरती मर्यादित न ठेवता, तीत त्यांच्या समग्र कार्यातील सहकारी-साहाय्यकांचाही अंतर्भाव झाला असता तर बरे झाले असते. कारण प्रस्तुत ग्रंथ हा जांभेकरांच्या बाळशास्त्रीविषयक ग्रंथाच्या बाबतीतील कर्तृत्वापुरताच मर्यादित नसून त्यात त्यांच्या सर्वांगीण कर्तृत्वाचा अंतर्भाव आहे, आणि म्हणून जांभेकरांचे आभारप्रदर्शन केवळ त्या ग्रंथाच्या देणगीदारांपुरते मर्यादित न राहता ते अधिक विशाल व्हावयास हवे होते. विशेषतः ज्या विद्यासनस्थापनेच्या अनुषंगाने

जांभेकरांनी हे देणगीदारांस धन्यवाद दिले आहेत, त्या स्थापनेच्या बाबतीत खुद्द मुंबई विद्यापीठ व तेथील त्या स्थापनेत जांभेकरांस आस्थापूर्वक साहाय्य करणारे जांभेकरांचे अधिकारी मित्र, आणि तसेच, विशेषतः ज्या लोकशिक्षण कार्याच्या द्वारे जांभेकरांच्या हातून महनीय देशसेवा झाली त्या लोकशिक्षणाचे लेखक, यांचाही जांभेकरांच्या त्या धन्यवादात अंतर्भाव झाला असता तर बरे होते !—दुसऱ्या परिशिष्टात जांभेकरांच्या अलीकडील शुद्धलेखनविषयक चळवळीचा संकलित वृत्तान्त देणारा श्री. द. ग. येरवडेकरांचा लेख छापला आहे, व तो या बाबतीतील एक संदर्भलेख म्हणून उपयुक्त ठरेल. आणि तिसऱ्या परिशिष्टात 'लोकशिक्षण' मासिकाच्या अकरा वर्षांच्या विषयानुक्रमणिका दिल्या आहेत, व त्या तर अभ्यासकांना फारच उपयुक्त ठरतील.

एवंच, हा 'लोकशिक्षणकार जांभेकर' ग्रंथ हा एक अनेक दृष्टींनी महत्त्वाचा ग्रंथ झाला आहे. जांभेकरांचे चहाते मित्र श्री. इनामदार व श्री. सुभेदार यांनी त्याचे 'संग्रहण' करून व जांभेकरांचे आप्त डॉ. गुर्जर यांनी त्याचे 'प्रकाशन' करून एक उपयुक्त कामगिरी केली आहे यात शंका नाही. त्याबद्दल आम्ही त्यांचे अभिनंदन करितो, व खुद्द ग्रंथविषय जांभेकर यांस दीर्घ व निरामय आणि अधिकाधिक उपयुक्त जीवन चिंतितो.



# ललित लेखनाचे तंत्र

ललित वाङ्मयाचे स्वरूप, त्याचे कार्य, रस-अलंकार-भाषाशैली आदी त्याचे घटक, त्याचे विविध प्रकार वगैरेंच्या तंत्रमंत्राची थोडक्यात ओळख श्री. बाळशंकर देशपांडे यांनी या पुस्तकात करून दिली आहे. प्रा. ना. सी. फडके यांनी आपल्या 'प्रतिभा-साधन' या ग्रंथात हाच विषय विस्ताराने मांडला आहे. पण गेल्या ३० वर्षांत वाङ्मयप्रकारांत विविधता आली आहे. लेखनाचे तंत्र बदलत चालले आहे. नवकाव्य, नवकथा, नभोनाट्य वगैरे नवीन वाङ्मय प्रकारांची भर पडली आहे. लघुकथा, कादंबरी, नाटक यांच्या तंत्रात कालमानानुसार फरक पडत चालला आहे. अशा परिस्थितीत ललित वाङ्मयाचे तंत्र व मंत्र यांची अद्ययावत चर्चा करणारे पुस्तक हवे होते. ते या छोटेखानी पुस्तकाने साधले असले तरी त्यातील विवेचन अगदीच त्रोटक व वरवरचे झाले आहे. उदा० रसनिर्मिती या प्रकरणात रसाचे महत्त्व विशद करून सांगितले आहे; पण रसनिष्पत्ती कशी होते याच्या विवेचनाला सुरुवात होते न होते तोच प्रकरण संपुष्टात येते. त्यामुळे वाचक अतृप्तच राहतो. पुस्तक सर्वंकष करण्याच्या प्रयत्नात त्या त्या विषयाचे स्थूलमानाने का होईना साकल्याने ज्ञान करून देण्याचा प्रयत्न फसतो आहे इकडे लेखकाचे दुर्लक्ष झालेले दिसते. विविध वाङ्मयप्रकारांची ओळख करून देताना या विषयाबद्दल इतर लेखकांनी काय उद्गार काढले आहेत याचीच चर्चा अधिक दिसून येते. सदर वाङ्मय प्रकारांबद्दल थोडक्यात आपले मत मांडले असते तर अधिक बरे झाले असते. उदा० लघुनिबंध म्हणजे काय, त्याची वैशिष्ट्ये कोणती हे सोदाहरण समजावून सांगण्याऐवजी लघुनिबंध हा वाङ्मयप्रकार महाराष्ट्रात का रुजला नाही याचीच चर्चा अधिक झाली आहे. मात्र लघुकथेपासून चित्रपट कथेपर्यंत व नवनाट्यापासून नभोनाट्यापर्यंतच्या सर्वच वाङ्मय प्रकारांचा त्रोटक का होईना सुबोध व लालित्यपूर्ण भाषेत घेतलेला धावता परामर्ष या दृष्टीने ललित-साहित्याच्या अभ्यासकाला हे पुस्तक मोलाचे वाटेल यात शंका नाही. लेखकाची भाषा सोपी, सुटसुटीत व रसाळ आहे. मात्र मुद्रणदोष वारंवार खटकतात.

मो. रा. वाळंबे

---

**ललित लेखनाचे तंत्र**—लेखक—बाळशंकर देशपांडे, साहित्य रसमाला प्रकाशन, खेतवाडी मुंबई ४; पृष्ठे १८४, मूल्य साडेचार रुपये.

# मराठी साहित्य-दर्शन

'साहित्यिक सावरकर' या शब्दसंहतीपेक्षा 'राजकारणी सावरकर' ही शब्दसंहती मराठी मनाला किंबहुना भारतीय मनालाही अधिक परिचयाची आहे. त्यामुळे सावरकरांचे साहित्य वाचकांपुढे येताच त्याला पक्षीय दृष्टीची चौकट पडते आणि प्रचारकी वाङ्मयाचा छापही त्यावर मारला जातो. वाचकाच्या या पूर्वग्रहदोषैक दृष्टीमुळे सावरकरांच्या साहित्याचा समावेश अभिजात वाङ्मयात श्रेष्ठ टीकाकाराकडून केला जातो ही गोष्टही सोयीस्करपणे विसरली जाते.

साहित्यसम्राट केळकरांच्या शब्दात सांगावयाचे झाले तर सावरकरांचे व्यक्तित्व 'असामान्य'च म्हणावे लागेल. अशा या असामान्य व्यक्तित्वाचा वाङ्मयीन आविष्कारही तसाच असामान्य आहे. श्री. माडखोलकरांसारखा एकादा टीकाकार तर निर्भीडपणे सांगतो की, जगातील अभिजात वाङ्मयात सावरकरांच्या साहित्याची साहित्यकोविदांना गणना करावी लागेल. सावरकरांचे साहित्य हे वाङ्मयोपासकाचे साहित्य नसून ते द्रष्ट्याचे साहित्य होय अशी श्री. बाळशास्त्री हरदास यांची धारणा आहे.

सावरकरांनी सजविलेले साहित्याचे प्रत्येक दालन खरोखरच असामान्य आहे. काव्यप्रांतात संचार करणारी या 'गजेंद्रकमल' विनायकाची 'वैनतेयी प्रतिभा' पाहून डॉ. वाटवे यांच्यासारख्या अनेक टीकाकारांना सावरकरांच्या ठायी महाकवीचा साक्षात्कार होतो. सावरकरांच्या निबंध वाङ्मयाचे विवेचन करताना टीकाकारांना सावरकरांचे निबंध आगरकरांच्या निबंधापेक्षाही काही बाबतीत सरस असल्याचा निर्वाळा द्यावासा वाटतो. सावरकरांचे नाट्यवाङ्मय कितीही सदोष असले तरी त्याची गणना उत्कृष्ट वाङ्मयात करावयास हवी अशी श्री. तळवलकरांसारख्या टीकाकारांची भूमिका आहे. सावरकरांच्या कथा-कादंबऱ्या कितीही सामान्य वाटल्या तरी एका असामान्य प्रतिभावंताची ती सामान्य कृती असल्याने सामान्य कलावंताच्या उत्कृष्ट कृतीपेक्षा ती सरसच ठरेल असा अभिप्राय दिल्याशिवाय प्रा. अदवंतांनाही पुढे जाता आले नाही. सावरकरांच्या इतिहासवाङ्मयाचा यथार्थ गौरव करताना प्रा. ओतुरकरांना स्पष्टच सांगावे लागले की, भारताला जागे करण्यासाठी इतिहासाचे प्रभावी साधन वापरणारा भारतातील सर्वांत थोर पुरुष सावरकरच होत. सावरकरांच्या प्रत्येक वाङ्मयप्रकारावर असे टीकाकारांचे किती म्हणून अभिप्राय सांगावेत! एका स्वतंत्र अशा प्रबंधाचा तो एक प्रपंचच होईल.

श्री. दीक्षित यांनी संपादित केलेल्या वरील पुस्तकात सावरकरांच्या अशा प्रत्येक व प्रभावी साहित्याचे दर्शन घडते. हे दर्शन घडण्यापूर्वी सावरकरांचे व्यक्तित्व आणि त्यांचे वाङ्मय यांचा परिचय श्री. दीक्षित यांनी सहा पृष्ठांच्या छोट्याशा प्रस्तावनेत अगदी नेटका करून दिला आहे. आणि सावरकरसाहित्यातील उतारे निवडण्यामागील आपली भूमिका स्पष्ट केली आहे. त्यात प्रांजलपणे रुचिभिन्नतेकडे बोट दाखवून मतभेदांची शक्यताही त्यांनी सूचित केली आहे. निवडलेल्या उताऱ्यांत नावीन्य आहे की नाही आणि ते उत्कृष्ट आहेत की नाहीत एवढेच वाचकांनी पाहावे असा त्यांचा दृष्टिकोन आहे.

निवडलेल्या उताऱ्यांतून सावरकरांच्या विविध साहित्यप्रकारांचे दर्शन घडते हे निःसंशय! पण सावरकरांच्या सर्व तत्त्वप्रणालींचा आधारभूत जो 'हिंदुत्व' ग्रंथ त्यातील उताऱ्याचा समावेश केला न गेल्याने सावरकरांच्या तत्त्वज्ञानाच्या मूळ गंगोत्रीचे दर्शन न घडताच वाचकांना परत फिरावे लागते. सावरकरांच्या लिपिसुधारणेच्या चळवळीवरील एखाद्या उताऱ्याने या पुस्तकाला अधिक परिपूर्णता आली असती. पण श्री. दीक्षित यांनी एका निराळ्या पद्धतीने या पुस्तकाला अधिक परिपूर्णता आणण्याचा जाणता प्रयत्न केला आहे. सावरकरसाहित्याच्या अधिक अभ्यासाकरिता त्यांनी एक स्वतंत्र अशी सावरकरसाहित्याची सूची जोडलेली आहे. तसेच निवडक सावरकर संदर्भ-साहित्य देऊन त्यांनी अभ्यासकांची उत्कृष्ट सोय केली आहे. उताऱ्यांच्या लहानशा प्रवाहद्वारा वाचकांना मूळ ग्रंथाच्या विशाल सागरात नेऊन सोडण्याचे कुशल कार्य श्री. दीक्षित यांनी यथे केले आहे हे निर्विवाद होय!

प्र. ल. गावडे

---

**मराठी साहित्य दर्शन** — पुष्प १२ वे. संपादक — श्री. म. श्री. दीक्षित, अ. वि. गृह प्रकाशन पुणे २. मूल्य रुपये २=५०



कुलकर्णी ग्रंथागार पुणे २
गप्पागोष्टी
श्री. मा. मिरासदार
लाडक्या लेकी
(मराठी कथा नवनीत)
राम कुलकर्णी
आंकड्यांची मौज आणि फौज
मोहित्यांची मंजुळा
(सं) रामतनय
आभाळाची सांगती
दत्त रघुनाथ कवठेकर
पाट पांहतां लोपन
भयतीचें कवाड
स. कृ. जोशी
धूळणी
ना. सी. फडके
सुषमा
लपंग पेलदोडे
पु. भा. भावे
रंगमंच
नौका
अडीप अक्षरें
पांधापरच्या सावली
ग. दि. माडगूळकर
थोरलीपाती
तीन चित्रकथा
वि. वि. बोकील यांच्या
१० छोटया कादंबऱ्या
कुलकर्णी ग्रंथागार
पुणे २
नवीं प्रकाशने
M.S 63

# साभार स्वीकार

( जुलै ते डिसेंबर )

## कथा

**१ खरात शंकरराव–टिटवीचा फेरा,**
साधना प्रकाशन, पुणे २; ४=००
(श्री. खरात यांच्या बारा ग्रामीण कथांचा संग्रह)

**२ चोरघडे वामन–मजल,**
कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणे २; ३=५०
(१९५४ ते ६० या कालातील श्री. चोरघडे यांच्या चौदा कथांचा संग्रह.)

**३ देसाई मृणालिनी–जीवनसरिता,**
साधना प्रकाशन, पुणे २, ३=५०
(श्री. गुलाबदास ब्रोकर यांच्या निवडक तेरा गुजराती कथांचा अनुवाद, प्रस्तावना श्री. वि. द. घाटे).

**४ धाकस पुरुषोत्तम–गुपित,**
भारतीय ग्रंथ भवन, मुंबई १४; ५=५०
(श्री. धाकस यांच्या बारा कथांचा पहिलाच संग्रह)

**५ धारप नारायण–अनोळखी दिशा,**
सौ. प्रमिला धारप, १८८७ सदाशिव, पुणे २; ५रु.
(श्री. धारप यांच्या चौदा कथांचा संग्रह)

**६ नावडीकर माधव–तेचि पुरुष भाग्याचे,**
अनामिका प्रकाशन, सातारा; ३=००
(श्री. नावडीकर यांच्या बारा कथांचा संग्रह)

**७ पदकी मंगेश–खारीची पिलं,**
महाराष्ट्र प्रकाशन, अमरावती; ४=००
(श्री. पदकी यांच्या तीन दीर्घकथांचा संग्रह)

**८ पदकी मंगेश–यक्षगान,**
नागविदर्भ प्रकाशन, अमरावती; ५=००
(श्री. पदकी यांच्या चौदा कथांचा संग्रह)

**९ भावे ल. ना.–विसावा,**
भारतीय ग्रंथभवन, मुंबई १४; ४=५०
(श्री. भावे यांच्या बारा कथांचा पहिलाच संग्रह)

## कादंबरी

**१० इनामदार ना. सं.– झेप,**
कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणे २; ८=००
(त्रिंबकजी डेंगळे यांच्या महत्त्वाकांक्षी जीवनावर आधारलेली श्री. इनामदार यांची पहिलीच ऐतिहासिक कादंबरी).

**११ कुलकर्णी दत्ताजी–रोगी डॉक्टर,**
पॅरमाऊंट पब्लि. लि., पुणे २; ३=००
नैतिक प्रश्नांचा ऊहापोह करणारी श्री. कुलकर्णी यांची सामाजिक कादंबरी.)

**१२ खानोलकर चिं. त्र्यं.–रात्र काळी घागर काळी,** मौज प्रकाशन, मुंबई ४; ६=५०
(श्री. खानोलकर ऊर्फ आरती प्रभू यांची काव्यपूर्ण भाषेत लिहिलेली प्रतिमात्मक कादंबरी.)

**१३ जोशी राम कृ.–हसल्या आज व्यथा,**
भारतीय ग्रंथभवन, मुंबई १४; ६=५०
(श्री. जोशी यांची सामाजिक विषयावरील लक्ष वेधून घेणारी कादंबरी.)

**१४ तेंडुलकर विजय – आम्ही हरणार नाही,**
नागविदर्भ प्रकाशन, अमरावती; ३=००
(लॉरा इंगाल्स वाइल्डर हिच्या 'दी लॉंग विंटर या गाजलेल्या कादंबरीचा चित्तवेधक अनुवाद.)

## काव्य

**१५ केचे मधुकर–आसवांचा ठेवा,**
महाराष्ट्र प्रकाशन, अमरावती; ४=००
(श्री. केचे यांच्या कवितांचा तिसरा संग्रह.)

**१६ पंडित र. वि.–आयलें तशें गायलें,**
पॉप्युलर प्रकाशन, मुंबई ३४ W. B. ४=००

**१७ पंडित र. वि.–उतरलें तें रूप धरतलें,**
कोकणी केंद्र, मुंबई ७; ४=००

१८ पंडित र. वि. चद्रावळ,
कोंकणी भाशा मंडळ, चर्नी रोड, मुंबई ४;३=५०

१९ पंडित र. वि.–धर्तरेचें कवन,
कोंकणी भाशा मंडळ, मुंबई ४; ३=५०

२० पंडित र. वि. – म्हजें उतर गावड्याचें,
पॉप्युलर प्रकाशन, मुंबई ३४; ४=००
(वरील कोंकणी बोलीतील पाच कविता संग्रह)

२१ भट सुरेश – रूपगंधा,
नागविदर्भ प्रकाशन, अमरावती; ४=००
(विदर्भातील एका नवकवीचा पहिलाच संग्रह)

२२ दीक्षित वसन्त – झुकलेलं चांदणं,
व्हीनस प्रकाशन, पुणे २; २=००
(अहमदनगरचे प्राध्यापक श्री. दीक्षित यांच्या भावकवितांचा पहिला संग्रह)

२३ सन्त इंदिरा – मेंदी,
मौज प्रकाशन गृह, मुंबई ४; ३=००
(श्री. इंदिरा सन्त यांच्या संग्रहाची द्वितीयावृत्ती.)

## नाटक

२४ नवरे. शं. ना.–एक असतो राजा,
जयहिंद प्रकाशन, मुंबई २; २=००
(एका इंग्रजी नाटकाच्या आधारे लिहिलेले श्री. नवरे यांचे पहिलेच नाटक)

२५ परांजपे सई–जादूचा शंख,
मौज प्रकाशन गृह, मुंबई ४; ००=७५
(मुलांमुलींसाठी लिहिलेली नाटिका)

२६ गांजणकर यशवंत – जिद्द,
भारतीय ग्रंथभवन, मुंबई १४; २=५०
(श्री. गंजणकर यांचे पहिलेच स्वतंत्र तीन अंकी सामाजिक नाटक)

२७ समर्थ वसंत ना.–वळलं तर सूत,
जयहिंद प्रकाशन, मुंबई २; २=००
(तीन अंकी अद्भुतरम्य मनोविश्लेषणात्मक नाटक)

२८ सहस्रबुद्धे ब. चिं. – गुलामांची सत्ता,
के. वा. जोशी, अप्पा बळवंत चौक,पुणे २;१=५०
(पुरुषपात्रविरहित तीन अंकी सामाजिक नाटक)

## वाङ्मय

(टीका, प्रबंध, संपादन इत्यादी)

२९ आगाशे य. र. – सारस्वत – समीक्षा
मॉडर्न बुकडेपो, पुणे २; १०=००
(वाङ्मयाच्या अंतर्बाह्य स्वरूपाचे शास्त्रीय विवेचन करणाऱ्या ग्रंथाची सुधारून वाढवलेली द्वितीयावृत्ती)

३० आवळीकर पंडित - विवेकचिंतामणि,
कर्नाटक आणि पुणे विद्यापीठ यांचे संयुक्त प्रकाशन; ६=७५
(श्रीनिजगुणशिवयोगीकृत मूळ कन्नड ग्रंथाच्या मराठी ओवीबद्ध ग्रंथाचे संपादन)

३१ करंदीकर वि. रा. – वामनपंडिताची यथार्थ दीपिका,
कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणे २; २०=००
(वामनपंडितकृत यथार्थदीपिकेचे सटीक विवेचन करणारा प्रबंध)

३२ कुलकर्णी श्री. मा. –पांढरीपांडे गौरवग्रंथ,
पांढरीपांडे सत्कारसमिती, नागपूर २; १२=००
(नागपूरचे प्राचार्य श्री. ल. पांढरीपांडे यांच्या गौरवार्थ साहित्यिक आणि शिक्षणतज्ज्ञ यांनी लिहिलेल्या वैचारिक लेखांचे संपादन)

३३ तुळपुळे शं.गो.-प्राचीन मराठी कोरीव लेख,
पुणे विद्यापीठ, पुणे ७; ५=००
(प्राचीन मराठी कोरीव लेखांचे साक्षेपी संपादन, कोरीव लेखांचे ठसे, विस्तृत विवेचनात्मक प्रस्तावना, सूची इ.)

३४ दार्शनिक–ज्ञानेश्वर-दर्शन (अध्याय १ व २)
विजयश्री प्रकाशन, संगमनेर; १ रु. व १। रु.
(राजवाडे प्रतीच्या आधारे ज्ञानेश्वरीचे सारांशरूपाने घडविलेले दर्शन)

३५ प्रभुदेसाई वि. वा.–
सतराव्या शतकातील गोमंतकी बोली,
मुंबई विश्वविद्यालय, मुंबई; ७=५०
(जुन्या गोमंतकी बोलीसंबंधी विस्तृत चर्चा करणारा ग्रंथ)

३६ बनहट्टी श्री. ना. –आज्ञापत्र,
सुविचार प्रकाशन, पुणे २; ४=५०
(आज्ञापत्राचे सटीक विवेचनात्मक संपादन)

**३७ पठाण यू. म.--नागेश संप्रदाय,**
बहि:शाल शिक्षण मंडळ, औरंगाबाद; ००=७५
( नागेश संप्रदायाची थोडक्यात ओळख करून देणारे पुस्तक )

**३८ राजगोपालाचारी – रामायण,**
भारतीय ग्रंथभवन, मुंबई १४; ६=००
( चक्रवर्ती राजगोपालाचारी यांच्या रामायणावरील लोकप्रिय ग्रंथाचा सदानंद रेगे यांनी केलेला अनुवाद. )

**३९ रानडे रा. द.–मराठी संतवाङ्मयातील परमार्थ मार्ग ( खंड १ ),**
भारतीय ग्रंथभवन, मुंबई १४; ५=००
( कै. रानडे यांच्या ग्रंथाचा प्रा. कृ. वे. गजेंद्रगडकर यांनी केलेला अनुवाद. )

**४० वाडेगावकर ना. दा.–मनोरमा व शब्दरत्न,**
भोसला वेदशास्त्र महाविद्यालय, नागपूर २ १०=०० ( भट्टोजी दीक्षितकृत ग्रंथाचे कै. रा. ब. वाडेगावकर यांनी केलेले सुबोध भाषांतर भाग ५ वा.)

**४१ सहस्रबुद्धे पु. ग.–वैयक्तिक व सामाजिक,**
कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणे २; ४=००
( डॉ. सहस्रबुद्धे यांचे आठ वैचारिक व सामाजिक स्वरूपाचे निबंध )

**४२ सहस्रबुद्धे पु.ग.–लोकहितवादींची शतपत्रे,**
कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणे २; ६=५०
( लोकहितवादींच्या शतपत्रांची नव्याने मांडणी व संपादन )

**४३ सोनग्रा रतनलाल के. – व्यासपीठावर,**
जवाहर मुथा, अहमदनगर; १=००
( श्री. सोनग्रा यांच्या पाच भाषणांचा संग्रह )

## ललित

**४४ कुलकर्णी व्यं. न. – रोमांच,**
रोमांच प्रकाशन, सातारा; ६=००
( पश्चिम जर्मनीचे सर्वांगीण पण धावते दर्शन घडविणारे पुस्तक )

**४५ सरवटे वसंत–खडा मारायचा झाला तर,**
मौज प्रकाशन गृह, मुंबई ४; ४=००
( १९५० ते ६० मधील विविध नियतकालिकांत प्रसिद्ध झालेल्या हास्यचित्रांचा संग्रह )

## इतिहास

**४६ आपटे – ओतुरकर – महाराष्ट्राचा पत्ररूप इतिहास ( द्वितीयावृत्ती ),**
अ. वि. प्रकाशन, पुणे २; ९=००
( १६२४ ते १८५९ या कालातील मराठ्यांच्या इतिहासावर प्रकाश टाकणाऱ्या पत्रांचे व वेच्यांचे नव्याने संपादन )

## इतर

**४७ दुधिले वि. तु.–अर्वाचीन अर्थशास्त्र,**
प्रा. सुधाकर भोसले, ७१२ गुरुवार, पुणे २
६=५० (पदवीपूर्व आणि विद्यापीठपूर्व परीक्षांसाठी नेमलेल्या अभ्यासक्रमानुसार लिहिलेले पुस्तक )

---

## शोचनीय निधन

## कै. कृ. गं. कवचाळे, इंदूर

मध्यप्रदेशातील व्यासंगी साहित्यिक श्री. कृ. गं. कवचाळे हे दि. ६ जानेवारी १९६४ रोजी इंदूर येथे निधन पावले हे कळविण्यास आम्हांस अत्यंत दुःख होत आहे. गतवर्षीच त्यांचा एकसष्ठीचा समारंभ साजरा झाला होता. वयाच्या सतराव्या वर्षापासून श्री. कवचाळे यांनी लेखनास आरंभ केला. अनेक मराठी व हिंदी नियतकालिकांतून त्यांनी चौफेर लेखन केले. कवित्वाबरोबर त्यांच्या अंगी विद्वत्ताही होती. माळव्याचा इतिहास, साहित्य आणि संस्कृती या विषयांची त्यांना विशेष आवड होती. 'माळव्यातील प्राचीन विद्वद्रत्ने', 'मध्यभारतीय मराठी वाङ्मय', आणि 'माळव्यांतील प्राचीन राजधान्या' इत्यादी त्यांची पुस्तके त्यांच्या व्यासंगाची चांगली साक्ष देतात. श्री. कवचाळे यांच्या निधनाने त्यांच्या कुटुंबियांची व मध्यप्रदेशातील साहित्य–विषयक कार्याची अपरिमित हानी झाली आहे.

परमेश्वर त्यांच्या आत्म्यास सद्गती देवो.

# परिषद–वार्ता

(चिटणिसांकडून)

**स्मृतिदिन—** कै. माधव जूलियन यांच्या स्मृतिदिनानिमित्त शुक्रवार दि. २९ नोव्हेंबरला श्री. गोपीनाथ तळवलकर यांचे 'माधवराव : व्यक्ती आणि प्रेमकवी' या विषयावर व्याख्यान झाले. अध्यक्षस्थानी प्रा. शं. के. कानेटकर (गिरीश) होते.

**दुखवटा सभा—** सुप्रसिद्ध कथालेखक व 'प्रसाद' प्रकाशनचे संचालक श्री. य. गो. जोशी यांच्या निधनानिमित्त गुरुवार दि. २१ नोव्हेंबरला श्री. काकासाहेब गाडगीळ यांच्या अध्यक्षतेखाली दुखवटा सभा झाली. सभेत प्रा. म. ना. अदवन्त, श्री. के. नारायण काळे, श्री. शांताराम आठवले, प्रा. रा. ना. गद्रे, श्री. श्यं. ग. बापट व श्री. अ. ह. लिमये यांची भाषणे झाली. अध्यक्ष श्री. गाडगीळ यांनी दुखवटा ठराव वाचून दाखविल्यावर सभेने मिनिटभर स्तब्ध उभे राहून दुखवटा व्यक्त केला. याप्रसंगी कै. वा. कृ. भावे आणि कै. ना. म. पटवर्धन यांच्याबद्दलही दुखवटा व्यक्त करण्यात आला.

परिषदेचे माजी कार्याध्यक्ष सुप्रसिद्ध विनोदी लेखक प्रा. चिं. वि. जोशी आणि इतिहासकार प्रा. श्यं. शं. शेजवलकर यांच्या निधनानिमित्त ४ डिसेंबरला श्री. काकासाहेब गाडगीळ यांच्या अध्यक्षतेखाली दुखवटा सभा भरली होती. श्री. वि. द. घाटे, प्रा. श्री. के. क्षीरसागर, श्री. वा. वि. जोशी यांनी भाषणे करून उभयतांना श्रद्धांजली वाहिली.

**भेटी–गाठी—** रविवार दि. १७ नोव्हेंबरला श्री. कन्हय्यालाल मुनशी व सौ. लीलावती मुनशी यांनी परिषदेस भेट दिली. परिषदेतर्फे श्री. काकासाहेब गाडगीळ यांच्या हस्ते त्यांचा सत्कार करण्यात आला. या प्रसंगी म. म. प्रा. द. वा. पोतदार, श्री. वि. द. घाटे, प्रा. श्री. के. क्षीरसागर, महाराष्ट्रकवी यशवंत, डॉ. के. ना. वाटवे, डॉ. न. का. घारपुरे, श्री. श्री. वा. काळे, डॉ. वा. दा. गोखले, प्रा. अ. गं. मंगरूळकर, प्रा. चंद्रकुमार डांगे, श्री. वि. श्यं. शेटे इत्यादी मंडळी उपस्थित होती.

**प्रकाशन समारंभ—** २९ डिसेंबरला (रविवार) सकाळी ९ वाजता परिषदेतर्फे पुढील दोन ग्रंथांचा प्रकाशन समारंभ श्री. काकासाहेब गाडगीळ यांच्या अध्यक्षतेखाली झाला. (१) 'महाराष्ट्र सारस्वत' (कै. वि. ल. भावे) पुरवणीसह पाचवी आवृत्ती. (२) 'रघुवंश.' (कै. गणेशशास्त्री लेले) पद्यात्मक भाषांतर-पुनर्मुद्रण. हे दोन्ही ग्रंथ मुंबईच्या पॉप्युलर प्रकाशनचे श्री. रामदास भटकळ यांनी प्रकाशित केले आहेत. 'रघुवंश' या ग्रंथाच्या प्रकाशनाच्या बाबतीत परिषदेच्या सोलापूर शाखेने (विशेषतः श्री. शं. गो. पटवर्धन व डॉ. लेले यांनी) बरेच प्रयत्न केले. प्रकाशन समारंभाच्या प्रसंगी 'सारस्वत' ग्रंथाचे पुरवणीकार डॉ. शं. गो. तुळपुळे व प्रा. गं. बा. सरदार यांची भाषणे झाली. अध्यक्षीय समारोप झाल्यानंतर निमंत्रितांना प्रकाशकांतर्फे अल्पोपाहार देण्यात आला. प्रकाशकांनी परिषदेला कै. वि. ल. भावे यांचे छायाचित्रही भेट म्हणून दिले.

**न्यायमूर्ती म. गो. रानडे पारितोषिक—** 'न्यायमूर्ती महादेव गोविंद रानडे चॅरिटी ट्रस्ट, पुणे २', या संस्थेतर्फे परिषदेच्या प्राज्ञ परीक्षेत सर्वप्रथम येणाऱ्या उमेदवारास दरवर्षी 'न्यायमूर्ती रानडे परितोषिक' (रुपये पन्नासचे) देण्याचा प्रस्तुत ट्रस्टने निर्णय केला असून तदनुसार १९६३ च्या पारितोषिकाची रक्कम ट्रस्टकडून परिषदेला आलेली आहे. परिषद ट्रस्टची आभारी आहे.

**श्री. अप्पासाहेब पंत यांची देणगी—** औंधचे संस्थानाधिपती कै. बाळासाहेब पंतप्रतिनिधी यांचा स्मृतिदिन परिषदेतर्फे दरवर्षी दि. १३ एप्रिलला साजरा होतो. यापुढे तो विशेषप्रकारे साजरा व्हावा व त्या दिवशी साहित्य–कला या क्षेत्रांतील अधिकारी व्यक्तीचे व्याख्यान व्हावे अशी इच्छा कै. बाळासाहेबांचे सुविद्य चिरंजीव श्री. अप्पासाहेब पंत (भारताचे नॉर्वेतील वकील) यांनी प्रदर्शित केली, इतकेच नव्हे तर या कामासाठी त्यांनी प्रतिवर्षी रु. १०० ची देणगी देण्याचे परिषदेला आश्वासन दिले. श्री. अप्पासाहेब यांच्या या उदार देणगीबद्दल परिषद त्यांची अत्यंत आभारी आहे.

**कार्यकारी मंडळ सभा**—दि. २७ आक्टोबरला भरलेल्या कार्यकारी मंडळाच्या सभेत श्री. दि. के. बेडेकर यांचा 'पत्रिके'च्या संपादकत्वाचा राजिनामा संमत करण्यात आला व त्यांच्या जागी श्री वा. रा. ढवळे यांची निवड करण्यात आली. संपादक मंडळावरील एका रिकाम्या जागी चिटणीस श्री. वि. त्र्यं. शेटे यांची निवड झाली.

**त्रैवार्षिक निवडणुका**—१९६४ ते १९६७ या कालावधीकरिता परिषदेच्या त्रैवार्षिक निवडणुकांना आरंभ झाला आहे. श्री. के. नारायण काळे (कार्याध्यक्ष) व डॉ. न. का. घारपुरे (खजिनदार) यांची निवड अविरोधपणे झाली.



## कै. न. चिं. केळकर स्मारक व्याख्यानमाला १९६४

पुणे विद्यापीठातर्फे प्रतिवर्षी ऑक्टोबर महिन्यात होणाऱ्या कै. न. चिं. केळकर स्मारक व्याख्यानमालेसाठी एका व्याख्यात्याची निवड करावयाची आहे. व्याख्यानांचा विषय इतिहास, वाङ्मय, भाषाशास्त्र, व्याकरणशास्त्र अथवा मराठी भाषा किंवा मराठ्यांचा इतिहास या विषयांतील संशोधन, यांशी संबंधित असावा. व्याख्यात्यास कमीत-कमी सहा व्याख्याने मराठीत एकाच विषयावर द्यावी लागतील. व्याख्यानमाला झाल्यावर व्याख्यात्यास विद्या-पीठाकडे व्याख्यानांची संपूर्ण हस्तलिखित प्रत द्यावी लागेल व त्यानंतर व्याख्यात्यास ७५० रुपये मानधन देण्यात येईल. व्याख्यानमाला कै. न. चिं. केळकर यांच्या श्राद्धदिनाच्या सुमारास, ऑक्टोबरच्या दुसऱ्या सप्ताहात, सुरू होईल.

या व्याख्यानमालेतर्फे ज्यांना १९६४ या वर्षी व्याख्याने देण्याची इच्छा असेल त्यांनी विद्यापीठाकडे **१५ फेब्रुवारी १९६४** पूर्वी अर्ज करावेत. अर्जदारांनी अर्जासोबत सर्व व्याख्यानांचा संक्षिप्त गोषवारा देणे जरूर आहे. त्याच-प्रमाणे विषयासंबंधी आतापर्यंत उपलब्ध नसलेली माहिती देण्यात येणार असल्यास, किंवा विषयाची नवीन दृष्टी-कोनातून मांडणी करण्यात येणार असल्यास, तसा स्पष्ट निर्देश करावा. अर्जाचा विशिष्ट नमुना यासाठी नाही.

आतापर्यंत या व्याख्यानमालेत कै. प्रा. त्र्यं. शं. शेजवलकर, श्री. बा. मा. खुपेरकर, श्री. शं. ना. जोशी, प्रा. श्री. ना. बनहट्टी, प्रा. रा. श्री. जोग, प्रा. ह. रा. दिवेकर, प्रा. ब. ग. खापर्डे आणि कै. प्रा. द. ब. डिसकळकर यांची व्याख्याने झाली आहेत.

**व. ह. गोळे,**
कार्यवाह.

# नवीन सभासद

### तहहयात

१ प्रा. गो. म. दिंडोरकर, **सोलापूर**

### साधारण

१ स. आ. घाडगे, **पुणे २**
२ श्री. द. रा. गोमकाळे, **पुणे ४**
३ प्रा. दा. सी. देसाई, **पुणे २**
४ श्री. सरोज न. मोडक, **पुणे २**
५ श्री. मु. व्यं. रत्नपारखी, **पुणे २**
६ श्री. आर्. एस्. पाटील, **कोल्हापूर**
७ श्री. वा. वि. वाड, **नाशिक**
८ श्री. ज. वि. दुर्गुले **काले** (कराड)
९ श्री. मु. ग. मोघे, **किर्लोस्करवाडी**
१० श्री. श. प्र. धर्माधिकारी, **जळगाव**
११ श्री. के. टी. मारवाडी, **पाचोरा**
१२ श्री. रा. द. शिरुडे, **नगरदेवळे**
१३ श्री. ज्ञा. ना. सूर्यवंशी, **खानापूर** (सांगली)
१४ श्री. मु. रा. खगाडे, **पुणे ४**
१५ श्री. द. तु. पाटील, **तळोदे**
१६ श्री. प्र. अ. कानडे, **ठाणे**
१७ डॉ. वि. भा. गोवंडे, **पुणे**
१८ श्री. सविता पारिजात, **सौंदलगा**
१९ श्री. य. बा. जाधव, **वावी**
२० श्री. कमल न. पवार, **पुणे, ४**
२१ श्री. श्री. प. जोगळेकर, **पुणे २**

### तहहयात वर्गणीदार

१ श्री. वि. ग. राजवाडे, अमरावती

### पत्रिका वर्गणीदार

१ प्रा. शरच्चंद्र मुक्तिबोध, **नागपूर**
२ श्री. वसंत सागरकर, **धार**
३ श्री. पु. ह. धनकर, **चांदा**
४ श्री. व. ब. रोकडे, **एकोडी** (भंडारा)
५ श्री. एस्. डब्लू. काळवीट, **ग्वाल्हेर**
६ श्री. एल्. जी. परच, **न्यू दिल्ली**
७ प्रा. एल्. बी. रायमाने, **औरंगाबाद**



## दुरुस्ती

प्रस्तुत अंकातील 'साहित्य-समीक्षा' या सदरात पुढीलप्रमाणे तळटीपा छापण्याचे राहून गेले आहे. वाचकांनी पुढीलप्रमाणे तळटीपा त्या त्या ठिकाणी वाचाव्या :—

पृ. ६० **स्मितचित्रे**—लेखक : राजाराम हुमणे; जयहिंद प्रकाशन, झावबावाडी, मुंबई २; पृष्ठे १८०; मूल्य ४ रुपये.

पृ. ६५ **अत्रे आणि मराठी रंगभूमी**—लेखक श्री. द. रा. गोमकाळे, व्हीनस प्रकाशन, पुणे २; १२=५०

पृ. ७० **अर्वाचीन मराठीतील खंडकाव्ये**—लेखक, प्रा. डॉ. ह. कि. तोडमल, कॉंटिनेंटल प्रकाशन पुणे २; १५=००